# अमितगतिकृत श्रावकाचार.

भाषांतरकर्ता,

कल्लप्पा भरमप्पा निटवे.

---

आवृत्ति पहिली.

सन १[illegible]१४.

कोल्हापूर " जैनेंद्र " प्रिंटिंग प्रेस.

किंमत १॥। रुपये.

॥ श्री परमात्मने नमः ॥

# श्री अमितगत्याचार्यकृत श्रावकाचार.

## विषयानुक्रमणिका.

### परिच्छेद १ ला.



### परिच्छेद २ रा.

## परिच्छेद ३ रा.

## परिच्छेद ४ था.

## परिच्छेद ५ वा.



## परिच्छेद ६ वा.

## परिच्छेद ७ वा.

## परिच्छेद ८ वा.

## परिच्छेद ९ वा.

## परिच्छेद १० वा.

## परिच्छेद ११ वा.

## परिच्छेद १२ वा.

परिच्छेद १३ वा.

## परिच्छेद १४ वा.



## परिच्छेद १५ वा.

॥ ॐ नमः सिद्धेभ्यः ॥

# ॥ अथामितगतिकृतः श्रावकाचारः ॥

नापाकृतानि प्रभवन्ति भूय- ।
स्तमांसि यैर्दृष्टिहराणि सद्यः ॥
ते शाश्वतीमस्तमयानभिज्ञा ।
जिनेन्दवो वो वितरन्तु लक्ष्मीम् ॥ १ ॥

अर्थ-- ज्यांनीं तत्काळ नाशिलेले, क्षायिकसम्यक्त्व वगैरेचा नाशकरणारे दर्शनमोहनीय वगैरे कर्मरूपी अंधकार उदय पावत नाहींत; आणि ज्यांचा अस्त केव्हांच होत नाहीं असे ते जिनेंद्रचंद्र, तुह्मां सर्व भव्य लोकांस निरंतरची लक्ष्मी ( मुक्ति ) देवोत.

विभिद्य कर्माष्टकशृङ्खलां ये ।
गुणाष्टकैश्वर्यमुपेत्य पूतम् ॥
प्राप्तास्त्रिलोकाग्रशिखामणित्वं ।
भवन्तु सिद्धा मम सिद्धये ते ॥ २ ॥

अर्थ-- ज्ञानावरणीय वगैरे आठ प्रकारच्या कर्मांची सांखळी तोडून व अनंतज्ञान वगैरे आठ प्रकारच्या गुणांचें पवित्र ऐश्वर्य प्राप्त करून घेऊन जे त्रैलोक्याच्या अग्रभागीं शिरोरत्न झाले ह्मणजे मुक्त झाले असे ते सिध्दपरमेष्ठी माझ्या मुक्तीला कारण होवोत....त्यांच्या ध्यानानें मला मुक्ति प्राप्त होवो.

ये चारयन्ते चरितं विचित्रं ।
स्वयं चरन्तो जनमर्चनीयाः ॥

आचार्यवर्या विचरन्तु ते मे।
प्रमोदमाने हृदयारविन्दे ॥ ३ ॥

अर्थ-- जे स्वतः छत्तीस प्रकारच्या आचारांचें आचरण करितात आणि भव्यजनाला आचरण करावयास लावितात आणि ह्मणूनच पूज्य असे ते आचार्यपरमेष्ठी माझ्या प्रफुल्लित-संतुष्ट अशा हृदयकमलांत वास करोत.

येषां तपःश्रीरनघा शरीरे।
विवेचिका चेतसि तत्त्वबुद्धिः॥
सरस्वती तिष्ठति वक्त्रपद्मे।
पुनन्तु तेऽध्यापकपुङ्गवा वः ॥ ४ ॥

अर्थ-- ज्यांच्या देहाचे ठिकाणीं पवित्र [ निरतिचार ] अशी तपोलक्ष्मी वास करित्ये, ज्यांच्या चित्तांत विवेचन [ निर्णय ] करणारें असें तत्त्वज्ञान वास करीत आहे आणि ज्यांच्या मुखकमलांत सरस्वती वास करित्ये ते उपाध्यायपरमेष्ठी तुह्मां सर्व भव्यजीवांस पवित्र करोत.

कषायसेनां प्रतिबन्धिनीं ये।
निहत्य धीराः शमशीलशस्त्रैः॥
सिद्धिं विबाधां लघु साधयन्ते।
ते साधवो मे वितरन्तु सिद्धिम् ॥ ५ ॥

अर्थ— मोक्षमार्गाला प्रतिबंध करणारी अशा क्रोध वगैरे कषायरूपी सेनेला शम व शीलरूपी शस्त्रांनीं नाहींशी करून जे निर्बाध ( शाश्वत ) अशी सिद्धि लवकर साधितात, ते सर्व साधुपरमेष्ठी मला सिद्धि देवोत!

विभूषितोऽह्नाय यया शरीरी ।
विमुक्तिकान्तां विदधाति वश्याम् ॥
सा दर्शनज्ञानचरित्रभूषा ।
चित्ते मदीये स्थिरतामुपैतु ॥ ६ ॥

अर्थ— ज्याच्यायोगानें हा संसारी जीव मुक्तिरूपी कांतेला तत्काळ वश करितो; तो दर्शन–ज्ञान–चारित्ररूपी अलंकार माझ्या मनांत दृढ राहो.

मातेव या शास्ति हितानि पुंसो ।
रजः क्षिपन्ती ददती सुखानि ॥
समस्तशास्त्रार्थविचारदक्षा ।
सरस्वती सा तनुतां मतिं मे ॥ ७ ॥

अर्थ— जी मातेप्रमाणें मनुष्याला हितोपदेश करिते, पातकांचा नाश करिते, नानाप्रकारचीं सुखें प्राप्त करून देते अशी ती सर्वशास्त्रार्थांचा विचार करण्यास समर्थ असलेली सरस्वती देवी मला बुद्धि देवो.

शास्त्राम्बुधेः पारमियर्ति येषां ।
निषेवमाणाः पदपद्मयुग्मम् ॥
गुणैः पवित्रैर्गुरवो गरिष्ठां ।
कुर्वन्तु निष्ठां मम ते वरिष्ठाः ॥ ८ ॥

अर्थ— ज्यांच्या पदकमलांची सेवा करणारा भव्य मनुष्य शास्त्ररूपी समुद्राच्या परतीरास जातो असे आणि निर्मल अशा गुणांनीं श्रेष्ठ झालेले असे ते गुरु मला उत्कृष्ट असें यथाख्यातचारित्र प्राप्त करून देवोत.

उपासकाचारविचारसारं ।
सङ्क्षेपतः शास्त्रमहं करिष्ये ॥
शक्नोति कर्तुं श्रुतकेवलिभ्यो ।
न व्यासतोऽन्यो हि कदाचनापि ॥ ९ ॥

अर्थ— श्रावकाचारांतील विचारांचा ज्यांत सार (मुख्य मुख्य विषय) आहे असें शास्त्र मी संक्षेपानें करितों. कारण, हें शास्त्र विस्तारानें करण्यास श्रुतकेवलीवांचून दुसरा कोणीही [साधारण मनुष्य] केव्हांही समर्थ होत नाहीं.

कुदुष्टभावाः कृतिमस्तदोषां ।
निसर्गतो यद्यपि दूषयन्ते ॥
तथापि कुर्वन्ति महानुभावा-- ।
स्त्याज्या न यूकाभयतो हि शाटी॥१०॥

अर्थ— दुष्ट स्वभावाचे लोक सज्जनांच्या निर्दोष अशाहि कृतीला जरी स्वभावतः दूषण देतात; तरी सज्जन त्या दूषणाला न जुमानतां चांगली कृति करीत असतात. हें सरलच आहे. कारण, उवांच्या भीतीनें वस्त्र टाकून देणें योग्य होणार नाहीं.

संसारकान्तारमपास्तपारं ।
बम्भ्रम्यमाणो लभते शरीरी ॥
कृच्छ्रेण नृत्वं सुखसस्यबीजं ।
प्ररूढदुष्कर्मशमेन नूनम् ॥ ११ ॥

अर्थ-- ज्याचा पार लागत नाहीं अशा या संसाररूपी अरण्यांत सतत फिरणारा संसारी जीव, पूर्वोपार्जित कर्मांचा उपशम झाला ह्मणजे, सुखाला कारण असें मनुष्यत्व खरोखर

मोठ्या कष्टानें प्राप्त करून घेतो.

नरेषु चक्री त्रिदशेषु वज्री ॥
मृगेषु सिंहः प्रशमो व्रतेषु ॥
मतो महीभृत्सु सुवर्ण शैलो ।
भवेषु मानुष्यभवः प्रधानम् ॥ १२ ॥

अर्थ-- जसा मनुष्यांमध्यें चक्रवर्ती राजा, देवांमध्यें इंद्र, जनावरांत सिंह, व्रतांमध्यें उपशमभाव आणि पर्वतांमध्यें मेरु-पर्वत श्रेष्ठ; तसा सर्वभवांमध्यें मनुष्यभव श्रेष्ठ मानिला आहे.

त्रिवर्गसारः सुखरत्नखानि- ।
धर्मः प्रधानं भवतीह येन ॥
सम्यक्त्वशुद्धाविह मुक्तिलाभः ।
प्रधानता तेन मताऽस्य सद्भिः ॥ १३ ॥

अर्थ— धर्म, अर्थ आणि काम या तीन पुरुषार्थांमध्यें श्रेष्ठ व सुखरूपी रत्नांची खाण असा धर्मच ज्या अर्थी या मनुष्य जन्मांत प्रधान आहे ह्मणजे मुख्यत्वेंकरून सेव्य आहे; आणि सम्यक्त्वाची शुद्धि असली ह्मणजे मुक्तिलाभहि या मनुष्यभवांतच होतो; त्या अर्थी सत्पुरुषांनीं या मनुष्यभवाला श्रेष्ठपणा दिला आहे. तात्पर्य; सम्यक्त्वाची शुद्धि असली तरी, मुक्तिलाभ होण्याला मनुष्यभवच पाहिजे.

यथा मणिर्ग्रावगणेष्वनर्घो ।
यथा कृतज्ञो गुणवत्सु लभ्यः ॥
न सारवत्त्वं न तथात्रिवर्गैः ।
सुखेन मानुष्यभवो भवेषु ॥ १४ ॥

अर्थ-— जसें दगडांमध्यें अमूल्य असें रत्न दुर्लभ असतें,

गुणीमनुष्यांत कृतज्ञ ( केलेले उपकार जाणणारा ) मनुष्य जसा दुर्लभ असतो, तसा संसारांत श्रेष्ठ असा मनुष्यभव दुर्लभ आहे....तो संसारी जीवांना सहज प्राप्त करून घेतां येत नाहीं.

शमेन नीतिर्विनयेन विद्या।
शौचेन कीर्तिस्तपसा सपर्या॥
विना नरत्वेन न धर्मसिद्धिः।
प्रजायते जातु जनस्य पथ्या॥ १५॥

अर्थ— इंद्रियनिग्रहावांचून नीति प्राप्त होत नाहीं, विनयावांचून विद्या मिळत नाहीं, पवित्र आचरणावांचून कीर्ति होत नाहीं, तपश्चर्येवांचून पूज्यता मिळत नाहीं, त्याप्रमाणें मनुष्यभवावांचून जीवाला सुखकर अशी धर्मसिद्धि केव्हांही प्राप्त होत नाहीं.

अन्नेन गात्रं नयनेन वक्त्रं।
नयेन राज्यं लवणेन भोज्यम्॥
धर्मेण हीनं बत जीवितव्यं।
न राजते चन्द्रमसा निशीथम्॥ १६॥

अर्थ— अन्नाशिवाय देहाला टवटवी नाहीं, डोळयावांचून मुखाला शोभा नाहीं, नीतीवांचून राज्य चालत नाहीं, मिठावांचून भोजन रुचिकर होत नाहीं, चंद्रावांचून रात्र शोभत नाहीं; त्याप्रमाणें धर्मावांचून जगणें शोभत नाहीं....म्हणजे धर्महीन मनुष्याचें जगणें व्यर्थ होय!

सस्येन देशः पयसाऽब्जखण्डः।
शौर्येण शस्त्री विटपी फलेन॥
धर्मेण शोभामुपयाति मर्त्यो।
मदेन दन्ती तुरगो जवेन॥ १७॥

अर्थ— धान्यांच्या समृद्धीनें देशाला शोभा येते, पाण्याच्या योगानें कमळें टवटवीत होतात, पराक्रमानें शस्त्रधारी पुरुष शोभतो, फलानें झाडास शोभा येते, मदानें हत्ती शोभतो आणि पळण्याचें सामर्थ्य असलें म्हणजे घोडा शोभतो, त्याप्रमाणें मनुष्यप्राणी धर्माचरणाच्या योगानें शोभेप्रत पोंचतो.

मानुष्यमासाद्य सुकृच्छ्रलभ्यं ।
न यो विशुद्धिर्विदधाति धर्मम् ॥
अनन्यलभ्यं स सुवर्णराशिं ।
दारिद्र्यदग्धो विजहाति लब्ध्वा ॥ १८ ॥

अर्थ— मोठ्या आयासानें प्राप्त होणारें मनुष्यजन्म पावून जो मनुष्य शुध्दसम्यग्दृष्टि होऊन धर्माचरण करीत नाहीं; तो, दुसऱ्यास न मिळणारा असा सोन्याचा ढीग मिळाला तरी, त्यास टाकून देणाऱ्या दारिद्र्यानें गांजलेल्या मनुष्याप्रमाणें मूर्ख होय!

अनादरं यो वितनोति धर्मे ।
कल्याणमालाफलकल्पवृक्षे ॥
चिन्तामणिं हस्तगतं दुरापं ।
मन्ये स मुग्धस्तृणवज्जहाति ॥ १९ ॥

अर्थ— कल्याणांची परंपरारूपी फळें देणारा अशा कल्पवृक्षासारखा असलेल्या धर्माचे ठिकाणीं जो अनादर करितो; तो मूढ प्राणी कधीं न मिळणारें चिंतामणि रत्न हातीं आलेलें असूनहि, त्यास गवताप्रमाणें तुच्छ समजून टाकून देतो! असें मी समजतों.

दुःखानि सर्वाणि निहन्तुकामै- ।
निष्पीडितप्राणिगणानि धर्मः ॥
उपासनीयो विधिना विधिज्ञै- ।
रग्निर्हिमानीव दुरुत्तराणि ॥ २० ॥

अर्थ— इतर कोणत्याही उपायानें निवारण्यास अशक्य अशी थंडी दूर करण्यास जाणते लोक अग्नीची जशी सेवा करितात ह्मणजे अग्नीजवळ बसून थंडी घालवितात; त्याप्रमाणें ज्यांनीं सर्व प्राण्यांना पीडा केली आहे अशीं सर्वप्रकारचीं दुःखें नाहींशीं करण्याची इच्छा करणाऱ्या जाणते लोकांनीं विधि-पूर्वक धर्माची उपासना करावी. ह्मणजे धर्माचरण करावें.

सस्यानि बीजं सलिलानि मेघं ।
घृतानि दुग्धं कुसुमानि वृक्षम् ॥
काङ्क्षत्यहान्येष विना दिनेशं ।
धर्मं विना काङ्क्षति यः सुखानि ॥ २१ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें बीं पेरल्यावांचून धान्याची इच्छा करावी किंवा मेघावांचून पर्जन्याची इच्छा करावी, अथवा दुधावांचून तूप मिळण्याची इच्छा करावी, अगर झाडावांचून फुलांची इच्छा करावी, अथवा सूर्यावांचून दिवस असावा अशी इच्छा करावी, त्याप्रमाणेंच धर्मावांचून सुखांची इच्छा करणें होय. तात्पर्य– जो मनुष्य धर्माचरण न करतांच सुख व्हावें अशी इच्छा करतो तो बीजावांचून धान्याची इच्छा करणाऱ्याप्रमाणें होय. ह्मणून धर्माचरण केल्यावांचून सुख होणें शक्य नाहीं.

आयान्ति लक्ष्म्यः स्वयमेव रुच्यं ।
धर्मं दधानं पुरुषं पवित्राः ॥

प्रसूनगन्धस्थगिताखिलाशं ।
सरोजिनीखण्डमिवालिमालाः ॥ २२ ॥

अर्थ-- ज्याच्या कुसुमगंधानें सर्व दिशा व्यापल्या आहेत अशा कमलवनाकडे भ्रमरांच्या पंक्ति ज्याप्रमाणें आपोआप धावून जातात, त्याप्रमाणें उत्तम अशा धर्माचें सेवन करणाऱ्यां पुरुषांकडे पवित्र अशा संपत्ति आपोआपच गमन करतात.

निषेवते यो विषयं विहीनं ।
धर्मं निराकृत्य सुखाभिलाषी ॥
पीयूषमत्यस्य स कालकूटं ।
सुदुर्जरं खादति जीवितार्थी ॥ २३ ॥

अर्थ— सुखाची इच्छा करणारा जो मनुष्य धर्माचा त्याग करून अत्यंत नीच अशा प्रकारच्या विषयांचें सेवन करतो, तो आपण जगावें ह्या इच्छेनें अमृत टाकून देऊन अत्यंत दुर्जर (न पचणारें) असें विष प्राशन करतो!

भोगोपभोगाय करोति दीनो ।
दिवानिशं कर्म यथा सुयत्नः ॥
तथा विधत्ते यदि धर्ममेकं ।
क्षणं तदानीं किमु नैति सौख्यम् ॥ २४ ॥

अर्थ— हा दीन झालेला मनुष्य प्राणी भोगोपभोगांच्या प्राप्तीकरितां ज्याप्रमाणें मोठ्या प्रयासानें रात्रंदिवस खटपट करतो, तशी खटपट करून जर एक क्षणभर धर्माचरण करील तर त्याला सुख प्राप्त होणार नाहीं काय? अवश्य होईल.

ये योजयन्ते विषयोपभोगे ।
मानुष्यमासाद्य दुरापमज्ञाः ॥

निष्कृत्य कर्पूरवनं स्फुटं ते ।
　कुर्वन्ति वार्टीं विषपादपानाम् ॥ २५ ॥

अर्थ— जे मूर्ख जीव मनुष्यपणा प्राप्त झाला असून विषयोपभोग करण्यांतच त्याची (मनुष्यपणाची) योजना करतात, ते कापरांचीं झाडें काढून टाकून त्या ठिकाणीं विषवृक्षांची बाग करतात! असें स्पष्ट दिसतें.

गृह्णन्ति धर्मं विषयाकुला ये ।
　न भङ्गुरे मङ्क्षु मनुष्यभावे ॥
प्रदह्यमाने भवनेऽग्निना ते ।
　निस्सारयन्ते न धनानि नूनम् ॥ २६ ॥

अर्थ— क्षणभंगुर अशा या मनुष्यभवांत जे जीव विषयासक्त होऊन धर्माचरण करीत नाहींत, ते आग लागून घर जळूं लागलें असतां घरांतील संपत्ति बाहेर न काढणाऱ्यासारखे मूर्ख होत.

सर्वेऽपि भावाः सुखकारिणोऽमी ।
　भवन्ति धर्मेण विना न पुंसाम् ॥
तिष्ठन्ति वृक्षाः फलपुष्पयुक्ताः ।
　कालं कियन्तं खलु मूलहीनाः ॥ २७ ॥

अर्थ— मनुष्यांचे कोणतेही परिणाम धर्मावांचून सुखप्रद होत नाहींत. योग्यच आहे. कारण, मूळ तुटल्यावर वृक्ष सुंदर पुष्पांनीं युक्त असे किती वेळपर्यंत रहातील बरें? मुळींच रहाणार नाहींत.

मोक्षावसानस्य सुखस्य पात्रं ।
　भवन्ति भव्या भवभीरवो ये ॥

भजन्ति भक्त्या जिननाथदृष्टं ।
धर्मं निराच्छादमदूषणं ये ॥ २८ ॥

अर्थ— संसाराला भीत असलेले जे भव्य जीव जिनेंद्रांनीं सांगितलेल्या निष्कपट आणि निर्दोष अशा धर्माचें भक्तीनें आचरण करतात, ते मोक्षापर्यंतच्या सर्व सुखांना पात्र होतात.

लक्ष्मीं विधातुं सकलां समर्थं ।
सुदुर्लभं विश्वजननिर्मेनम् ॥
परीक्ष्य गृह्णन्ति विचारदक्षाः ।
सुवर्णवद्वञ्चनभीतचित्ताः ॥ २९ ॥

अर्थ— आपल्याला कोणीतरी फसवितील ह्मणून भिणारे लोक ज्याप्रमाणें सुवर्ण नीट परीक्षा करून घेतात, त्याप्रमाणें विचारी लोक–सर्वप्रकारची संपत्ति प्राप्त करून देण्याला समर्थ, अत्यंत दुर्लभ आणि सर्वांचें कल्याण करणारा असा हा–जिनधर्म परीक्षा करून स्वीकारतात.

स्वर्गापवर्गामलसौख्यखानिं ।
धर्मं गृहीतुं परमो विवेकः ॥
सदा विधेयो हृदये पटिष्ठे- ।
र्बुधस्तुतं रत्नमिवापदोषम् ॥ ३० ॥

अर्थ— ज्याप्रमाणें निर्दोष अशा प्रकारचें रत्न घ्यावयाचें असतां लोक मोठा विचार करून तें घेतात, त्याप्रमाणें स्वर्ग आणि मोक्ष ह्या संबंधी उत्तम सुख देणारा कोणता धर्म आहे? आणि पंडित कोणत्या धर्माची स्तुती करीत आहेत? ह्याचा शहाण्या लोकांनीं नीट विचार करून मग तो धर्म नेहमीं आपल्या हृदयांत धारण करावा.

तं शब्दमात्रेण वदन्ति धर्मं ।
विश्वेऽपि लोका न विचारयन्ति ॥
न शब्दसाम्येऽपि विचित्रभेदै- ।
र्विभेद्यते क्षीरमिवार्चनीयम् ॥ ३१ ॥

अर्थ— ज्यापासून स्वर्ग आणि मोक्ष ह्यांचीं प्राप्ति होणें शक्य नाहीं त्या धर्मालाही सर्व लोक धर्मच ह्मणतात. पण ह्याला धर्म ह्मणावें किंवा न ह्मणावें ह्याचा विचार करीत नाहींत. असें पहा कीं, क्षीर हा शब्द पाणी आणि दूध ह्या दोन्ही वस्तूंचा बोधक जरी आहे, तथापि तें स्वताच्या सद्गुणांमुळें पूज्य होणारें दूध आपल्या असलेल्या अनेक गुणधर्मांच्या योगानें पाण्याहून अगदींच निराळें असत नाहीं काय? अवश्य असतें. त्याप्रमाणें सर्वधर्म हे 'धर्म' ह्या एकाच शब्दानें जरी बोध्य आहेत तथापि सद्धर्म हा अगदीं भिन्न आहे. ह्मणून सध्दर्म कोणता? ह्याचा विचार केला पाहिजे.

हिंसानृतस्तेयपरांगसंग- ।
ग्रन्थग्रहा दत्तदुरन्तदुःखाः ॥
धर्मेषु येष्वत्र भवन्ति निन्द्या- ।
स्ते दूरतो बुद्धिमतां विवर्ज्याः ॥ ३२ ॥

अर्थ— ज्या धर्मांत हिंसा, असत्य भाषण, चोरी, परस्त्री समागम आणि परिग्रह हे व्यापार ग्राह्य मानले असतील ते धर्म चिरकाल दुःख देणारे असल्यानें अत्यंत निंद्य आहेत. ह्मणून तसले धर्म बुध्दिमान् मनुष्यानें दूर टाकून द्यावेत.

निहन्यते यत्र शरीरिवर्गो ।
निपीयते मद्यमुपास्यते स्त्री ॥

यो भुज्यते मांसमनर्थमूलं।
धर्मस्य वार्ताऽपि न तत्र नूनम् ॥ १३ ॥

अर्थ— ज्या धर्मांत प्राण्यांचा वध केला जातो, मद्यप्राशन केलें जातें, स्त्रीसमागम केला जातो, आणि सर्व अनर्थाला कारण असलेलें मांसही भक्षण केलें जातें त्या धर्मांत धर्माचें नांव देखील असणें शक्य नाहीं.

वधादयः कल्मषहेतवो ये।
न सेवितास्ते वितरन्ति धर्मम् ॥
न कोद्रवाः क्वापि वसुन्धरायां।
निर्वीयमाना जनयन्ति शालिम् ॥ १४ ॥

अर्थ— पाप उत्पन्न करणारे असे हिंसादि व्यापार केले असतां धर्म होणें शक्य नाहीं. कारण, भूमींत हरीक नांवाचें धान्य पेरलें असतां त्यापासून भात उत्पन्न होणें कोठेंच शक्य नाहीं.

हिंसापरस्त्रीमधुमांससेवां।
कुर्वन्ति धर्माय विबुद्धयो ये ॥
पीयूषलाभाय विवर्द्धयन्ते।
विषद्रुमाँस्ते विविधैरुपायैः ॥ १५ ॥

अर्थ— जे बुद्धिहीन लोक हिंसा, परस्त्री, मद्य, मांस यांचें सेवन धर्म ह्मणून करतात; ते अमृत मिळण्याकरितां अनेक उपायांनीं विषवृक्षांना वाढवीत आहेत असें समजावें.

यैर्मद्यमांसाङ्गिवधादयोऽमी।
निर्मानमुक्ताः कुशलाय शास्त्रैः ॥
आकर्णनीयावि न तानि दक्षैः।

शत्रूदितानीव वचांसि जातु ॥ १६ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें शत्रूंचीं भाषणें केव्हांही ऐकूं नयेत; त्याप्रमाणें मद्य, मांस, प्राणिवध वगैरे दुर्व्यापार ज्यांत जीवांच्या कल्याणाकरितां ह्मणून अपरिमित सांगितले आहेत तीं शास्त्रें शहाण्या मनुष्यानें केव्हांही ऐकूं नयेत.

पठन्ति शृण्वन्ति वदन्ति भक्त्या ।
स्तुवन्ति रक्षन्ति नयन्ति बुद्धिम् ॥
ये तानि शास्त्राण्यनुमन्यमाना- ।
स्ते यान्ति सद्योऽपि कुयोनिमग्नाः ॥ १७ ॥

अर्थ— जे लोक त्या वर सांगितलेल्या शास्त्रांचें भक्तीनें पठण करतात, श्रवण करतात, त्यांची चर्चा करतात, त्यांची स्तुति करतात, त्यांचें रक्षण करतात, त्यांत आपली बुद्धि प्रविष्ट करतात, आणि त्यांचा विचार करतात ते तत्काल नीचयोनीमध्यें बुडून नरकाला जातात.

धर्मं वदन्तेऽङ्गिवधादयोऽमी ।
विधीयमाना यदि नाम तथ्यम् ॥
सांसारिकाचारविधौ प्रवृत्ता ।
न पापिनः केऽपि तदा भवन्ति ॥ १८ ॥

अर्थ— केलीं जाणाऱ्या ह्या प्राणिवध वगैरे पातकांना जर खरोखरच धर्म ह्मणतात; तेव्हां संसारासंबधी आचार आचरण्यांत प्रवृत्त झालेले कोणीहि पापी नव्हेत. सर्व संसारी प्राणी पुण्यवान् होत; असें ह्मणावें लागेल!

रागादिदोषाकुलमानसैर्ये ।
ग्रन्थाः क्रियन्ते विषयेषु लोलैः ॥

कार्याः प्रमाणं न विचक्षणैस्ते- ।
जिघृक्षुभिर्धर्ममगर्हणीयम् ॥ ३९ ॥

अर्थ— विषयांच्या ठिकाणीं आसक्त झालेले आणि राग द्वेष वगैरे दोषांनीं ज्यांचें चित्त व्याकुल झालें आहे अशा लोकांनीं जे ग्रंथ केले आहेत, ते, स्तुत्य असा धर्म घेऊं इच्छिणाऱ्या विद्वानांनीं सत्य मानूं नयेत.

ये द्वेषरागश्रमलोभमोह- ।
प्रमादनिद्रामदखेदहीनाः ॥
विज्ञातनिःशेषपदार्थतत्त्वा- ।
स्तेषां प्रमाणं वचनं विधेयम् ॥ ४० ॥

अर्थ-- द्वेष, राग, श्रम, लोभ, मोह, प्रमाद, निद्रा, मद, खेद वगैरे दोषांनीं रहित असलेले आणि समस्त पदार्थांचें तत्त्व ज्यांनीं जाणलें आहे अर्थात् जे वीतराग सर्वज्ञ, त्यांचें वचन सत्य मानावें.

रागादिदोषा न भवन्ति येषां ।
न सन्त्यसत्यानि वचांसि तेषाम् ॥
हेतुव्यपाये नहि जायमानं ।
विलोक्यते किञ्चन कार्यमार्यैः ॥ ४१ ॥

अर्थ-- ज्यांना राग वगैरे दोष असत नाहींत; त्यांचीं वचनें असत्य असत नाहींत. हें ठीकच आहे. कारण, कारणावांचून घडून आलें असें एकही कार्य श्रेष्ठांनीं पाहिलें नाहीं. तात्पर्य, रागद्वेष हे असत्याचीं कारणें आहेत. तेव्हां रागद्वेष जेथें नाहींत, तेथें असत्य कसें असूं शकेल ?

विना गुरुभ्यो गुणनीरदेभ्यो ।

जानाति धर्मं न विचक्षणोऽपि ॥
निरीक्षते कुत्र पदार्थजातं ।
विना प्रकाशं शुभलोचनोऽपि ॥ ४२ ॥

अर्थ— कसाहि चतुर मनुष्य असला, तरी तो गुणांचा समुद्र अशा गुरूवांचून धर्म जाणूं शकत नाहीं. हें ठीकच आहे. कारण, कसाहि स्वच्छ नेत्राचा माणूस असला, तरी प्रकाशा-वाचून त्याला पदार्थ कसे दिसतील? दिसणार नाहींत.

ये ज्ञानिनश्चारुचरित्रभाजो ।
ग्राह्यो गुरूणां वचनेन तेषाम् ॥
सन्देहमत्यस्य बुधेन धर्मो ।
विकल्पनीयं वचनं परेषाम् ॥ ४३ ॥

अर्थ— जे सदाचारी ज्ञानी गुरु आहेत, त्यांच्या उपदेशानें संशय दूर करून, जाणत्या माणसानें धर्म ग्रहण करावा. तसा गुरूवांचून इतरांनीं सांगितलेला धर्म असत्य आहे असें समजावें.

भीतैर्यथा वञ्चनतः सुवर्णं ।
प्रताडनच्छेदनतापघर्षैः ॥
तथा तपःसंयमशीलशौचैः ।
परीक्षणीयो गुरुरुद्धबोधैः ॥ ४४ ॥

अर्थ— आपण फसूं नये ह्मणून शहाणे लोक बडविणें, तोडणें, तापविणें, घांसणें वगैरे उपायांनीं सोन्याची जशी परीक्षा करितात; तशी तप, संयम, शील, शौच वगैरे गुण पाहून गुरूची परीक्षा करावी.

संसारमुद्भूतकषायदोषं ।
विलङ्घिषन्ते गुरुणा विना ये ॥
विभीमनक्रादिगणं ध्रुवं ते ।
वार्द्धिं तितीर्षन्ति विना तरण्डम् ॥ ४५ ॥

अर्थ— क्रोध, मान, माया, लोभ हे कषायरूपी दोष ज्यांत उद्भवले आहेत अशा संसारांतून गुरूच्या सहायावांचून पार पडण्याची जे इच्छा करितात; ते ज्यांत भयंकर असे सुसर वगैरे प्राणी भरलेले आहेत अशा समुद्रांतून नौकेवांचून तरून जाण्याची इच्छा करणाऱ्यांसारखे होत!

येषां प्रसादेन मनःकरीन्द्रः ।
क्षणेन वश्यो भवतीह दुष्टः ॥
भजन्ति तान्ये गणिनो न भक्त्या ।
तेभ्यः कृतघ्ना न परे भवन्ति ॥ ४६ ॥

अर्थ— ज्यांच्या प्रसादानें या मानवजन्मांत दुष्ट असा मनरूपी हत्ती आपल्या स्वाधीन होतो, अशा आचार्यांना जे भजत नाहींत; त्यांच्यापेक्षां कृतघ्न दुसरे कोणीच होत नाहींत.

कृतोपकारो गुरुणा मनुष्यः ।
प्रपद्यते धर्मपरायणत्वम् ॥
चामीकराश्मैव सुवर्णभावं ।
सुवर्णकारेण विशारदेन ॥ ४७ ॥

अर्थ— चतुर अशा सोनारानें ज्याला संस्कार केले आहेत, असा सोन्याचा दगड जसा सुवर्णत्वास प्राप्त होतो म्हणजे त्या दगडाचें जसें सोनें होतें, तसा गुरूनें ज्याला उपदेशाचा संस्कार केला आहे असा मनुष्य धर्मपरायण होतो.

निवर्तमानं व्रततो गुरुभ्यो ।
न शक्यते वारयितुं परेण ॥
व्यलीकवादी व्यवहारकार्ये ।
साक्षीकृतैरेव नियम्यते हि ॥ ४८ ॥

अर्थ— कोणी व्रतापासून भ्रष्ट होऊं लागला, तर त्याला अडविण्यास गुरूवांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं. याला उदाहरण— व्यवहाराच्या कामांत कोणी लबाड बोलूं लागला तर त्याला साक्षीदारच प्रतिबंध करितात.

दुग्धेन धेनुः कुसुमेन वल्ली ।
शीलेन भार्या सरसी जलेन ॥
न सूरिणा भाति विना व्रतस्थः ।
शमेन विद्या नगरी जनेन ॥ ४९ ॥

अर्थ— दुधावांचून गाय, फुलांवांचून वेली, शीलरहित स्त्री, जलशून्य तळें, इंद्रियनिग्रहाशिवाय विद्या, लोकांवांचून नगर हीं जशीं शोभत नाहींत; तसा आचार्याशिवाय व्रती शोभत नाहीं म्हणजे व्रतें पाळणाऱ्यानें सर्वदा आचार्याजवळ राहून त्यांच्या सांगण्याप्रमाणें आपलें आचरण ठेवावें.

विधीयते सूरिवरेण सारो ।
धर्मो मनुष्ये वचनैरुदारैः ॥
मेघेन देशो सलिलैः फलाढ्यो ।
निरस्ततापैरिव सस्यवर्गः ॥ ५० ॥

अर्थ— सूर्यापासून होणारा ताप नाहींसा करणारे मेघ ज्याप्रमाणें आपल्या उदकाच्या योगानें भूमीवर पेरलेलीं धान्यें

फलयुक्त करतात, त्याप्रमाणें आचार्य हे आपल्या निर्दोष अशा भाषणांनीं मनुष्याचे ठिकाणीं सद्धर्म सफल करतात.

लब्धे पदे सम्महनीयवृत्ति- ।
गुरोरनुष्ठाय विनीतचेताः ॥
पापस्य भव्यो विदधाति नाशं ।
व्याधेरिव व्याधिनिषूदनस्य ॥ ५१ ॥

अर्थ— गुरुचरणाची प्राप्ति झाली असतां भव्य जीव सदाचारसपंन्न आणि विनयशील होतो; आणि ज्याप्रमाणें उत्तम वैद्य मिळाला असतां मनुष्य आपल्या व्याधीचा नाश करतो; त्याप्रमाणें तो तपश्चर्या करून आपल्या पातकाचा नाश करतो.

सर्वोपकारं निरपेक्षचित्तः ।
करोति यो धर्मधिया यतीशः ॥
स्वकार्यनिष्ठैरुपमीयतेऽसौ ।
कथं महात्मा खलु बन्धुलोकैः ॥ ५२ ॥

अर्थ— जो यतीश्वर ( गुरु ) शिष्यावर सर्वप्रकारचे उपकार कोणत्याही प्रकारची अपेक्षा न धरतां केवळ धर्मबुद्धीनें करतो, तो महात्मा स्वार्थपरायण असलेल्या आप्त इष्ट मंडळींशीं सारखेपणा कसा बरें पावेल? केव्हांही पावणार नाहीं. ह्मणजे, गुरु हा स्वार्थ साधणाऱ्या आप्त इष्टांपेक्षा फार थोर आहे.

निषेव्यमाणानि वचांसि येषां ।
जीवस्य कुर्वन्त्यजरामरत्वम् ॥
नाराधनीया गुरवः कथं ते ।
विभीरुणा संसृतिराक्षसीतः ॥ ५३ ॥

अर्थ— ज्यांच्या उपदेशाप्रमाणें वागलें असतां जीवाला अजरामरत्व प्राप्त होतें, त्या गुरूंची सेवा संसाररूपी राक्षसीपासून भिणाऱ्या मनुष्यानें करावयास नको काय? अवश्य केली पाहिजे.

मातापितृज्ञातिनराधिपाद्या ।
जीवस्य कुर्वन्त्युपकारजातम् ॥
यत्सूरिदत्तामलधर्मनुन्ना- ।
स्तेनैष तेभ्योऽतिशयेन पूज्यः ॥ ५४ ॥

अर्थ— आई, बाप, जातींतील लोक, राजा वगैरे मंडळी भव्य जीवावर जे उपकार करतात त्याचें कारण हें आहे कीं, गुरु भव्यजीवाला जो सद्धर्म देतो त्या सद्धर्मामुळें त्यांची तसें करण्याविषयीं प्रवृत्ति होते. म्हणून गुरु हा त्या सर्वांपेक्षां अतिशय पूज्य आहे.

निषेवमाणो गुरुपादपद्मं ।
त्यक्तान्यकर्मा न करोति धर्मम् ॥
प्ररूढसंसारवनक्षयाग्निं ।
निरर्थकं जन्म नरस्य तस्य ॥ ५५ ॥

अर्थ— जो मनुष्य दुसरे सर्व व्यवहार सोडून देऊन गुरूच्या चरणकमलाची सेवा करतो आणि वृद्धिंगत झालेल्या ह्या संसाररूपी अरण्याचा नाश करणारा अग्नीच कीं काय अशा धर्माचें मात्र सेवन करीत नाहीं त्या मनुष्याचें जगणें व्यर्थ होय!

यं सूरयो धर्मधिया दधन्ते ।
यं बान्धवाः स्वार्थधिया जनानाम् ॥

अर्थे तयोरन्तरमत्र वेद्यं ।
सताऽणुमेर्वोरिव जायमानम् ॥ ५६ ॥

अर्थ— ह्या जगांत आचार्य हे धर्मबुद्धीनें ज्या वस्तूचें ग्रहण करतात, आणि जीवाचे बंधुगण स्वार्थबुद्धीनें ज्या वस्तूचें ग्रहण करतात, त्या दोन वस्तूंमध्यें उत्पन्न होणारें अंतर परमाणु आणि मेरुपर्वत ह्यांसारखें आहे; असें शहाण्या मनुष्यानें समजावें. म्हणजे आचार्य जी वस्तु स्वीकारतात, ती मेरूएवढी मोठी आहे; आणि लोक जी वस्तु ( द्रव्यपुत्रादिक ) स्वीकारतात, ती कसपटाप्रमाणें तुच्छ आहे; असें जाणावें.

लक्ष्मीं करीन्द्रश्रवणास्थिरां च ।
तृणाग्रतोयस्थिति जीवितव्यम् ॥
विनश्वरं यौवनकं च दृष्ट्वा ।
धर्मं न कुर्वन्ति कथं महान्तः ॥ ५७ ॥

अर्थ— लक्ष्मी ही हत्तीच्या कानाप्रमाणें चंचल आहे, जीवित हें गवताच्या शेंड्याला पाण्याच्या बिंदूप्रमाणें आहे, आणि तारुण्य हें नाशवंत आहे, असें पाहून बुध्दिमान् लोक धर्माचरण कसें बरें करीत नाहींत? मोठें आश्चर्य आहे!

अनश्वरीं यो विदधाति लक्ष्मीं ।
विधूय सर्वां विपदं क्षणेन ॥
कथं स धर्मः क्रियते न सद्भि- ।
स्त्याज्येन देहेन मलालयेन ॥ ५८ ॥

अर्थ—सर्व प्रकारची विपत्ति एका क्षणांत नाहींशी करून जो अविनाशी अशी संपत्ति प्राप्त करून देतो तो धर्म सज्जन लोक-

पातकांचें घरच कीं काय, अशा ह्या केव्हां तरी अवश्य टाकाव्या लागणाऱ्या शरीराच्या योगानें–का बरें करीत नाहींत?

पिण्डं ददाना न नियोजयन्ति ।
कलेवरं भृत्यमिवात्मनीने ॥
कार्ये सदा ये चरितोपकारे ।
ते वञ्चयन्ति स्वयमेव मूढाः ॥ ५९ ॥

अर्थ— चाकराप्रमाणें अन्न घालून पोषण केलेलें हें शरीर जे लोक आत्म्याला सुख देणाऱ्या कृत्यांत सर्वदा योजीत नाहींत ते मूर्ख लोक स्वतालाच फसवीत आहेत!

गृहाङ्गजापुत्रकलत्रमित्र- ।
स्वस्वामिभृत्यादिपदार्थवर्गे ॥
विहाय धर्मं न शरीरभाजा- ।
मिहास्ति किञ्चित्सहगामि पथ्यम् ॥ ६० ॥

अर्थ— ह्या लोकांत गृह, कन्या, पुत्र, स्त्री, मित्र, राजा, चाकर वगैरे मंडळींत धर्मावांचून जीवाचें कल्याण करणारें व त्याच्या बरोबर येणारें दुसरें कोणी नाहीं.

घातिक्षयोद्भूतविशुद्धबोध- ।
प्रकाशविद्योतितसर्वतत्त्वाः ॥
भवन्ति धर्मेण जिनेन्द्रचन्द्रा- ।
स्त्रिलोकनाथार्चितपादपद्माः ॥ ६१ ॥

अर्थ— घातिकर्मांचा नाश केल्यामुळें उत्पन्न झालेल्या शुद्ध अशा केवलज्ञानाच्या योगानें ज्यांनीं सर्व तत्त्वें प्रकाशित केलीं आहेत असे जिनेंद्ररूपी चंद्र धर्माच्या योगानेंच त्रैलो-

वर्गाचे अधिपति सुद्धां ज्यांच्या चरणकमलांची पूजा करीत आहेत असे होतात.

आराध्यमानस्त्रिदशैरनेकै- ।
विराजते स्वैः प्रतिबिम्बकैर्वा ॥
धर्मप्रसादेन निलिम्पराजः ।
सुराङ्गनावक्त्रसरोजभृङ्गः ॥ ६२ ॥

अर्थ— अनेक प्रकारचे देव स्वतः किंवा आपल्या प्रतिबिंबाच्या योगानें ज्याची सेवा करीत आहेत असा व देवांगनांच्या मुखकमलावरील भ्रमरच कीं काय असा देवेंद्र धर्माच्या प्रसादानेंच शोभत आहे.

द्वात्रिंशदुर्वीशसहस्रमूर्ध- ।
प्रसूनमालापिहिताङ्घ्रियुग्मः ॥
धर्मेण राज्यं विदधाति चक्री ।
विडम्बमानस्त्रिदशेन लीलाम् ॥ ६३ ॥

अर्थ— बत्तीस हजार पृथ्वीपतींच्या मस्तकांवरील पुष्पमालांनीं ज्याचें चरणयुग्म आच्छादित झालें आहे असा चक्रवर्ती राजा, देवेंद्राप्रमाणें क्रीडा करणारा असा होत्साता धर्माच्या योगानेंच सर्व राज्य आपल्या ताब्यांत ठेवीत असतो.

मनोभवाक्रान्तविदग्धरामा- ।
कटाक्षलक्षीकृतकान्तकायः ॥
दिगङ्गनाव्यापितशुद्धकीर्ति- ।
र्धर्मेण राजा भवति प्रतापी ॥ ६४ ॥

अर्थ— ज्याच्या सुंदरशरीरावर मदनानें व्याप्त झालेल्या सुंदरी स्त्रिया आपले नेत्रकटाक्ष फेंकीत आहेत असा आणि

अन्यथा शुद्धकीर्तीनें ज्यानें दिक्कन्यकांचे देह व्यापून टाकिले आहेत असा राजा, धर्माच्या योगानेंच पराक्रमी होतो.

मतङ्गजा जङ्गमशैललीला-।
स्तुरङ्गमा निर्जितवायुवेगाः ॥
पदातयः शक्रपदातिकल्पा ।
रथा विवस्वद्रथसन्निकायाः ॥ ६५ ॥
योषाश्च शोभाजितदेवयोषा ।
निलिम्पवासप्रतिमा निवासाः ॥
अनन्यलभ्या धनधान्यकोशा ।
भवन्ति धर्मेण पुरार्जितेन ॥ ६६ ॥

अर्थ— चालणाऱ्या पर्वतासारखे हत्ती, वायूच्या वेगाला जिंकणारे असे घोडे, इंद्राच्या सैन्यांतल्या सारखे पायदळांतील लोक, सूर्याच्या रथासारखे रथ, आपल्या सुंदरपणानें देवांगनांच्या शोभेला जिंकणाऱ्या स्त्रिया, स्वर्गांतील मंदिराप्रमाणें सुशोभित मंदिरें, आणि दुसऱ्याला न प्राप्त होणारीं अशीं धनधान्यांचीं कोठारें हे पदार्थ आपण पूर्वजन्मांत आचरण केलेल्या धर्माच्या योगानेंच मनुष्याला प्राप्त होतात.

परेऽपि भावा भुवने पवित्रा ।
भवन्ति पुण्यैर्न विना जनस्य ॥
विना मृणालैः ( हि नालैः ) क्वचनापि दृष्टाः ।
सम्पद्यमाना न पयोजखण्डाः ॥ ६७ ॥

अर्थ— त्रिभुवनांत पवित्र अशा दुसऱ्या देखील वस्तु पुण्यावांचून मनुष्याला प्राप्त होत नाहींत. बरोबरच आहे.

कारण, देंठावांचून उत्पन्न झालेलें कमलवन कोठेंतरी दृष्टीस पडलें आहे काय?

**स्वपूर्वलोकानुचितोऽपि धर्मो ।**
**ग्राह्यः सतां चिन्तितवस्तुदायी ॥**
**प्रप्रार्थयन्ते न किमीश्वरत्वं ।**
**स्वजात्ययोग्यं जनताः सदाऽपि ॥ ६८ ॥**

अर्थ – आपल्याला इष्ट असलेल्या वस्तु देणारा धर्म आपल्या पूर्वजांना अप्रिय असला तरी सज्जनांनीं त्याचा अवश्य स्वीकार करावा. कारण, आपल्या जातीला अयोग्य अशा प्रकारचाही राजेपणा आपल्याला प्राप्त होण्याची सर्व लोक नेहमीं इच्छा करीत नाहींत काय?

**त्यजन्त्यनूकागतमप्यवद्यं ।**
**सम्प्राप्य पुण्यं जनयाचनीयम् ॥**
**कुष्ठं कुलायातमपि प्रवीणाः ।**
**कल्पत्वमासाद्य परित्यजन्ति ॥ ६९ ॥**

अर्थ— दुसरे ज्याची इच्छा करतात असें पुण्य संपादन करून पुण्यवान् लोक कुलपरंपरागत असें निंद्यकृत्य टाकून देतात. बरोबर आहे, कारण, शहाणे लोक कुलपरंपरेनें चालत आलेला असाही कुष्ठरोग कांहींतरी उपाय करून काढून टाकतात.

**मूर्खापवादत्रसनेन धर्मं ।**
**मुञ्चन्ति सन्तो न बुधार्चनीयम् ॥**
**ततो हि दोषः परमाणुमात्रो ।**
**धर्मव्युदासे गिरिराजतुल्यः ॥ ७० ॥**

अर्थ-- मूर्ख लोकांच्या दुर्वादापासून होणाऱ्या त्रासानें सज्जन लोक विद्वानांना मान्य असलेला धर्म कधींही सोडीत नाहींत. कारण, धर्माचरण करून जर थोडासा दोष घडला, तर, तोच दोष धर्माचा त्याग केला असतां मेरु पर्वतायेवढा होतो.

निखिलसुखफलानां कल्पने कल्पवृक्षं ।
कुमतमतिविभीता ये विमुञ्चन्ति धर्मम् ॥
विमलमणिनिधानं पावनं दुष्टतुष्टयै ।
स्फुटमपगतबोधाः प्राप्य ते वर्जयन्ति ॥७१॥

अर्थ-- कुमतांतील तर्कवादानें भ्यालेले असे जे लोक सर्वप्रकारच्या सुखरूपी फलांना देणारा कल्पवृक्षच कीं काय! अशा सद्धर्माचा त्याग करतात, ते मूर्ख लोक पवित्र असा उत्तम रत्नांचा ठेवा सांपडला असतां दुष्ट लोकांच्या संतोषाकरितां त्याचा त्याग करतात, असें समजावें.

अमरनरविभूतिं यो विधायार्चनीयां ।
नयति निरपवादां लिलया मुक्तिलक्ष्मीम् ॥
अमितगतिजिनेशः सेव्यतामेष धर्मः ।
शिवपदमनवद्यं लब्धुकामैरकामैः ॥ ७२ ॥

अर्थ-- जो धर्म जीवाला देव आणि मनुष्य ह्या दोघांनीं पूज्य अशी संपत्ति प्राप्त करून देऊन त्याला निर्दोष अशा मोक्षलक्ष्मीची सहज प्राप्ति करून देतो, तो हा (पुढें वर्णन केलेला) श्री अमितगति जिनेंद्रानें उपदेश केलेला धर्म मोक्षाची इच्छा करणाऱ्या वैराग्यशील लोकांनीं अवश्य आचरण करावा.

इत्यमितगतिकृतश्रावकाचारे प्रथमः परिच्छेदः ॥ १ ॥

---

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

॥ द्वितीयः परिच्छेदः ॥

**मिथ्यात्वं सर्वदा हेयं धर्मं वर्धयता सता ॥**
**विरोधो हि तयोर्बाढं मृत्युजीवितयोरिव ॥ १ ॥**

अर्थ— धर्माची वृद्धि करणाऱ्या सज्जनानें मिथ्यात्व नेहमीं टाकलें पाहिजे. कारण, ज्याप्रमाणें मृत्यु आणि जीवित ह्यांचा अत्यंत विरोध आहे, त्याप्रमाणें मिथ्यात्व आणि धर्म ह्यांचा अत्यंत विरोध आहे.

**संयमा नियमाः सर्वे नाश्यन्ते तेन पावनाः ॥**
**क्षयकालानलेनेव पादपाः फलशालिनः ॥ २ ॥**

अर्थ— प्रलयकालचा अग्नि जसा फलांनीं युक्त वृक्षांचा नाश करतो त्याप्रमाणें मिथ्यात्व हें पवित्र अशा सर्व संयमांचा आणि नियमांचा नाश करतें.

**अतत्त्वमपि पश्यन्ति तत्त्वं मिथ्यात्वमोहिताः ॥**
**मन्यन्ते तृषितास्तोयं मृगा हि मृगतृष्णिकाम् ॥ ३**

अर्थ— मिथ्यात्वानें मोहित झालेले जीव, जें तत्व नव्हे त्यालाही तत्त्व असें मानतात. बरोबरच आहे. कारण, तृषित झालेले हरिण मृगतृष्णेलाच पाणी असें समजतात.

**विभ्रान्ता क्रियते बुद्धिर्मनोमोहनकारिणा ॥**
**मिथ्यात्वेनोपयुक्तेन मद्येनेव शरीरिणः ॥ ४ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें मद्य प्राशन केल्यानें मनुष्याची बुद्धि भ्रांत होते, त्याप्रमाणें मनाला मोह करणाऱ्या मिथ्यात्वाच्या योगानें जीवाची बुद्धि भ्रांत होते.

**पदार्थानां जिनोक्तानां तदश्रद्धानलक्षणम् ॥**
**ऐकान्तिकादिभेदेन सप्तभेदमुदाहृतम् ॥ ५ ॥**

अर्थ— श्रीजिनेंद्रांनीं प्रतिपादन केलेल्या तत्त्वांवर अश्रद्धान करणें हें त्या मिथ्यात्वाचें लक्षण आहे. आणि एकांतमिथ्यात्व वगैरे त्याचे सात भेद आहेत.

**क्षणिकोऽक्षणिको जीवः सर्वदा सगुणोऽगुणः ॥**
**इत्यादिभाषमाणस्य तदैकान्तिकमिष्यते ॥ ६ ॥**

अर्थ— जीव केव्हांही क्षणिकच आहे असें ह्मणणें, किंवा जीव नित्य आहे असें ह्मणणें, अथवा जीव सगुण आहे असें ह्मणणें, अगर जीव निर्गुणच आहे असें ह्मणणें ह्याला एकांत-मिथ्यात्व ह्मणतात.

**सर्वज्ञेन विरागेण जीवाजीवादि भाषितम् ॥**
**तथ्यं न वेति संकल्पो दृष्टिः सांशयिकी मता ॥७**

अर्थ— वीतराग सर्वज्ञ अशा जिनेश्वरानें सांगितलेलें जीव अजीव वगैरे तत्त्व खरें कीं खोटें? अशाप्रकारचा जो संशय उत्पन्न होतो, त्याला संशयमिथ्यात्व ह्मणतात.

**आगमा लिंगिनो देवा धर्माः सर्वे सदा समाः ॥**
**इत्येषा कथ्यते बुद्धिः पुंसो वैनयिकी जिनैः ॥ ८ ॥**

अर्थ— देव, धर्म, गुरु आणि शास्त्र हे सगळे ( सदोष असोत कीं निर्दोष असोत ) सारखेच होत; अशी जी मनुष्याची बुद्धि, तिला विनयमिथ्यात्व ह्मणावें, असें जिनांनीं सांगितलें आहे.

**पूर्णः कुहेतुदृष्टान्तैर्न तत्त्वं प्रतिपद्यते ॥**
**मण्डलश्चर्मकारस्य भोज्यं चर्मलवैरिव ॥ ९ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें चामड्याच्या बारीक तुकड्यांनीं भरलेलें

अन्न हें वास्तविक अन्न नव्हे, त्याप्रमाणें वाईट हेतु आणि दृष्टांत ह्यांनीं भरलेला ग्रंथ हा खरा ग्रंथ नव्हे.

**अतथ्यं मन्यते तथ्यं विपरीतरुचिर्जनः ॥**

**दोषातुरमनास्तिक्तं ज्वरीव मधुरं रसम् ॥ १० ॥**

अर्थ— रागादि दोषांनीं ज्यांचें मन पीडित झालें आहे असा विपरीत श्रद्धान करणारा मनुष्य—ज्याप्रमाणें ज्वरित मनुष्य मधुररसाला कडू मानतो त्याप्रमाणें- खोट्यास खरें मानतो.

**दीनो निसर्गमिथ्यात्वस्तत्त्वातत्त्वं न बुध्यते ॥**

**सुन्दरासुन्दरं रूपं जात्यन्ध इव सर्वदा ॥ ११ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें उत्पन्न होतांनाच अंधळा असलेला मनुष्य चांगलें वाईट रूप केव्हांच जाणत नाहीं, त्याप्रमाणें बिचारा स्वभावतःच मिथ्यात्वी असलेला मनुष्य खरें खोटें जाणत नाहीं.

**देवो रागी यतिः सङ्गी धर्मः प्राणिनिशुम्भनम् ॥**

**मूढदृष्टिरिति ब्रूते युक्तायुक्ताविवेचकः ॥ १२ ॥**

अर्थ— योग्यायोग्याचा विचार ज्याला होत नाहीं असा मूढदृष्टि मनुष्य विषयांवर प्रेम करणाऱ्याला देव ह्मणतो, परिग्रह बाळगणाऱ्याला यति ह्मणतो, आणि पशुवध करणें ह्याला धर्म ह्मणतो.

**सप्तप्रकारमिथ्यात्वमोहितेनेति जन्तुना ॥**

**सर्वं विषाकुलेनेव विपरीतं विलोक्यते ॥ १३ ॥**

अर्थ— विषानें ज्याचें सर्व अंग व्याकुल झालें आहे अशा जीवाला ज्याप्रमाणें सर्व विरुद्ध दिसूं लागतें त्याप्रमाणें ह्या सात प्रकारच्या मिथ्यात्वानें मोहित झालेल्या जीवाला वरीलप्रमाणें सर्व विपरीत भासूं लागतें.

**न तत्त्वं रोचते जीवः कथ्यमानमपि स्फुटम् ॥**
**कुधीरुक्तमनुक्तं वा निसर्गेण पुनः परम् ॥ १४ ॥**

अर्थ— तो दुर्बुद्धि असा मिथ्यात्वी जीव खरें तत्त्व स्पष्टपणें सांगितलें असतांही त्यावर श्रद्धान करीत नाहीं. त्यामुळें त्याला तें उत्तम तत्त्व सांगिलेंतरी, स्वभावतःच न सांगितल्याप्रमाणें होतें.

**पठन्नपि वचो जैनं मिथ्यात्वं नैव मुञ्चति ॥**
**कुदृष्टिः पन्नगो दुग्धं पिबन्नपि महाविषम् ॥ १५ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें सर्प दुग्धप्राशन करूनही आपल्यामध्यें असलेलें विष टाकून देत नाहीं; त्याप्रमाणें कुदृष्टी जीव श्रीजिनांनीं उपदेशिलेल्या शास्त्राचें पठण करूनही मिथ्यात्व सोडीत नाहीं.

**उदये दृष्टिमोहस्य मिथ्यात्वं दुःखकारणम् ॥**
**घोरस्य सन्निपातस्य पंचत्वमिव जायते ॥ १६ ॥**

अर्थ— भयंकर अशा संन्निपातज्वरापासून जसा मृत्यु प्राप्त होतो, तसें दर्शनमोहनीयकर्माचा उदय झाला असतां दुःखाला कारणीभूत असें मिथ्यात्व उत्पन्न होतें.

**बहु बध्नाति यः कर्म स्तोकं भुंक्ते कुदर्शनः ॥**
**स भवारण्यदुःखेभ्यो विमोक्षं लप्स्यते कथम् ॥१७**

अर्थ— जो कुदृष्टि जीव पुष्कळ कर्म करतो व त्यांतील थोडें भोगतो, त्याला ह्या संसाररूपी अरण्यांत प्राप्त होणाऱ्या दुःखापासून मुक्ति कशी बरें प्राप्त होईल? मुळींच होणार नाहीं.

**अञ्जलिं पचमानस्य पुरुषस्य दिने दिने ॥**
**धान्यस्य गृह्णतः खारीं कदा धान्यविमुक्तता ॥१८।**

अर्थ— वरील म्हणण्याला उदाहरण असें कीं– जो मनुष्य

खंडीच्या खंडी धान्य विकत घेतो, आणि त्यापैकीं रोज एक ओंजळभर धान्य शिजवितो, त्याचें सर्व धान्य संपून तो त्यांतून मोकळा कधीं होईल बरें?

**न वक्तव्यमिति प्राज्ञैः कदाचन यतो भवी ॥**
**कर्म भुंक्ते बहु स्तोकं स्वीकरोति विसंशयम् ॥१९॥**

अर्थ— संसारी जीव थोडें कर्म करतो आणि पुष्कळ कर्मांचा उपभोग करतो, असें शहाण्या मनुष्यानें केव्हांही म्हणूं नये. कारण, वर सांगितलेली गोष्ट निःसंशय खरी आहे.

**अन्यथैकेन जीवेन सर्वेषां कर्मणां ग्रहे ॥**
**सर्वेषां जायतेऽन्येषां न कथं मुक्तिसङ्गतिः ॥ २० ॥**

अर्थ— असें जर नसेल तर, एका जीवानें सर्वांचीं कर्में उपभोगाकरितां आपल्याकडे घेतलीं असतां बाकीच्या सर्व जीवांना मोक्षप्राप्ति झाली पाहिजे, असें कां बरें होत नाहीं?

**समस्तानां तथैकेन पुद्गलानां ग्रहेऽङ्गिना ॥**
**अनन्तानन्तकालेन न बन्धः सान्तरः कथम् ॥२१॥**

अर्थ— तसेंच एका जीवानें सर्वजीवांच्या पुद्गलांचें ( ज्या पुद्गलामुळें जीवाला बंध होतो त्या पुद्गलांचें ) ग्रहण केलें असतां बाकीच्या जीवांना जो बंध उत्पन्न व्हावयाचा तो अनंतानंतकालानें व्यवहित कां बरें होत नाहीं? तात्पर्य- कर्में थोडीं असून त्यांचा उपभोग अधिक होतो, असें जर होईल, तर, सर्वजीवांना बंध उत्पन्न करणाऱ्या पुद्गलांचें ग्रहण एक जीवही करूं शकेल. असें झाल्यावर बाकीचे जीव सहजच मुक्त झाले. मग त्यांना कर्मबंध व्हावयाचा असल्यास तो अनंतानंत कालानें व्हावयास पाहिजे होता. तसें तर दिसत नाहीं. कारण, जीव अनंतानंत-

कालपर्यंत बंधांतच असलेले दिसतात. ह्मणून, कर्मे थोडें आणि त्याचा उपभोग अधिक असें ह्मणणें चुकीचें ठरतें.

**सस्यानीवोषरक्षेत्रे निक्षिप्तानि कदाचन ॥**
**न व्रतानि प्ररोहन्ति जीवे मिथ्यात्ववासिते ॥२२॥**

अर्थ— ज्याप्रमाणें क्षारयुक्त असलेल्या जमिनींत पेरलेलीं धान्यें उगवत नाहींत; त्याप्रमाणें मिथ्यात्वाचा संस्कार ज्यांच्यावर पूर्ण झाला आहे अशा जीवांच्या ठिकाणीं व्रतें टिकत नाहींत.

**मिथ्यात्वेनानुविध्दस्य शल्येनेव महीयसा ॥**
**समस्तापन्निदानेन जायते निर्वृतिः कुतः ॥ २३ ॥**

अर्थ— जसें भाल्याचें मोठें टोंक अंगांत शिरून आंतच राहिलें असतां सुख होत नाहीं, त्याप्रमाणें सर्व दुःखाला कारणीभूत असलेल्या मिथ्यात्वानें युक्त असलेल्या जीवाला तरी कसें सुख उत्पन्न होईल बरें? मुळींच होत नाहीं.

**षोढाऽनायतनं जन्तोः सेवमानस्य दुःखदम् ॥**
**अपथ्यमिव रोगित्वं मिथ्यात्वं परिवर्धते ॥ २४ ॥**

अर्थ— दुःख देणाऱ्या अशा सहा अनायतनांचें सेवन करणाऱ्या जीवाचें मिथ्यात्व, अपथ्यानें जसा रोग वाढतो त्याप्रमाणें वाढत असतें.

**मिथ्यादर्शनविज्ञानचारित्रैः सह भाषिताः ॥**
**तदाधारा जनाः पापाः षोढाऽनायतनं जिनैः ॥२५॥**

अर्थ— मिथ्यादर्शन, मिथ्याज्ञान, मिथ्याचारित्र, आणि त्यांना आश्रयभूत असलेले तीन प्रकारचे जीव ह्मणजे मिथ्या दर्शनी जीव, मिथ्याज्ञानीजीव आणि मिथ्याचारीत्री जीव, हे

सहा फार दुष्ट आहेत. असें श्रीसर्वज्ञमुनींनीं सांगितलें आहे. हींच सहा अनायतनें होत.

एकैकं वा त्रयो द्वे द्वे रोचन्ते न परे त्रयः ॥
एकस्त्रीणीति जायन्ते सप्ताप्येते कुदर्शनाः ॥२६॥

अर्थ— सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान आणि सम्यक्चारित्र ह्यांतील एक एक ज्यांना आवडत नाहीं असे तीन, दोन दोन ज्यांना आवडत नाहींत असे तीन, आणि तिन्हींही ज्याला आवडत नाहींत असा एक, हे सातही प्रकारचे जीव मिथ्यादृष्टि होत. ह्याचें तात्पर्य असें कीं, कित्येक लोक दर्शन आणि ज्ञान ह्या दोन्हीला मोक्षमार्ग असें समजतात. कित्येक ज्ञान आणि चारित्र ह्या दोन्हीला मोक्षमार्ग समजतात. आणि कित्येक दर्शन आणि चारित्र ह्या दोन्हीला मोक्षमार्ग असें समजतात. असे हे तीन प्रकारचे जीव आहेत. तसेंच कित्येक सम्यग्दर्शनाला मोक्षमार्ग समजतात. कित्येक सम्यग्ज्ञानाला मोक्षमार्ग समजतात. आणि कित्येक सम्यक्चारित्राला मोक्षमार्ग असें समजतात, असे हे तीन प्रकारचे लोक आहेत. आणि कित्येक सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान आणि सम्यक्चारित्र ह्या तिन्हीला मोक्षमार्ग समजत नाहींत. मिळून असे हे सात प्रकारचे जीव झाले. हे सातही प्रकारचे जीव मिथ्यादृष्टि होत.

दवीयः कुरुते स्थानं मिथ्यादृष्टिरभीप्सितम् ।
अन्यत्र गमकारीव घोरैर्युक्तो व्रतैरपि ॥ २७ ॥

अर्थ— मिथ्यादृष्टि जीव भयंकर व्रतें आचरण करणारा जरी असला, तथापि ज्याप्रमाणें एखाद्या ठिकाणीं निघालेला मनुष्य योग्य मार्ग सोडून दुसऱ्या मार्गानें जाऊं लागल्यानें तें

स्थान त्याला लांब होतें, त्याप्रमाणें तो आपल्याला इष्ट असलेलें जें मोक्षस्थान तें अशा रीतीनें फार दूर करतो.

न मिथ्यात्वसमः शत्रुर्न मिथ्यात्वसमं विषम् ॥
न मिथ्यात्वसमो रोगो न मिथ्यात्वसमं तमः॥२८

अर्थ— मिथ्यात्वासारखा दुसरा शत्रु नाहीं, मिथ्यात्वासारखें दुसरें विष नाहीं, मिथ्यात्वासारखा दुसरा रोग नाहीं, आणि मिथ्यात्वासारखें दुसरें अज्ञान नाहीं.

द्विषद्विषतमोरोगैर्दुःखमेकत्रजायते ॥
मिथ्यात्वेन दुरन्तेन जन्तोर्जन्मनि जन्मनि ॥२९॥

अर्थ— शत्रु, विष, अज्ञान आणि रोग ह्यांच्यामुळें जीवाला जें दुःख होतें, तें एकाच जन्मांत होतें. परंतु, ज्याचा परिणाम फार वाईट आहे, अशा मिथ्यात्वानें जीवाला प्रत्येक जन्मांत दुःख होतें.

वरं ज्वालाकुले क्षिप्तो देहिनाऽऽत्मा हुताशने ॥
न तु मिथ्यात्वसंयुक्तं जीवितव्यं कथञ्चन ॥३०॥

अर्थ— जीवानें आपला देह ज्वालांनीं व्याप्त झालेल्या अग्नींत जरी टाकला; तथापि तें बरें! पण मिथ्यात्वानें युक्त असून जगणें केव्हांही बरें नाहीं.

पापे प्रवर्त्यते येन येन धर्मान्निवर्त्यते ॥
दुःखे निक्षिप्यते येन तन्मिथ्यात्वं न शान्तये ॥३१

अर्थ— ज्याच्या योगानें पापाच्या ठिकाणीं प्रवृत्ति होते, ज्याच्या योगानें धर्मापासून निवृत्ति होते, आणि ज्याच्या योगानें जीवाला दुःखांत टाकिलें जातें. तें मिथ्यात्व केव्हांही शांति देणारें होत नाहीं.

क्षेत्रस्वभावतो घोरा निरन्ता दुःसहाश्चिरम् ॥
विविधा दुर्दशाः श्वभ्रे कायमानससम्भवाः ॥३२॥

अर्थ- मिथ्यात्वामुळें प्राप्त होत असलेल्या नरकांत जीवाच्या दुर्दशा होतात, त्यांत ज्यांचा अंत नाहीं अशा भयंकर व दुःसह अशा प्रकारच्या कित्येक दुर्दशा त्या भूमीचा गुण म्हणूनच होतात. कित्येक शरीरामुळें उत्पन्न होतात, कित्येक मनापासून उत्पन्न होतात. अशा त्या अनेक प्रकारच्या असून चिरकाल होणाऱ्या अशा असतात.

दोहवाहाङ्कनाच्छेदशीतवातादिगोचराः ॥
परायत्तेषु तिर्यक्षु विवेकरहितात्मसु ॥ ३३ ॥

अर्थ-- ज्यांना कोणत्याही प्रकारचा विचार नाहीं अशा व पराधीन असलेल्या अशा तिर्यग्जीवांच्या ठिकाणीं धार काढणें, ओझें लादणें, कापणें वगैरेपासून होणारीं व थंडी वारा इत्यादिकांपासून होणारीं अशीं अनेक दुःखें दृष्टी पडतात.

दैन्यदारिद्र्यदौर्भाग्यरोगशोकपुरस्सराः ॥
आर्यम्लेच्छप्रकारेषु मानुषेषु निरन्तराः ॥ ३४ ॥

अर्थ-- आर्य आणि म्लेंच्छ ह्या दोन्ही प्रकारच्या मनुष्यजीवांच्या ठिकाणीं दीनपणा, दरिद्रीपणा, दुर्दैवीपणा, रोग, शोक इत्यादिकांपासून नेहमीं होणारीं अनेक दुःखें दृष्टी पडतात.

स्वस्य हानिं परस्यर्द्धिमीक्षमाणेषु मानिषु ॥
योज्यमानेषु देवेषु हठतः प्रेष्यकर्मणि ॥ ३५ ॥
मिथ्यात्वेन दुरन्तेन विधीयन्ते शरीरिणाम् ॥
वेदना दुःश्रवा भीमा वैरिणेव दुरात्मना ॥ ३६ ॥

अर्थ —मानी असे देव आपला नाश आणि दुसऱ्याचा

उत्कर्ष पाहूं लागले असतां व बलात्कारानें सेवा करण्याच्या कामावर त्यांची योजना केली असतां, दुःखें भोगतात. ह्या प्रमाणें ज्याचा शेवट वाईट आहे अशा मिथ्यात्वानें दुष्ट अशा शत्रूनें ज्याप्रमाणें एखाद्याला यातना द्याव्या; त्याप्रमाणें ऐकण्याला सुद्धां कठीण अशा भयंकर यातना जीवाला दिल्या जातात.

यान्यन्यान्यपि दुःखानि संसाराम्भोधिवर्तिनाम् ॥
न जातु यच्छता तेन मिथ्यात्वेन विरम्यते ॥ ३७॥

अर्थ— संसारसमुद्रांत असलेल्या जीवाला जीं दुसरींही कित्येक दुःखें असतात, तीं सर्व दुःखें देणारें असें हें मिथ्यात्व केव्हांही विराम पावत नाहीं.

विवेको हन्यते येन मूढता येन जन्यते ॥
मिथ्यात्वतः परं तस्माद्दुःखदं किमु विद्यते ॥ ३८ ॥

अर्थ— ज्यानें विचार नाहींसा केला जातो व ज्यानें मूढता उत्पन्न केली जाते अशा मिथ्यात्वाहून दुसरें जगांत दुःख देणारें काय आहे.

लब्धं जन्मफलं तेन सार्थकं तस्य जीवितम् ॥
मिथ्यात्वविषमुत्सृज्य सम्यक्त्वं येन गृह्यते ॥ ३९ ॥

अर्थ— ज्या जीवानें मिथ्यात्वाचा त्याग करून सम्यक्त्व ग्रहण केलें जातें, त्यानें आपल्या जन्माचें फल मिळविलें. व त्याचेंच जन्म सार्थक झालें.

भव्यः पञ्चेन्द्रियः पूर्णो लब्धकालादिलब्धिकः ॥
पुद्गलार्धपरावर्ते काले शेषे स्थिते सति ॥ ४० ॥
अन्तर्मुहूर्तकालेन निर्मलीकृत मानसः ॥

आद्यं गृह्णाति सम्यक्त्वं कर्मणां प्रशमे सति ॥ ४१ ॥

अर्थ— पंचेंद्रिय असून पर्याप्तक असलेल्या अशा भव्य जीवाला कालादिलब्धि झाली असतां, आणि शेषकाल अर्ध-पुद्गलपरिवर्तन प्रमाणाचा राहिला असतां तो—अंतर्मुहूर्तकालानें मन निर्मळ करून कर्मांचा उपशम झाला असतां, पहिलें सम्यक्त्व [ उपशमसम्यक्त्व ] ग्रहण करतो.

निशीथं वासरस्येव निर्मलस्य मलीमसम् ॥
पश्चादायाति मिथ्यात्वं सम्यक्त्वस्यास्य निश्चितम्४२

अर्थ-- ज्याप्रमाणें निर्मळ अशा दिवसाच्या मागून मलिन असा रात्रीचा समय प्राप्त होतो; त्याप्रमाणें ह्या उपशमसम्य-क्त्वाच्या मागून मिथ्यात्व निश्चयानें उत्पन्न होतें.

तस्य प्रपद्यते पश्चान्महात्मा कोऽपि वेदकम् ॥
तस्यापि क्षायिकं कश्चिदासन्नीभूतनिर्वृत्तिः ॥ ४३ ॥

अर्थ—नंतर एखादा महात्मा जीव त्या सम्यक्त्वाच्या मागून वेदकसम्यक्त्व ( क्षायोपशमिकसम्यक्त्व ) मिळवितो, आणि मुक्ति ज्याला जवळ प्राप्त झाली आहे असा एखादा जीव त्यानंतर क्षायिकसम्यक्त्व संपादन करितो.

लब्धशुद्धपरिणामः कल्मषस्थितिहानिकृत् ॥
अनन्तगुणया शुध्द्या वर्धमानः क्षणे क्षणे ॥ ४४ ॥
प्रकृतीनामशस्तानामनुभागस्य खर्वकः ॥
वर्धकः पुनरन्यासां युक्तायुक्तविवेचकः ॥ ४५ ॥
स्थितेऽन्तःकोटिकोटीकस्थितिके सति कर्मणि ॥
अधःप्रवृत्तिकं नाम करणं कुरुते पुरा ॥ ४६ ॥

अर्थ — मग त्याला शुद्धपरिणामांची प्राप्ति झाली असल्या-

मुळें तो पापकर्मांच्या स्थितिबंधाचा नाश करून अनंतगुण शुद्धीनें प्रत्येक क्षणीं वृद्धि पावतो. पापप्रकृतीच्या अनुभाग-बंधाचा नाश करतो; आणि पुण्यप्रकृतींची वृद्धि करतो. त्यामुळें त्याच्यामध्यें योग्यायोग्य विचार उत्पन्न होतो. आणि कर्मे अंतःकोडाकोडीच्या स्थितीचें झालें असतां प्रथम अधःप्रवृत्ति नांवाचा आत्मपरिणाम करण्यास सुरवात करतो. ( आत्म्याचे परिणाम– कित्येक पूर्वींच्या सारखे व कित्येक पूर्वींपेक्षां निराळे म्हणजे उच्चप्रतीचे--होणे ह्याला अधःप्रवृत्तिकरण म्हणतात. हें सातव्या गुणस्थानांत होत असून चारित्रमोहनीयकर्मप्रकृतीचा उपशम करणारे आहे. )

अपूर्वकरणं तस्मात्तस्मादप्यनिवृत्तिकम् ॥
विदधाति परीणामशुद्धिकारी क्षणे क्षणे ॥ ४७ ॥

अर्थ— मग क्षणोक्षणीं आपल्या परिणामांची शुद्धि करणारा असा तो जीव त्या अधःप्रवृत्तिकरणापासून अपूर्वकरण नांवाचे आपले परिणाम उत्पन्न करतो. आणि पुढें अपूर्वकरणापासून अनिवृत्तिकरण नांवाचे परिणाम उत्पन्न करतो. ह्यांत अपूर्वक-रण हे परिणाम आठव्या गुणस्थानामध्यें होतात. आणि अनि-वृत्तिकरण हे परिणाम नवव्या गुणस्थानामध्यें होतात.

तत्राद्यकरणे नास्ति च्छेदः स्थित्यनुभागयोः ॥
अनन्तगुणया शुध्द्या कर्म बध्नाति केवलम् ॥४८॥

अर्थ— त्यांत पहिल्या करणांत ( अधःप्रवृत्तिकरणांत ) कर्मा-च्या स्थितिबंधाचा व अनुभागबंधाचा नाश होत नाहीं. अनंत-गुणशुद्धीमुळें फक्त कर्मबंध होतो.

द्वितीये कुरुते तत्र किञ्चित्स्थितिरसक्षयम् ॥

शुभानामशुभानां च वर्धयन् ऱ्हासयन्नसम् ॥४९॥

अर्थ— दुसऱ्या ह्मणजे अपूर्वकरण नांवाच्या परिणामांत शुभकर्माचा अनुभागबंध वाढवून व अशुभकर्माचा अनुभागबंध कमी करून तो जीव कर्माच्या स्थितिबंधाचा व अनुभागबंधाचा थोडासा नाश करतो. ( जीवप्रदेशांत कर्मपुद्गलांच्या स्थितीला स्थितिबंध असें ह्मणतात. त्या कर्मपुद्गलांच्या समुदायात असलेली व जीवाला सुखदुःखरूपी फल उत्पन्न करणारी जी शक्ति, तिच्या न्यूनाधिकपणाला अनुभागबंध असें म्हणतात. )

अन्तर्मुहूर्तिकः कालस्तेषां प्रत्येकमिष्यते ॥
आदिमं कुरुते तस्मिन्नान्तरं करणं परम् ॥ ५० ॥

अर्थ— ह्यांतील प्रत्येक परिणामाला अंतर्मुहूर्तकाल लागतो. त्या कालांत तो जीव पहिलें जें अधःप्रवृत्तिकरण तें करतो. बाकीचीं दोन करीत नाहीं.

प्रशमय्य ततो भव्यः कर्मप्रकृतिसप्तकम् ॥
अन्तर्मुहूर्तिकं पूर्वं सम्यक्त्कं प्रतिपद्यते ॥ ५१ ॥

अर्थ— त्या नंतर तो भव्यजीव सात कर्मप्रकृतींचा उपशम करतो. त्यामुळें त्याला अंतर्मुहूर्तकालपर्यंत पहिल्या सम्यक्त्वाची ( उपशमसम्यक्त्वाची ) प्राप्ति होते.

अन्तरे करणे तत्र युक्त्वाऽनन्तानुबन्धिभिः ॥
अन्तर्मुहूर्तकालेन मिथ्यात्वमपवर्तते ॥ ५२ ॥

अर्थ – त्यानंतर तो जीव त्याच कालांत अनंतानुबंधि अशा क्रोध, मान, माया, लोभ ह्यांनीं अधःप्रवृत्तिकरणांत संबद्ध होतो; आणि त्यामुळें अंतर्मुहूर्तकालानें पुनः त्याच्या ठिकाणीं मिथ्यात्व प्राप्त होतें.

मिथ्यात्वं भिद्यते भेदैः शुद्धाशुद्धविमिश्रितैः ॥
ततः सम्यक्त्वमिथ्यात्वसम्यङ्मिथ्यात्वनामाभिः॥ ५३

अर्थ --मग तें मिथ्यात्व शुद्ध, अशुद्ध आणि मिश्रित असें तीन प्रकारांनीं भिन्न होतें. त्याला सम्यक्त्व, मिथ्यात्व आणि सम्यङ्मिथ्यात्व अशीं नांवें आहेत.

क्षपयित्वा परः कश्चित्कर्मप्रकृतिसप्तकम् ॥
आदत्ते क्षायिकं पूतं सम्यक्त्वं मुक्तिकारणम् ॥५४

अर्थ-- दुसरा एखादा जीव कर्मांच्या सात मूलप्रकृतींचा नाश करून मोक्षाला साधनीभूत असें क्षायिकसम्यक्त्व प्राप्त करून घेतो. ( अनंतानुबंधि क्रोध, मान, माया, आणि लोभ; व सम्यक्त्व, मिथ्यात्व आणि सम्यङ्मिथ्यात्व असे तीन प्रकारचें मिथ्यात्व मिळून ह्या सात कर्मकृति होत. )

प्रशमे कर्मणां षण्णामुदयस्य क्षये सति ॥
आदत्ते वेदकं वन्द्यं सम्यक्त्वस्योदये सति ॥५५॥

अर्थ— एखादा जीव वर सांगितलेल्या सात कर्मप्रकृतींपैकीं सम्यक्त्व सोडून बाकीच्या सहा कर्मप्रकृतींचा क्षय ( उदय न होणें ह्याला क्षय ह्मणतात ) झाला असतां व सम्यक्त्वरूप कर्मप्रकृतीचा उदय झाला असतां पूज्य असें वेदकसम्यक्त्व ( क्षायोपशमिकसम्यक्त्व ) स्वीकारतो.

आदिमं त्रितयं हित्वा गुणेषु सकलेष्वपि ॥
सम्यक्त्वं क्षायिकं ज्ञेयं मोक्षलक्ष्मीसमर्पकम् ॥ ५६

अर्थ— पहिलीं तीन गुणस्थानें सोडून बाकीच्या सर्व गुणस्थानांत मोक्षप्राप्ति करून देणारें असें क्षायिकसम्यक्त्वच असतें.

तुर्यादारभ्य विज्ञेयमुपशान्तान्तमादिमम् ॥

**चतुर्थे पञ्चमे षष्ठे सप्तमे वेदकं पुनः ॥ ५७ ॥**

अर्थ— चवथें जें असंयतगुणस्थान त्यापासून उपशांतकषायगुणस्थानापर्यंत ह्मणजे दहाव्या गुणस्थानापर्यंत सात गुणस्थानांत पहिलें सम्यक्त्व ह्मणजे उपशमसम्यक्त्व असतें. आणि चतुर्थ, पंचम, षष्ठ आणि सप्तम ह्या चार गुणस्थानांत वेदकसम्यक्त्व–( क्षायोपशमिकसम्यक्त्व )–ही पुनः असतें. ह्मणजे ह्या चतुर्थ वगैरे चार गुणस्थानांत उपशमसम्यक्त्व असून क्षायोपशमिकसम्यक्त्वही असतें.

**साध्यसाधनभेदेन द्विधा सम्यक्त्वमिष्यते ॥**
**कथ्यते क्षायिकं साध्यं द्वितीयं साधनं परम् ॥५८॥**

अर्थः— सम्यक्त्व हें साध्य आणि साधन ह्या भेदानें दोन प्रकारचें आहे. त्यांत क्षायिकसम्यक्त्व हें साध्य असून औपशमिक व क्षायोपशमिक सम्यक्त्व हें साधन आहे.

**प्रथमायां त्रयं पृथ्व्यामन्यासु क्षायिकं विना ॥**
**सम्यक्त्वमुच्यते सद्भिर्भवभ्रमणसूदनम् ॥ ५९ ॥**

अर्थ— पहिल्या पृथ्वींत असलेल्या जीवांमध्यें तीनही प्रकारचें ( औपशमिक, क्षायोपशमिक आणि क्षायिक असें तीन प्रकारचें ) सम्यक्त्व असतें. आणि बाकीच्या सर्व भूमींत असलेल्या जीवांमध्यें क्षायिक सम्यक्त्वावांचून बाकीचें दोन प्रकारचें सम्यक्त्व असतें. तें सम्यक्त्व संसाराचा नाश करणारें आहे.

**तिर्यङ्मानवदेवानां सम्यक्त्वात्रितयं मतम् ॥**
**निलिम्पीनां तिरश्चीनां क्षायिकं विद्यते न तु ॥६०॥**

अर्थ–तिर्यंचयोनींतील पुरुष मनुष्यें व देव ह्यांना तीन्ही प्रकारचें

सम्यक्त्व असतें. आणि देवी व तिर्यंच योनींतील स्त्रिया ह्यांना क्षायिकसम्यक्त्व नसतें. बाकीचें दोन्ही प्रकारचें सम्यक्त्व असतें.

क्षायोपशमिकस्योक्ताः षट्षष्ठिर्जलराशयः ॥
अन्तर्मौहूर्तिकी ज्ञेया प्रथमस्य स्थितिः परा ॥ ६१ ॥

अर्थ— क्षायोपशमिकसम्यक्त्वाची उत्तमास्थिति सासष्ठ सागर आहे. आणि पहिल्या ह्मणजे उपशमसम्यक्त्वाची दुसरी स्थिति (जघन्यास्थिति) अंतर्मुहूर्तकालपर्यंत असते, असें समजावें.

पूर्वकोटिद्वयोपेतास्त्रयस्त्रिंशन्नदीशिनः ॥
ईषदूना स्थितिर्ज्ञेया क्षायिकस्योत्तमा बुधैः ॥ ६२॥

अर्थ— क्षायिकसम्यक्त्वाची उत्तम स्थिति दोन कोटी पूर्व आणि तेहेत्तीस सागर ह्यांत थोडा कमी इतका कालपर्यंत असते. ह्मणजे, जीवाला क्षायिकसम्यक्त्व एकदा उत्पन्न झालें ह्मणजे, तें दोन कोटी पूर्व आणि थोडे कमी तेहेत्तीस सागर इतका कालपर्यंत टिकतें. असें सिध्दांत जाणणाऱ्यांचें मत आहे.

अधस्ताच्छ्वभ्रभूषट्के सर्वत्र प्रमदाजने ॥
निकायत्रितये पूर्वे जायते न सुदर्शनः ॥ ६३ ॥

अर्थ— दोनीपासून सातापर्यंतच्या सहा नरकभूमींत, आणि सर्व ठिकाणीं असलेल्या स्त्रियांमध्यें, व भवनवासी, व्यंतर आणि ज्योतिष्क ह्या तीन प्रकारच्या देवांत सम्यग्दृष्टि जीव नाहीं. ह्मणजे, ह्यांतील कोणताही जीव सम्यग्दृष्टि होत नाहीं, आणि सम्यग्दृष्टि असलेला जीव ह्यांपैकीं कोणांत जन्म घेत नाहीं.

पञ्चाक्षं सञ्ज्ञिनं हित्वा परेषु द्वादशेष्वपि ॥
उत्पद्यते न सद्दृष्टिर्मिथ्यात्वबलभाविषु ॥ ६४ ॥

अर्थ— सम्यग्दृष्टि जीव, संज्ञी आणि पंचेंद्रिय हे दोन

प्रकारचे जीवसमूह सोडून बाकीच्या बाराही जीवसमुदायांत उत्पन्न होत नाहीं. कारण, त्या बाराही प्रकारच्या जीवसमूहांत फक्त मिथ्यात्व असतें. सम्यक्त्व मुळींच असत नाहीं. जीवसमूह चवदा प्रकारचे आहेत. ते असे- संज्ञीपर्याप्तक, संज्ञी अपर्याप्तक, पंचेंद्रियपर्याप्तक, पंचेंद्रिय अपर्याप्तक, चतुरिंद्रियपर्याप्तक, चतुरिंद्रिय अपर्याप्तक, त्रींद्रियपर्याप्तक, त्रींद्रिय अपर्याप्तक, द्वींद्रिय पर्याप्तक, द्वींद्रिय अपर्याप्तक, एकेंद्रियसूक्ष्मपर्याप्तक, एकेंद्रियसूक्ष्म अपर्याप्तक, एकेंद्रियबादरपर्याप्तक, एकेंद्रियबादर अपर्याप्तक, असे चवदा प्रकारचे जीव आहेत. त्यांत वरील संज्ञी पर्याप्तक आणि असंज्ञिपंचेंद्रियपर्याप्तक ह्या दोन प्रकारच्या जीवसमासांत (जीवसमूहांत) सम्यग्दृष्टि असतात, आणि बाकींच्यांत नसतात, असें ह्या श्लोकाचें तात्पर्य आहे.

**वीतरागं सरागं च सम्यक्त्वं कथितं द्विधा ॥**
**विरागं क्षायिकं तत्र सरागमपरे द्वयम् ॥ ६५ ॥**

अर्थ— सम्यक्त्व हें वीतराग आणि सराग असें दोन प्रकारचें आहे. त्यांत वीतराग सम्यक्त्व हें क्षायिक सम्यक्त्व होय. आणि राहिलेलें दोन प्रकारचें सम्यक्त्व (उपशमसम्यक्त्व आणि क्षयोपशमसम्यक्त्व) हें सरागसम्यक्त्व होय.

**संवेगप्रशमास्तिक्यकारुण्यव्यक्तिलक्षणम् ॥**
**सरागं पटुभिर्ज्ञेयमुपेक्षालक्षणं परम् ॥ ६६ ॥**

अर्थ— धर्माविषयीं प्रेम, कषायांचा उपशम, आस्तिक्यबुद्धि आणि सर्वजीवांवर दया हे विकार स्पष्ट दिसणें हें सरागसम्यक्त्वाचें लक्षण आहे. आणि सर्वविषयांविषयीं उपेक्षा हें वीतरागसम्यक्त्वाचें लक्षण आहे.

**निसर्गाधिगमौ हेतू तस्य बाह्यावुदाहृतौ ॥**
**लब्धिः कर्मसमाधीनामन्तरङ्गो विधीयते ॥ ६७ ॥**

अर्थ— स्वभाव आणि अधिगम ( परोपदेश ) हीं दोन त्या सम्यक्त्वाचीं बाह्यकारणें आहेत. आणि कर्मसमाधींची ( मोहनीयकर्माचा क्षय, उपशम आणि क्षयोपशम ह्यांची ) लब्धि हें अंतरंग कारण आहे.

**सम्यक्त्वाध्युषिते जीवे नाज्ञानं व्यवतिष्ठते ॥**
**भास्वता भासिते देशे तमसः कीदृशी स्थितिः॥६८॥**

अर्थ— जीवाचे ठिकाणीं सम्यक्त्व उत्पन्न झालें ह्मणजे अज्ञान रहात नाहीं. बरोबरच आहे. कारण, सूर्यानें प्रकाशित केलेल्या प्रदेशांत अंधकाराचें अस्तित्व कसें असावें?

**न दुःखबीजं शुभदर्शनक्षितौ ।**
**कदाचन क्षिप्तमपि प्ररोहति ॥**
**सदाऽप्यनुप्तं सुखबीजमुत्तमं ।**
**कुदर्शनी तद्विपरीतमीक्षते ॥ ६९ ॥**

अर्थ—सम्यग्दर्शनरूप भूमींत दुःखाचें बीज पेरलें तथापि केव्हांही उगवत नाहीं. आणि सुखाचें बीज न पेरतांही सुखरूपी अंकुर उत्पन्न होतात. मिथ्यादृष्टि जीवाला मात्र हें सर्व विपरीत दिसतें.

**सम्यक्त्वमेघः कुशलाम्बु वन्दितं ।**
**निरन्तरं वर्षति धौतकल्मषः ॥**
**मिथ्यात्वमेघो व्यसनाम्बु निन्दितं ।**
**जनावनौ क्षालितपुण्यसञ्चयः ॥ ७० ॥**

अर्थ— सम्यक्त्वरूपी मेघ नेहमीं पूज्य अशा कल्याणरूपी जलाची वृष्टि करतो. आणि पापरूपी चिखल धुवून टाकितो.

आणि मिथ्यात्वरूपी मेघ निंद्य अशा सप्तव्यसनरूपी जलाची वृष्टि जीवरूपी भूमीवर करून पुण्यसंचय धुवून टाकितो.

न भीषणो दोषगणः सुदर्शने ।
विगर्हणीयः स्थिरतां प्रपद्यते ॥
भुजङ्गमानां निवहोऽवतिष्ठते ।
सदा निवासेऽध्युषिते गरुत्मता ॥ ७१ ॥

अर्थ— सम्यग्दर्शन असलें ह्मणजे निंद्य व भयंकर असा दोषांचा समुदाय मुळींच रहात नाहीं. बरोबरच आहे. कारण, गरुड जर सर्वदा घरांत असला तर तेथें सर्पांचा समुदाय राहील काय? केव्हांही रहावयाचा नाहीं.

विवर्धमान यमसंयमादयः ।
पवित्रसम्यक्त्वगुणेन सर्वदा ॥
फलन्ति हृद्यानि फलानि पादपा ।
महोदकेनेव मलापहारिणा ॥ ७२ ॥

अर्थ— पवित्र व पापनाशक अशा सम्यक्त्वाच्या योगानें वृद्धि पावलेले असे यमसंयमादिक गुण-ज्याप्रमाणें पुष्कळ उदकामुळें वृक्ष उत्तम फलें देतात, त्याप्रमाणें-उत्तम फलें (सुख) देतात.

निषेवते यो विषयाभिलाषुको ।
निरस्य सम्यक्त्वमधीः कुदर्शनम् ॥
स राज्यमत्यस्य भुजिष्यतां स्फुटं ।
बृहत्त्वकाङ्क्षी वृणुते दुराशयः ॥ ७३ ॥

अर्थ—मूर्ख आणि विषयाभिलाषी असा जो मनुष्य सम्यक्त्व टाकून मिथ्यात्वाचें सेवन करतो, तो मूर्ख मनुष्य महत्वाच्या इच्छेनें राज्य सोडून देऊन कोणाची तरी चाकरी पतकरतो! असें स्पष्ट दिसतें.

तथ्ये धर्मे ध्वस्तहिंसाप्रपञ्चे ।
देवे रागद्वेषमोहादिमुक्ते ॥
साधौ सर्वग्रन्थसन्दर्भहीने ।
संवेगोऽसौ निश्चलो योऽनुरागः ॥ ७४ ॥

अर्थ— ज्यांत हिंसेचा विस्तार मुळींच नाहीं असा धर्म; राग द्वेष, मोह वगैरे ज्याला नाहींत असा देव; आणि सर्वपरिग्रहाचा ज्यानें त्याग केला आहे असा साधू, ह्यांच्या ठिकाणीं जी निश्चल भक्ति, तिला संवेग असें ह्मणतात.

देहे भोगे निन्दिते जन्मवासे ।
कृष्टेष्वासक्षिप्तबाणास्थिरत्वे ॥
यद्वैराग्यं जायते निष्प्रकम्पं ।
निर्वेगोऽसौ कथ्यते मुक्तिहेतुः ॥ ७५ ॥

अर्थ— ओढलेल्या धनुष्यापासून सोडलेल्या बाणाप्रमाणें अस्थिर असलेला देह, निंद्य असा विषयोपभोग आणि वारंवार जन्म घेणें, ह्यांच्या विषयीं स्थिर असें जें वैराग्य, त्याला निर्वेग असें ह्मणतात. हा निर्वेग मोक्षहेतु आहे.

कान्तापुत्रभ्रातृमित्रादिहेतोः ।
शिष्टाद्विष्टे निर्मिते कार्यजाते ॥
पश्चात्तापो यो विरक्तस्य पुंसो ।
निन्दा सोक्ताऽवद्यवृक्षस्य दात्री ॥ ७६ ॥

अर्थ— स्त्री, पुत्र, बंधु, मित्र इत्यादिकांकरितां आपण जीं जीं निंद्य कर्में केलीं असतील, त्यांच्यासंबंधानें विरक्त जीवाला जो पश्चात्ताप होतो; ती निंदा होय. ही निंदा पापवृक्षाचा नाश करणारी आहे.

जाते दोषे द्वेषरागादिदोषै- ।
रग्रे भक्त्याऽऽलोचना या गुरूणाम् ॥
पश्चाचाराचारकाणामदोषा ।
सोक्ता गर्हा गर्हणीयस्य हन्त्री ॥ ७७ ॥

अर्थ— द्वेष, राग वगैरे कषायामुळें कोणत्याही प्रकारचा दोष झाला असतां पांच प्रकारचा आचार करणाऱ्या गुरूंच्या अग्रभागीं जो विचार होतो त्याला गर्हा असें ह्मणतात. ही गर्हा निंद्यकर्माचा नाश करणारी आहे.

रागद्वेषक्रोधलोभप्रपञ्चाः ।
सर्वानर्थावासभूता दुरन्ताः ॥
यस्य स्वान्ते कुर्वते न स्थिरत्वं ।
शान्तात्माऽसौ कथ्यते भव्यसिंहः ॥७८॥

अर्थ–राग, द्वेष, क्रोध आणि लोभ हे सर्व अनर्थाला कारणीभूत असलेले व दुष्परिणामी असे विकार ज्याच्या अंतःकरणांत स्थिर रहात नाहींत, तो शांत स्वभावाचा जीव भव्याग्रणी होय. असें मुनि ह्मणतात.

लोकाधीशाभ्यर्चनीयाङ्घ्रियुग्मे ।
तीर्थाधीशे साधुवर्गे सपर्या ॥
या निर्व्याजा भाव्यते भव्यलोकै- ।
र्भक्तिः सेष्टा जन्मकान्तारशस्त्री ॥ ७९ ॥

अर्थ-- ज्यांचें चरणयुग लोकाधीशांनीं पूजा करण्यास योग्य आहे अशा तीर्थंकराविषयीं व साधूविषयीं भव्यलोकांनीं जी पूज्यता मानिली जाते ती भक्ति होय. ही भक्ति संसाररूपी अरण्याचा नाश करणारी कुऱ्हाड आहे.

कर्मारण्यं छेत्तुकामैरकामै- ।
धर्माधारैर्व्यावृतिः प्राणिवर्गे ॥
भैषज्याद्यैः प्रासुकैर्विधीयते या ॥
तद्वात्सल्यं कथ्यते तथ्यबोधैः ॥ ८० ॥

अर्थ— कर्मरूपी अरण्याचा नाश करण्याची इच्छा करणाऱ्या निष्काम अशा आणि धर्माला आश्रयभूत असलेल्या अशा जीवांनीं निर्जंतुक अशा औषधादिकांच्या योगानें प्राणिसमुदायाच्या ठिकाणीं जी व्यावृति (सेवा) केली जाते, तिला ज्ञानी असे मुनि वात्सल्य ह्मणतात.

जन्माम्भोधौ कर्मणा भ्राम्यमाणे ।
जीवग्रामे दुःखितेऽनेकभेदे ॥
चित्तार्द्रत्वं यद्विधत्ते महात्मा ।
तत्कारुण्यं दृश्यते दर्शनीयैः ॥ ८१ ॥

अर्थ— ह्या जन्ममरणरूपी संसारसमुद्रांत दुःखित होऊन कर्मामुळें फिरत असलेल्या अनेक प्रकारच्या जीवांवर कोणी तरी महात्मा आपल्या चित्ताची जी स्निग्ध अशी प्रवृत्ति करतो; त्याला सम्यग्दर्शनी लोक कारुण्य समजतात.

प्रवर्ध्यते दर्शनमष्टभिर्गुणैः ।
शरीरिणोऽमीभिरपास्तदूषणैः ॥
गुरूपदेशैरिव धर्मवर्धनं ।
विधीयमानैर्हृदये निरन्तरम् ॥ ८२ ॥

अर्थ— ज्यांच्यामध्यें कोणतेही दोष नाहींत असे गुरूच्या उपदेशाप्रमाणें नेहमीं अंतःकरणांत बाळगलेले जे हे श्रावकाचे मूल आठ गुण, ते धर्माची वृद्धि करणारें असें जीवाचें सम्यक्त्व

वाढवितात. तात्पर्य, श्रावकानें आठ मूलगुण पाळले ह्मणजे त्याचें सम्यग्दर्शन वृद्धि पावतें.

**अपारसंसारसमुद्रतारकं।**
**वशीकृतं येन सुदर्शनं परम्॥**
**वशीकृतास्तेन जनेन सम्पदः।**
**परैरलभ्या विपदामनास्पदम्॥ ८३॥**

अर्थ— अपार अशा ह्या संसारसमुद्रांतून तरून नेणारें असें सम्यग्दर्शन ज्या जीवानें अत्यंत वश करून घेतलें, त्यानें दुसऱ्याला दुर्लभ आणि केव्हांही विपत्ति न येऊं देणाऱ्या अशा सर्व संपत्ति वश केल्या, यांत संशय नाहीं.

**सुदर्शने लब्धमहोदये गुणाः।**
**श्रिया निवासा विकसन्ति देहिनि॥**
**निरस्तदोषापचये सरोवरे।**
**हिमेतरांशाविव पंकजाकराः॥ ८४॥**

अर्थ-- ज्यानें दोषाची वृद्धि प्रतिबंधित केली आहे असें सम्यग्दर्शन उदय पावलें असतां संपत्तीचें निवासस्थान असे गुण, ज्याप्रमाणें सूर्योदय झाला असतां सरोवरांत कमलें विकसित होतात त्याप्रमाणें जीवाच्या ठिकाणीं विकास पावतात.

**दर्शनबन्धोर्न परो बन्धु-। दर्शनलाभान्न परो लाभः॥**
**दर्शनमित्रान्न परं मित्रं। दर्शनसौख्यान्न परं सौख्यम्॥**

अर्थ— सम्यग्दर्शनरूपी बंधूवांचून जगांत दुसरा बंधु नाहीं. दर्शनलाभाहून अन्य लाभ नाहीं. दर्शनरूपी मित्रावांचून दुसरा मित्र नाहीं, आणि दर्शनापासून होणाऱ्या सुखाहून दुसरें सुख जगांत नाहीं.

**लब्ध्वा मुहूर्तमपि ये परिवर्जयन्ते ।**
**सम्यक्त्वरत्नमनवद्यपदप्रदायि ॥**
**भ्राम्यन्ति तेऽपि न चिरं भववारिराशौ ।**
**तद्बिभ्रतां चिरतरं किमिहास्ति वाच्यम् ॥**

अर्थ— जे जीव निर्दोष आणि उत्तमपदाची प्राप्ति करून देणाऱ्या अशा सम्यक्त्वरूपी रत्नाचा एक मुहूर्तपर्यंत लाभ करून घेऊन पुनः त्याचा परित्याग करितात; ते जीव सुद्धां ह्या संसार-समुद्रांत चिरकाल भ्रमण करीत नाहींत. ह्मणून हे भव्यहो! तें सम्यक्त्व तुम्ही चिरकालपर्यंत धारण करा! ह्यांत काय सांगावयाचें आहे?

**पापं यदर्जितमनेकभवैर्दुरन्तैः ।**
**सम्यक्त्वमेतदखिलं सहसा हिनस्ति ॥**
**भस्मीकरोति सहसा तृणकाष्ठराशिं ।**
**किं नोर्जितोज्वलशिखो ज्वलनः समृद्धम् ॥**

अर्थ— ज्यांचा परिणाम फार वाईट आहे अशा अनेक भवांनीं जें पाप जीवानें सांठविलेलें असतें त्या संपूर्ण पापाचा सम्यक्त्व एकदम नाश करतें. ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण, अत्यंत प्रदीप्त झालेला अग्नि गवत आणि लांकडें ह्यांचे ढीग एकदम भस्म करीत नाहीं काय?

**नैव भवस्थितिवेदिनि जीवे ।**
**दर्शनशालिनि तिष्ठति दुःखम् ॥**
**कुत्र हिमस्थितिरस्ति हि देशे ।**
**ग्रीष्मदिवाकरदीधितितप्ते ॥ ८८ ॥**

अर्थ— भवस्थिति ज्याला माहीत आहे अशा सम्यग्दर्शनी

जीवाच्या ठिकाणीं दुःख मुळींच रहात नाहीं. बरोबरच आहे. कारण, ग्रीष्मऋतूंतील सूर्याच्या उन्हानें तापलेल्या प्रदेशांत थंडी कोठेंतरी रहाते काय.

भुवनजनताजन्मोत्पत्तिप्रपञ्चनिषूदिनी।
जिनमतरुचिश्चिन्तामण्या यकैरुपमीयते॥
त्रिदशसरणीं ते भावन्ते समां परमाणुना।
प्रभवति मतिर्मिथ्या मिथ्यादृशामथवा सदा॥

अर्थ— त्रैलोक्यांतील जीवांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला जो ह्या जन्ममरणरूपी संसाराचा विस्तार, त्याचा नाश करणारें असें जिनमतावर असलेलें जीवाचें श्रद्धान ज्या जीवांना चिंतामणीप्रमाणें वाटत असतें; ते जीव स्वर्गालासुद्धां परमाणुप्रमाणें तुच्छ म्हणतात. परंतु, मिथ्यादृष्टि जीवांची मात्र ह्याविषयीं सर्वदा मिथ्याबुद्धि असते.

अवहितमनाः सर्वोत्सङ्गं निदानमिवोत्तमं।
नयति हृदयं यः सम्यक्त्वं शशाङ्ककरोज्वलम्॥
अमितगतयः क्षिप्रं लक्ष्म्यः श्रयन्ति तमादृता।
निरुपमगुणाः कान्तं कान्तं स्वयं प्रमदा इव ९०

अर्थ— जो जीव चित्त एकाग्र करून गृहादि परिग्रह एखाद्या दुर्वासनेप्रमाणें त्याज्य मानून चंद्रकिरणाप्रमाणें शुद्ध असें सम्यक्त्व आपल्या अंतःकरणांत धारण करतो; त्याचा ज्याप्रमाणें सुंदर अशा पतीचा आपण होऊन स्त्रिया आश्रय करतात, त्याप्रमाणें निरुपमगुणांनीं युक्त असलेल्या अनेक प्रकारच्या संपत्ति त्वरेनें आपण होऊन आश्रय करतात.

॥ इत्युपासकाचारे द्वितीयः परिच्छेदः ॥ २ ॥

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

॥ तृतीयः परिच्छेदः ॥

जीवाजीवादितत्त्वानि ज्ञातव्यानि मनीषिणा ॥
श्रद्धानं कुर्वता तेषु सम्यग्दर्शनधारिणा ॥ १ ॥

अर्थ— सम्यग्दर्शनी व जीवाजीवादि तत्त्वावर श्रद्धान करणाऱ्या बुद्धिमान् मनुष्यानें तीं तत्त्वें समजून घ्यावींत.

तत्र जीवा द्विधा ज्ञेया मुक्तसंसारिभेदतः ॥
अनादिनिधनाः सर्वे ज्ञानदर्शनलक्षणाः ॥ २ ॥

अर्थ— त्या तत्त्वांपैकीं जीव हे मुक्त आणि संसारी असे दोन प्रकारचे आहेत. ते सर्व जीव केव्हांही उत्पन्न न झालेले केव्हांही मृत्यु न पावणारे असे असून ज्ञान आणि दर्शन हें ज्यांचें लक्षण आहे असे आहेत. ह्यांत सम्यग्ज्ञान आणि सम्यग्दर्शन हें जीवाचें लक्षण समजावें.

तत्र क्षताष्टकर्माणः प्राप्ताष्टगुणसम्पदः ॥
त्रिलोकवेदिनो मुक्तास्त्रिलोकाग्रनिवासिनः ॥ ३ ॥

अर्थ— त्यांत जे मुक्तजीव आहेत, त्यांना आठ मूलगुणांची प्राप्ति झाली असल्यानें त्यांनीं आठ प्रकारच्या कर्माचा नाश केलेला असतो, आणि त्यांना त्रैलोक्याचें ज्ञान होत असून ते या त्रैलोक्याच्या अग्रभागीं रहात असतात.

अनन्तरेषदूनांगसमानाकृतयः स्थिराः ॥
आत्मनीनजनाभ्यर्च्या भाविनं कालमासते ॥ ४ ॥

अर्थ— त्यांची आकृति शेवटीं प्राप्त झालेल्या शरीरापेक्षा थोडी कमी असून ते स्थिर असतात, आणि आत्म्याचें कल्याण

करणारे भव्यजीव त्यांची पूजा करतात. ते मुक्तजीव पुढच्या कालांतही तसेच रहाणारे आहेत.

**संसारिणो द्विधा जीवाः स्थावराः कथितास्त्रसाः ॥**
**द्वितयेऽपि प्रजायन्ते पूर्णापूर्णतया द्विधा ॥ ५ ॥**

अर्थ-- संसारी जीव स्थावर आणि त्रस असे दोन प्रकारचे आहेत. त्यांत स्थावर जीव पूर्ण ( पर्याप्तक ) आणि (अपर्याप्तक) असे दोन प्रकारचे आहेत, आणि त्रसजीवही पर्याप्तक आणि अपर्याप्तक असे दोन प्रकारचे आहेत.

**आहारविग्रहाक्षानवचोमानसलक्षणम् ॥**
**पर्याप्तिनां मतं षट्कं पूर्णापूर्णत्वकारणम् ॥ ६ ॥**

अर्थ— आहारपर्याप्ति, शरीरपर्याप्ति, इंद्रियपर्याप्ति, श्वासोच्छ्वासपर्याप्ति, भाषापर्याप्ति आणि मनःपर्याप्ति ह्या सहा पर्याप्ति त्या जीवांच्या पूर्णत्वाचें व अपूर्णत्वाचें कारण आहेत. अर्थात् ह्या पर्याप्ति ज्याला आहेत तो पूर्ण, आणि ज्याला नाहींत तो अपूर्ण; असें समजावें.

**चतस्रः पञ्च षड्ज्ञेयास्तेषां पर्याप्तयोऽङ्गिनाम् ॥**
**एकाक्षविकलाक्षाणां पञ्चाक्षाणां यथाक्रमम् ॥ ७ ॥**

अर्थ-- ह्या सहा पर्याप्तींपैकीं एकेंद्रिय जीवांच्या ठिकाणीं चार पर्याप्ति असतात. द्वींद्रिय जीवांच्या ठिकाणीं पांच पर्याप्ति असतात. आणि पंचेंद्रिय जीवांच्या ठिकाणीं सहा पर्याप्ति असतात.

**एकाक्षाः स्थावरा जीवाः पञ्चधा परिकीर्तिताः ॥**
**पृथिवी सलिलं तेजो मारुतश्च वनस्पतिः ॥८॥**

अर्थ— त्रसजीव एकेंद्रिय असतात त्यांचे पृथ्वी, जल, तेज,

वायु आणि वनस्पति असे पांच प्रकार सांगितले आहेत.

भेदास्तत्र त्रयः पृथ्व्याः कायकायिकतद्भवाः ॥
निर्मुक्तस्वीकृतागामिरूपा एवं परेष्वपि ॥ ९ ॥

अर्थ— त्यांत पृथ्वीचे पृथ्वीकाय, पृथ्वीकायिक आणि पृथिव्युद्भव असे तीन भेद आहेत. ह्यांतील प्रत्येक जीव निर्मुक्तरूप, स्वीकृतरूप आणि आगामिरूप असे तीन प्रकारचे असतात. जल, तेज वगैरे जीवांमध्येंही असेच नऊ भेद आहेत.

मता द्वित्रिचतुःपञ्चहृषीकास्त्रसकायिकाः ॥
पञ्चाक्षा द्विविधास्तत्र संज्यसंज्ञिविकल्पतः ॥१०॥

अर्थ-- त्रसजीव द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय आणि पंचेंद्रिय असे चार प्रकारचे आहेत. त्यांत पंचेंद्रियजीव संज्ञी आणि असंज्ञी असे दोन प्रकारचे आहेत.

सङ्केतदेशनालापग्राहिणः सञ्ज्ञिनो मताः ॥
प्रवृत्तमानसप्राणा विपरीतास्त्वसञ्ज्ञिनः ॥ ११ ॥

अर्थ-- खूण, आज्ञा, आणि भाषण ह्यांचें ज्यांना ज्ञान होतें व ज्यांचा मानसरूपी प्राण कार्यक्षम आहे; ते संज्ञी जीव होत. आणि हीं लक्षणें ज्यांना नाहींत ते असंज्ञी जीव समजावेत.

स्पर्शनं रसनं घ्राणं चक्षुः श्रोत्रमतीन्द्रियम् ॥
तस्य स्पर्शरसौ गन्धो रूपं शब्दश्च गोचरः ॥१२॥

अर्थ— स्पर्शन, रसन, घ्राण, चक्षु आणि श्रोत्र हीं पांच इंद्रियें असून तीं कोणत्याही इंद्रियाला न समजणारीं अशीं आहेत. आणि स्पर्श, रस, गंध, रूप आणि शब्द हे त्यांचे क्रमानें विषय आहेत.

गण्डूपदजलौकाख्यकृमिशङ्खेन्द्रगोपकाः ॥

गदिता विविधाकारा द्विहृषीकाः शरीरिणः॥१३॥

अर्थ— गांडोळ, जळू, अळया, शंखाचे किडे आणि इंद्रगोपक नांवाचे किडे हे द्वींद्रियजीव होत. हे अनेक प्रकारच्या आकाराचे असतात.

यूकापिपीलिकालिक्षाकुन्थुमत्कुणवृश्चिकम् ॥
त्रिहृषीकं मतं प्राज्ञैर्विचित्राकारसंयुतम् ॥ १४ ॥

अर्थ— उवा, मुंग्या, लिका, कुंथु नांवाचे किडे, ढेकूण आणि विंचू हे त्रींद्रिय जीव होत असें विद्वानांचें मत आहे. ह्यांतील प्रत्येकाचा आकार निराळा असतो.

पतङ्गमक्षिकादंशमशका भ्रमरादयः ॥
चतुरक्षा विबोद्धव्या विबुद्धजिनशासनैः ॥ १५ ॥

थर्थ— पतंग, माशा, डांस, भोंगे वगैरे जीव चतुरिंद्रिय आहेत असें जैनमतांचें ज्ञान असलेल्या लोकांनीं समजावें.

तिर्यग्योनिभवाः शेषाः श्वाभ्रमानवनाकिनः ॥
विभिन्ना विविधैर्भेदैः स्वीकृतेन्द्रियपञ्चकाः १६ ॥

अर्थ— वर सांगितलेल्या जीवाहून राहिलेले जे तिर्यंचयोनींत उत्पन्न होणारे जीव, नारकी जीव, मनुष्यजीव आणि देव हे पंचेंद्रियजीव होत. ह्यांतील प्रत्येकाचे अनेक भेद आहेत.

हृषीकपञ्चकं भाषाकायस्वान्तबलत्रिकम् ॥
आयुरुच्छ्वासनिश्वासद्वन्द्वं प्राणा दशोदिताः ॥ १७ ॥

अर्थ— पांच इंद्रियें, भाषाबल, कायबल आणि मनोबल हे तीन, आयुष्य आणि श्वासोच्छ्वास हे दोन मिळून दहा प्राण सांगितले आहेत.

शरीराक्षायुरुच्छ्वासा भाषिता निखिलेष्वपि ॥

विकलासञ्ज्ञिनां वाणी पूर्णानां सञ्ज्ञिनां मनः ॥१८॥

अर्थ-- शरीरबल, इंद्रिय, आयुष्य आणि श्वासोच्छ्वास हे प्राण सर्वांच्या ठिकाणीं आहेत. विकलेंद्रिय असंज्ञिपंचेंद्रिय यांचे ठिकाणीं भाषा हा एक प्राण अधिक असतो, आणि पंचेंद्रियसंज्ञी जीवाचे ठिकाणीं मन हा एक प्राण अधिक असतो. हें सर्व पर्याप्तकजीवांविषयीं सांगितलें आहे असें समजावें.

एकद्वित्रिचतुःपञ्चहृषीकाणां विभाजिताः ॥
अन्येषां त्रिचतुःपञ्चषट्सप्ताङ्गायुरिन्द्रियैः ॥ १९ ॥

अर्थ- आणि अपर्याप्तक जीवांत एकेंद्रिय जीवाला एक इंद्रिय शरीर आणि आयु असे तीन प्राण असतात. द्वींद्रियजीवाला इंद्रियप्राण दोन आणि शरीर, आयु हे दोन मिळून चार प्राण असतात. त्रींद्रियजीवाला एक इंद्रियप्राण अधिक झाल्यामुळें पांच प्राण असतात. चतुरिंद्रियजीवाला इंद्रियप्राण एक जास्त झाल्यानें सहा प्राण असतात, आणि पंचेंद्रिय अपर्याप्तक जीवाला इंद्रियप्राण पांच, शरीर आणि आयु हे दोन मिळून सात प्राण असतात.

जरायुजाण्डजाः पोता गर्भजा देवनारकाः ॥
उपपादभवाः शेषाः सम्मूर्च्छनभवा मताः ॥२०॥

अर्थ— जरायुज ( गर्भांत असतांना ज्यांच्या शरीरावर वार गुंडाळलेली असती ते जीव ), अंडज आणि पोत ( गर्भांत असतांना ज्याच्या शरीवर वार गुंडाळलेली नसते व जे गर्भांतून बाहेर पडल्याबरोबर चालूं लागतात ते जीव हरिण वगैरे ) हे तीन प्रकारचे जीव गर्भज होत. देव आणि नारक हे उपपादज जीव होत. उपपाद ह्मणजे देव आणि नारक ह्या दोन प्रकारच्या

जीवाचें जन्मस्थान होय. ह्या ठिकाणीं जीव जन्माला आल्या-पासून एका मुहूर्ताच्या आंत तरुण होतो ) आणि बाकीचे सर्व जीव संमूर्च्छनजन्म समजावेत. संमूर्च्छन ह्मणजे आईबापावांचून शरीराला लागणारे परमाणु एकत्र जमणें होय. ह्या शरीरोप-योगी परमाणूंचा कर्मवशात् एकत्र पुंज होतांच जें जन्म होतें त्याला संमूर्च्छनजन्म ह्मणतात.

श्वाभ्रसम्मूर्च्छिनो जीवा भूरिपापा नपुंसकाः ॥
स्त्रीपुंवेदा मता देवाः सवेदत्रितयाः परे ॥ २१ ॥

अर्थ— नारक जीव आणि संमूर्च्छन जीव हे महापातकी असून नपुंसकवेदानें युक्त असतात. देव हे स्त्रीवेद व पुंवेद ह्या दोन वेदांनीं युक्त असतात. बाकी राहिलेले जीव स्त्रीवेद, पुंवेद व नपुंसकवेद ह्या तिन्ही वेदांनीं युक्त असतात.

सचित्तः संवृतः शीतः सेतरो वा विमिश्रकः ॥
त्रिभेदैरान्तरैर्भिन्ना नवधा योनिरङ्गिनाम् ॥ २२ ॥

अर्थ— जीवांचें उत्पत्तिस्थान सचित्त, संवृत, शीत, अचित्त, विवृत, उष्ण, सचित्ताचित्त, संवृतविवृत आणि शीतोष्ण असें नऊ प्रकारचें आहे. हे नऊ प्रकार त्या त्या स्थानांत असलेल्या अंतरंग कारणामुळें झालेले आहेत.

भूरुहेषु दश ज्ञेयाः सप्त नित्यान्यधातुषु ॥
नारकामरतिर्यक्षु चत्वारो विकलेषु षट् ॥ २३ ॥
चतुर्दश मनुष्येषु योनयः सन्ति पिण्डिताः ॥
सर्वे शतसहस्राणामशीतिश्चतुरुत्तरा ॥ २४ ॥

अर्थ— वृक्षांमध्यें १० दहा लक्ष योनी, नित्यधातु ७ सात लक्ष योनी, अनित्यधातु ७ सात लक्ष योनी, पृथ्वी ७ सात लक्ष

योनी, आप ७ सात लक्ष योनी, तेज ७ सात लक्ष योनी, वायु ७ सात लक्ष योनी, नारक ४ चार लक्ष योनी, देव ४ चार लक्ष योनी, तिर्यंच ४ चार लक्ष योनी, विकलेंद्रिय ६ सहा लक्ष योनी आणि मनुष्य १४ चवदा लक्ष योनी, मिळून सर्व चवऱ्याऐंशी लक्ष ८४०००० योनी होतात.

गतीन्द्रियवपुर्योगज्ञानवेदक्रुधादयः ॥
संयमाहारभव्येक्षालेश्यासम्यक्त्वसाञ्ज्ञिनः ॥ २५ ॥
मार्ग्यन्ते सर्वदा जीवा यासु मार्गणकोविदैः ॥
सम्यक्त्वशुद्धये मार्ग्यास्ताश्चतुर्दश मार्गणाः ॥ २६ ॥

अर्थ— ज्याचे ठिकाणीं जीव सर्वदा हुडकले जातात, ह्मणजे ज्यांच्या योगानें हें जीवतत्त्व आहे असें केव्हांही समजतें; अशा विशेष धर्मांना मार्गणा ह्मणतात. ह्या मार्गणा– गति, इंद्रिय, शरीर, योग, ज्ञान, वेद, क्रोधादि कषाय, संयम, आहार, भव्य, दर्शन, लेश्या, सम्यक्त्व आणि संज्ञा अशा चवदा आहेत. सम्यक्त्वाची शुद्धि होण्याकरितां जीवानें ह्या मार्गणा समजून घेतल्या पाहिजेत.

मिथ्यादृक् सासादनो मिश्रदृष्टिः ।
सम्यग्दृष्टिः संयतासंयताख्यः ॥
ज्ञेयावन्यौ द्वौ प्रमत्ताप्रमत्तौ ।
सत्रा पूर्वेणानिवृत्त्यल्पलोभौ ॥ २७ ॥
शान्तक्षीणौ योग्ययोगौ जिनेन्द्रौ ।
द्विःसप्तैवं ते गुणस्थानभेदाः ॥
त्रैलोक्याग्रारूढिसोपानमार्गा-।
स्तथ्यं येषु ज्ञायते जीवतत्त्वम् ॥ २८ ॥

अर्थ— १ मिथ्यादृष्टि, २ सासादन, ३ सम्यग्मिथ्यादृष्टि, ४ सम्यग्दृष्टि, ५ संयतासंयत, ६ प्रमत्त, ७ अप्रमत्त, ८ अपूर्वकरण, ९ अनिवृत्तिकरण, १० सूक्ष्मलोभ, ११ शांतमोह, १२ क्षीणमोह, १३ सयोगकेवली आणि १४ अयोगकेवली हीं चवदा गुणस्थानें आहेत. हीं चवदा गुणस्थानें त्रैलोक्याच्या अग्रभागीं असलेल्या मोक्षस्थानीं चढण्याच्या चवदा पायऱ्या असून ह्यांमध्यें जीवतत्त्व यथार्थस्वरूपानें जाणलें जातें.

धर्माधर्मनभःकालपुद्गलाः परिकीर्तिताः ॥
अजीवाः पञ्च सूत्रज्ञैरुपयोगविवर्जिताः ॥ २९ ॥

अर्थः— धर्म, अधर्म, आकाश, काल आणि पुद्गल हे पांच पदार्थ उपयोगरहित ( ज्ञानदर्शनशून्य ) असल्यानें अजीव पदार्थ आहेत; असें सूत्रज्ञ लोक म्हणतात.

अमूर्ता निष्क्रिया नित्याश्चत्वारो गदिता जिनैः॥
रूपगन्धरसस्पर्शशब्दवन्तोऽत्र पुद्गलाः ॥ ३० ॥

अर्थ— त्यांत धर्म, अधर्म, आकाश आणि काल हे चार पदार्थ अमूर्त, निष्क्रिय आणि नित्य असे आहेत. आणि पुद्गल हे रूप, गंध, रस, स्पर्श आणि शब्द ह्यांनीं युक्त आहेत; असें श्रीजिनांनीं सांगितलें आहे.

लोकालोकौ स्थितं व्याप्य व्योमानन्तप्रदेशकम् ॥
लोकाकाशं स्थितौ व्याप्य धर्माधर्मौ समन्ततः ॥३१॥

अर्थ— आकाश हें संपूर्ण लोकालोकांना व्यापून राहिलेलें असून अनंतप्रदेशी आहे. आणि धर्म व अधर्म हीं दोन द्रव्यें लोकाकाशाला सर्वत्र व्यापून राहिलेलीं आहेत.

**धर्माधर्मैकजीवानामसंख्येयाः प्रदेशकाः ॥**
**अनन्तानन्तमानास्ते पुद्गलानामुदाहृताः ॥ ३२ ॥**

अर्थ— धर्म, अधर्म आणि एक जीव ह्या प्रत्येकाचे असंख्येय प्रदेश आहेत. आणि प्रत्येक पुद्गलाचे अनंतानंत प्रदेश आहेत.

**जीवानां पुद्गलानां च गतिस्थितिविधायिनौ ॥**
**धर्माधर्मौ मतौ प्राज्ञैराकाशमवकाशकृत् ॥ ३३ ॥**

अर्थ— धर्मद्रव्य हें जीव आणि पुद्गल ह्यांच्या गतीला उत्पन्न करणारें आहे. आणि अधर्मद्रव्य हें जीवपुद्गलांच्या स्थितीला साधनीभूत आहे. आणि आकाश हें सर्वांना अवकाश देणारें आहे.

**असंख्यभुवनाकाशे कालस्य परमाणवः ॥**
**एकैका वर्तनाकार्या मुक्ता इव व्यवस्थिताः ॥ ३४ ॥**

अर्थ— ज्यांत असंख्य भुवनें आहेत अशा ह्या आकाशांत कालाचे परमाणु आहेत. त्यांतील एकेक परमाणु जीवादिद्रव्यांच्या परिणामाला घडविणारा आहे, आणि ते परमाणु मुक्त जीवाप्रमाणें एकमेकांत न मिसळतां राहिलेले आहेत.

**जीवितं मरणं सौख्यं दुःखं कुर्वन्ति पुद्गलाः ॥**
**अणुस्कन्धविकल्पेन विकल्पद्वयभागिनः ॥ ३५ ॥**

अर्थ— पुद्गल हे अणु आणि स्कंध असे दोन प्रकारचे असून, जीवाच्या ठिकाणीं जीवित, मरणें, सुख आणि दुःख हे विकार उत्पन्न करणारे आहेत.

**विश्वम्भराजलच्छायाचक्षुरिन्द्रियगोचराः ॥**
**कर्माणि परमाणुश्च षड्विधः पुद्गलो मतः ॥ ३६ ॥**

अर्थ— पृथ्वी, जल, छाया, चक्षुरिंद्रियाला विषय असलेल्या

वस्तु, कर्म आणि परमाणु असे सहा प्रकारचे पुद्गल आहेत.

स्थूलस्थूलमथ स्थूलं स्थूलसूक्ष्मं जिनेश्वरैः ॥
सूक्ष्मस्थूलं मतं सूक्ष्मं सूक्ष्मसूक्ष्मं यथाक्रमम् ॥३७॥

अर्थ— त्यांत पृथ्वी ही स्थूलस्थूल आहे, जल स्थूल आहे, छाया स्थूलसूक्ष्म आहे, चक्षुरिंद्रियाचा विषय सूक्ष्मस्थूल आहे, कर्म सूक्ष्म आहे आणि परमाणु हे सूक्ष्मसूक्ष्म आहेत. असें जिनेश्वरांनीं सांगितलें आहे.

यद्वाक्कायमनःकर्म योगोऽसावास्रवः स्मृतः ॥
कर्मास्रवत्यनेनेति शब्दशास्त्रविशारदैः ॥ ३८ ॥

अर्थ— शरीर, वाणी आणि मन ह्यांचें जें कर्म तो योग होय. ह्यालाच आस्रव असें ह्मणतात. ज्याच्या योगानें कर्म स्रवतें ह्मणजे शिरतें तो आस्रव, असा आस्रव ह्या शब्दाचा अर्थ व्याकरणज्ञ पंडित करतात.

शुभः शुभस्य विज्ञेयस्तत्रान्योऽन्यस्य कर्मणः ॥
कारणस्यानुरूपं हि कार्यं जगति जायते ॥ ३९ ॥

अर्थ— त्यांत शुभकर्माचा जो आस्रव तो शुभ होय, आणि अशुभकर्माचा जो आस्रव तो अशुभ होय. कारण, ह्या जगांत कारणाला शोभेल असेंच कार्य होत असतें. ह्या ठिकाणीं आस्रव हें कारण आणि कर्म हें कार्य असें समजावें. तात्पर्य–शुभास्रवापासून शुभकर्म होतें व अशुभस्रवापासून अशुभ कर्म होतें.

संसारकारणं कर्म सकषायेण गृह्यते ॥
येनान्येनाकषायेन कषायस्तेन वर्ज्यते ॥ ४० ॥

अर्थ— ज्याकारितां सकषाय असा जीव संसाराला साधनीभूत असलेल्या कर्मांचें ग्रहण करतो, त्याकारितां अकषाय असा दुसरा जीव कषायाचा त्याग करतो.

ज्ञाताज्ञातामन्दमन्दादिभावै- ।
श्चित्रैश्चित्रं जन्यते कर्मजालम् ॥
नाचित्रत्वे कारणस्येह कार्यं ।
किञ्चिच्चित्रं दृश्यते जायमानम् ॥ ४१ ॥

अर्थ— ज्ञातभाव, अज्ञातभाव, तीव्रभाव, मंदभाव अशा अनेक भावांनीं हें अनेक प्रकारचें कर्मजाल उत्पन्न होत असतें. जर त्या कारणभूत असलेल्या भावांमध्यें (जीवपरिणामांमध्यें) अनेक तऱ्हा नसल्या, तर, त्या भावांचें कार्य असलेल्या अशा ह्या कर्मांतही अनेक तऱ्हा झालेल्या दृष्टि पडल्या नसत्या.

तिरस्कारमात्सर्यपैशून्यविघ्न- ।
प्रपातापलापादिदोषैरनेकैः ॥
विबोधावरोधस्तदीक्षावरोधो ।
दुरन्तैः कृतैर्गृह्यते गर्हणीयः ॥ ४२ ॥

अर्थ— दुसऱ्याचा तिरस्कार करणें, मत्सर करणें, चहाडी करणें, दुसऱ्याच्या कार्याला विघ्न करणें, दुसऱ्याला वादांत जिंकणें, दुःशब्द बोलणें वगैरे दुष्परिणामी असे अनेक दोष केल्यानें निंद्य अशा ज्ञानावरणीय व दर्शनावरणीय कर्माचा बंध होतो.

वधाक्रन्ददैन्यप्रलापप्रपञ्चै- ॥
र्निकृष्टेन तापेन शोकेन सद्यः ॥
परात्मोभयस्थेन कर्माङ्गिवर्गै- ।
रसातं सदा गृह्यते दुःखपाकम् ॥ ४३ ॥

अर्थ— जीववध करणें, कर्कश ओरडणें, दीनपणा दाखविणें, बडबडणें, दुःसह अशी पीडा करणें, दुसऱ्याला शोक

करावयास लावणें व आपण शोक करणें ह्या योगानें जीवाला नेहमीं असातावेदनीय कर्माचा बंध होतो.

साधूपास्याप्राणिरक्षातितिक्षा- ।
सर्वज्ञार्चादानशौचादियोगैः ॥
सातं कर्मोत्पद्यते शर्मपाकं ।
शिष्टाभीष्टैः पोषितैः सज्जनैर्वा ॥ ४४ ॥

अर्थ— साधूंची सेवा करणें, जीवरक्षण करणें, दुसऱ्यानें दिलेला ताप सहन करणें, सर्वज्ञमुनींची पूजा करणें, दान करणें, शुद्धता ठेवणें आणि शिष्टलोकांना संमत असलेल्या सज्जनांचें ( यतींचें ) पोषण करणें ह्या योगानें सुख देणारें असें सातावेदनीय कर्म उत्पन्न होतें. ह्मणजे सातावेदनीय कर्माचा बंध होतो. ह्या दोन श्लोकांत वेदनीय कर्माचा बंध उत्पन्न होण्याचीं करणें सांगितलीं आहेत.

मोक्तव्येनावर्णवादेन देवे ।
धर्मे सङ्घे वीतरागे श्रुते च ॥
मद्येनेवास्वाद्यमानेन सद्यो ।
घोराकारो जन्यते दृष्टिमोहः ॥ ४५ ॥

अर्थ— देव, धर्म, संघ, वीतराग अर्हत आणि शास्त्र ह्याबद्दल त्याज्य अशी निंदा केल्यानें-ज्याप्रमाणें मद्यप्राशन केल्यानें मोह होतो त्याप्रमाणें-तत्काल भयंकर असा दर्शनमोह उत्पन्न होतो. ह्मणजे मोहनीयकर्माचा आस्रव होऊन जीवाला दर्शनमोह होतो.

सौख्यध्वंसी जन्यते निन्दनीयो ।
रौद्रो भावो यः कषायोदयेन ॥

धत्ते जन्तोरेष चारित्रमोहं ।
विद्वेषी वाऽऽराध्यमानो निकृष्टः ॥ ४६ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें शत्रु असलेल्या नीच मनुष्याची सेवा करूं लागलें असतां तो नीच मनुष्य सेवकाला चारित्रमोह करतो (भलत्याच कृत्याला प्रवृत्त करतो) त्याप्रमाणें कषायोदयामुळें जो निंद्य आणि सौख्यविनाशक असा रौद्रभाव जीवाच्या ठिकाणीं उत्पन्न होतो तो जीवाचे ठिकाणीं चारित्रमोह उत्पन्न करतो.

बह्वारम्भग्रन्थसन्दर्भदर्पै- ।
रौद्राकारैस्तीव्रकोपादिजन्यैः ॥
श्वभ्रावासे प्राप्यते जीवितव्यं ।
किंवा दुःखं दीयते नाघचष्टैः ॥ ४७ ॥

अर्थ— पुष्कळ आरंभ ( शेतीभाती वगैरे व्यापार ) आणि पुष्कळ परिग्रह ह्यांच्या संबंधानें ज्यांत गर्व उत्पन्न झाला असे व क्रोधादिकषायांपासून उत्पन्न झालेले जे रौद्र परिणाम त्यांच्या योगानें नरकांत जीवन करावें लागतें. ह्यांत आश्चर्य काय! कारण, दुर्व्यापारांनीं कोणतें दुःख दिलें जात नाहीं बरें? सर्व दुःखें दिलीं जातात.

नानाभेदा कूटमानादिभेदै- ।
मायाऽनिष्टाऽऽराध्यमाना जनानाम् ॥
तैर्यग्योन्यं जीवितव्यं विधत्ते ।
किंवा दत्ते वञ्चना न प्रयुक्ता ॥ ४८ ॥

अर्थ-- माया ( कपट ) ही खोटें माप करणें वगैरे प्रकारांनीं अनेक तऱ्हेची आहे. ही अत्यंत अनिष्ट असल्यानें लोकांनीं हिचें सेवन केलें असतां ती जीवाला तिर्यचयोनींतील आयुष्याचा

बंध करते. बरोबरच आहे. कारण, लोकांना फसविणें जर उपयोगांत आणलें, तर तें कोणतें संकट उत्पन्न करणार नाहीं बरें? कोणतेंही संकट उत्पन्न करील.

अल्पारम्भग्रन्थसन्दर्भदर्पैः ।
सौम्याकारैर्मन्दकोपादिजन्यैः ॥
सद्यो जीवो नीयते मानुषत्वं ।
किं नो सौख्यं दीयते शान्तरूपैः ॥ ४९ ॥

अर्थ— आरंभ आणि परिग्रह ह्यासंबंधाचा गर्व ज्यांत अल्प आहे असे आणि मंदकषायापासून उत्पन्न झालेले जे सौम्य परिणाम त्यांच्या योगानें जीवाला तत्काल मनुष्यत्वाची प्राप्ति होते. ह्यांत आश्चर्य नाहीं. कारण, शांत परिणामांनीं जीवाला कोणतें सौख्य होत नाहीं बरें? सर्व सौख्य होतें. ह्याप्रमाणें ४५ श्लोकांपासून येथपर्यंत चारित्रमोहनीय व दर्शनमोहनीय कर्माच्या उत्पत्तीचीं कारणें सांगितलीं.

सम्यग्दृष्टिः श्रावकीयं चरित्रं ।
चित्राकामा निर्जरा रागिवृत्तम् ॥
आयुर्दैवं प्राणभाजां ददन्ते ।
शान्ता भावाः किं न कुर्वन्ति सौख्यम् ॥५०॥

अर्थ— सम्यग्दर्शन, श्रावकांचे आचार, आश्चर्यकारक अशी इच्छेवांचून होणारी निर्जरा आणि सरागचारित्र हे परिणाम जीवाला देवायुष्याची प्राप्ति करून देतात. शांत असे आत्म-परिणाम कोणतें सुख देत नाहींत? ह्यांत आयुकर्माचे आस्रव सांगितले.

संवादित्वं प्राञ्जला योगवृत्ति- ।

नीम्नो ज्ञेयं कारणं पूजितस्य ॥
वक्रो योगोऽवादि संवादहान्या ।
सार्धं हेतुर्निन्दनीयस्य तस्य ॥ ५१ ॥

अर्थ—बोलण्याला अनुसरून वागणें, योगांची प्रवृत्ति सरळ ठेवणें हें उच्च अशा नामकर्माचें कारण आहे. आणि बोलल्याप्रमाणें न वागणें व योगप्रवृत्ति वक्र असणें हें नीचनाम कर्माचें साधन आहे. असें शास्त्रकार ह्मणतात. ह्यांत नामकर्माच्या आस्रवाची उत्पत्ति सांगितली आहे.

नीचैर्गोत्रं स्वप्रशंसाऽन्यनिन्दे ।
कुर्वाणोऽसत्सद्गुणोद्भावनाशौ ॥
प्राप्नोत्यङ्गी प्रार्थनीयं महेष्टै- ।
रुच्चैर्गोत्रं मङ्क्षु तद्वैपरीत्ये ॥ ५२ ॥

अर्थ— आपली स्तुति आणि दुसऱ्याची निंदा करणें, नसलेले गुण सांगणें व असलेले गुण छपविणें ह्यांच्या योगानें जीवाला नीच गोत्राची प्राप्ति होते. आणि ह्याच्या उलट झालें ह्मणजे महामुनींनीं सुद्धां इच्छा करण्याला योग्य असें उच्च गोत्र प्राप्त होतें. ह्याप्रमाणें गोत्रकर्माच्या आस्रवाची उत्पत्ति सांगितली.

दानं लाभो वीर्यभोगोपभोगा ।
नो लभ्यन्ते देहिना विघ्नभाजा ॥
विज्ञायेत्थं विघ्नभीतेन विघ्नो ।
नो कर्तव्यः पण्डितेन त्रिधाऽपि ॥ ५३ ॥

अर्थ— दुसऱ्याला विघ्न करणाऱ्या जीवाला लाभ, वीर्य, भोग आणि उपभोग ह्यांची प्राप्ति होत नाहीं. हें समजून

विघ्नाला भ्यालेल्या शहाण्या जीवानें शरीर, मन आणि वाणी ह्या तिहींच्या योगानेंही कोणांही कोणाला विघ्न करूं नये. ह्यांत अंतरायकर्माच्या आस्रवाचें कारण सांगितलें आहे.

**ये गृह्यन्ते पुद्गलाः कर्मयोग्याः ।**
**क्रोधाद्याढ्यैश्चेतनैरेष बन्धः ॥**
**मिथ्यादृष्टिर्निर्व्रतत्वं कषायो ।**
**योगो ज्ञेयस्तस्य बन्धस्य हेतुः ॥ ५४ ॥**

अर्थ— ज्ञानावरणादि कर्मरूपानें परिणत होण्याला योग्य असे जे पुद्गल—क्रोधादिकषायांनीं युक्त होऊन—ग्रहण केले जातात, तोच बंध होय. हा बंध होण्याला मिथ्यादर्शन, अव्रतीपणा, कषाय आणि योग हीं कारणें आहेत; असें समजावें.

**बन्धः स मतः प्रकृतिस्थित्यनुभागप्रदेशभेदेन ॥**
**षड्भिश्चतुष्प्रकारो येन भवे भ्रम्यते जीवः ॥ ५५ ॥**

अर्थ— ज्यानें जीव ह्या संसारांत फिरविला जातो तो बंध प्रकृति, स्थिति, अनुभाग आणि प्रदेश ह्या भेदानें चार प्रकारचा आहे, असें शास्त्रज्ञांनीं मानलें आहे.

**स्वभावः प्रकृतिः प्रोक्ता स्थितिः कालावधारणम् ॥**
**अनुभागो विभागस्तु प्रदेशोंऽशप्रकल्पनम् ॥ ५६ ॥**

अर्थ— कर्मांचा ज्ञानावरण, दर्शनावरण वगैरे करणें हा जो स्वभाव त्याला प्रकृति ह्मणतात. जीवप्रदेशांत कर्मांचें अवस्थान जितका कालपर्यंत असावयाचें त्या कालनिश्चयाला स्थिति ह्मणतात. कर्मांच्या—सुखदुःख देणाऱ्या—शक्तीच्या न्यूनाधिकभावाला अनुभाग ह्मणतात, आणि प्रतिक्षणीं जीवप्र-

देशांत प्रवेश करणाऱ्या कर्मांशाला प्रदेश ह्मणतात.

करोति योगात्प्रकृतिप्रदेशौ ।
कषायतः स्थित्यनुभागसञ्ज्ञौ ॥
स्थितिं न बन्धः कुरुते कषाये ।
क्षीणे प्रशान्ते स ततोऽस्ति हेयः ५७ ॥

अर्थ— ह्या चार प्रकारच्या बंधांपैकीं प्रकृतिबंध आणि प्रदेशबंध हे दोन बंध योगामुळें होतात, आणि स्थितिबंध व अनुभागबंध हे दोन बंध कषायामुळें होतात. कषाय क्षीण झाले असतां अथवा उपशांत झाले असतां बंध रहात नाहीं. ह्मणून कषायांचा त्याग केला पाहिजे.

स्वीकरोति सकषायमानसो ।
मुञ्चते च विकषायमानसः ॥
कर्म जन्तुरिति सूचितो विधि- ।
र्बन्धमोक्षविषयो विबन्धकैः ॥ ५८ ॥

अर्थ— ज्याच्या मनांत कषाय आहेत तो जीव कर्मपुद्गलांचा स्वीकार करतो. आणि ज्याच्या अंतःकरणांत कषाय नाहींत तो जीव कर्मपुद्गलांचा स्वीकार करीत नाहीं. ह्याप्रमाणें बंध आणि मोक्ष ह्यांचा प्रकार बंधमुक्त झालेल्या सर्वज्ञमुनींनीं सांगितला आहे. तात्पर्य– कषाय हें बंधाचें कारण आहे, आणि वीतरागता हें मोक्षाचें साधन आहे.

आस्रवस्य निरोधो यः संवरः स निगद्यते ॥
भावद्रव्यविकल्पेन द्विविधः कृतसंवरैः ॥ ५९ ॥

अर्थ— आस्रव न होऊं देणें ह्याला संवर असें ह्मणतात. तो संवर भावसंवर आणि द्रव्यसंवर असा दोन प्रकारचा आहे

असें ज्यांनीं संवर केला आहे असे महामुनि ह्मणतात.

क्रोधलोभभयमोहरोधनं ।
भावसंवरमुशन्ति देहिनाम् ॥
भाविकल्मषविशेषरोधनं ।
द्रव्यसंवरमपास्तकल्मषम् ॥ ६० ॥

अर्थ— क्रोध, लोभ, भय आणि मोह ह्या विकारांचा निरोध करणें ह्मणजे हे विकार न होऊं देणें ह्याला भावसंवर ह्मणतात. आणि त्यामुळें उत्पन्न होणारा जो पापकर्मांचा निरोध त्याला द्रव्यसंवर ह्मणतात. हा अशुभकर्मपुद्गलांना दूर सारतो.

धार्मिकः शमितो गुप्तो विनिर्जितपरीषहः ॥
अनुप्रेक्षापरः कर्म संवृणोति ससंयमः ॥ ६१ ॥

अर्थ-- धर्माचरण करणारा, ज्यानें समिति व गुप्ति पाळल्या आहेत, ज्यानें परीषहांना जिंकलें आहे आणि जो अनुप्रेक्षांचें चिंतन करीत आहे असा संयमी श्रावक कर्मांचा संवर करतो.

मिथ्यात्वाव्रतकोपादियोगैः कर्म यदर्ज्यते ॥
तन्निरस्यति सम्यक्त्वव्रतविग्रहरोधनैः ॥ ६२ ॥

अर्थ— तो श्रावक-मिथ्यात्व, अव्रतीपणा, क्रोधादिकषाय आणि योग ह्यांच्या योगानें असंयमी जीव जें कर्म संपादन करतात; ह्मणजे, त्यांना ज्या कर्मपरमाणूंचा बंध होतो, त्या जातीच्या कर्मपरमाणूंचा-सम्यक्त्व, व्रतें आणि योगनिरोध ह्यांच्या योगानें-निरास करतो. ह्मणजे, त्या कर्मपुद्गलांचा आत्मप्रदेशांत प्रवेश होऊं देत नाहीं.

पूर्वोपार्जितकर्मैकदेशसंक्षयलक्षणा ॥

**सविपाकाऽविपाका च द्विविधा निर्जराऽकथि ॥ ६३ ॥**

अर्थ— पूर्वी जेवढ्या कर्मपुद्गलांचा बंध झालेला असेल त्या कर्मपुद्गलांपैकीं कांहीं अंशाचा क्षय करणें ह्याला निर्जरा ह्मणतात. ही सविपाकनिर्जरा आणि अविपाकनिर्जरा अशी दोन प्रकारची आहे.

**यथा फलानि पच्यन्ते कालेनोपक्रमेण च ॥**
**कर्माण्यपि तथा जन्तोरु शस्तानि विसंशयम् ॥ ६४ ॥**
**अनेहसा या दुरितस्य निर्जरा ।**
**साधारणा साऽपरकर्मकारिणी ॥**
**विधीयते या तपसा महीयसा ।**
**विशोषणी साऽपरकर्मवारिणी ॥ ६५ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें फळें बऱ्याच कालानें क्रमानें पक्व होतात त्याप्रमाणें जीवप्रदेशांत प्रविष्ट झालेलीं कर्मेंही निःसंशय जीर्ण होतात. परंतु, पुष्कळ कालानें जी कर्मांची निर्जरा होते ती सर्वसाधारण असून दुसऱ्या एखाद्या कर्माचा बंध उत्पन्न करणारी असते. ही सविपाकनिर्जरा होय. आणि जी निर्जरा मोठें तप करून केली जाते, ती निर्जरा संपादित कर्माचा नाश करणारी असून अन्यकर्मांचा बंध न उत्पन्न करणारी असते. ही अविपाक-निर्जरा होय.

**वितप्यमानस्तपसा शरीरी ॥**
**पुराकृतानामुपयाति शुद्धिम् ॥**
**न ध्मायमानः कनकोपलः किं ।**
**ससार्चिषा शुध्यति कश्मलेभ्यः ॥ ६६ ॥**

अर्थ— हा जीव तपश्चर्या करून संतप्त झाला ह्मणजे पूर्वी केलेल्या कर्मांपासून शुद्ध होतो. ह्यांत नवल काय? कारण

अग्नीनें जाळलेला सोन्याचा दगड त्याज्य पदार्थ टाकून देऊन शुद्ध होत नाहीं काय?

घातिकर्म विनिहत्य केवलम् ॥
स्वीकरोति भुवनावभासकम् ॥
चेतनः सकललोकसन्ततं ।
ध्वान्तराशिमिव भास्करो दिवम् ॥ ६७ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें सर्व लोकाला व्यापणाऱ्या अंधकाराचा नाश करून सूर्य आकाशाचा स्वीकार करतो त्याप्रमाणें हा जीव निर्जरा झाली ह्मणजे सर्व घातिकर्मांचा नाश करून संपूर्ण पदार्थांचें ज्ञान करून देणारें असें जें केवलज्ञान त्याचा स्वीकार करतो.

निमूलकाषं स निकृत्य कल्मषं ।
प्रयाति सिद्धिं कृतकर्मनिर्जरः ॥
विनिर्मलध्यानसमृद्धपावके ।
निवेश्य दग्धाऽखिलबन्धकारणम् ॥ ६८ ॥

अर्थ— ज्यानें कर्मनिर्जरा केली आहे असा तो जीव सर्व पातकांचा समूळ नाश करून, बंधाला कारणीभूत असलेलें सर्व कर्म, शुद्ध अशा ध्यानरूपी पेटलेल्या अग्नींत घालून जाळून टाकून सिद्धीला प्राप्त होतो.

निसर्गतो गच्छति लोकमस्तकं ।
कर्मक्षयानन्तरमेव चेतनः ॥
धर्मास्तिकायेन समीरितोऽनघं ।
समीरणेनेव रजश्चयः क्षणात् ॥ ६९ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें वाऱ्याच्या योगानें धुरळ्याचा ढीग

एका क्षणांत वर उडून जातो, त्याप्रमाणें कर्मक्षय झाल्याबरोबरच धर्मास्तिकायानें प्रेरणा केलेला असा जीव निष्पाप अशा लोकाग्राच्या ठिकाणीं आपल्या ऊर्ध्वगतिस्वभावामुळें निघून जातो. ह्मणजे संपूर्ण लोकाच्या शिरोभागीं असलेल्या मुक्तिशिलेवर जातो.

निरस्तदेहो गुरुदुःखपीडितां ।
विलोकमानो निखिलां जगत्त्रयीम् ॥
स भाविनं तिष्ठति कालमुज्वलो ।
निराकुलानन्तसुखाब्धिमध्यगः ॥ ७० ॥

अर्थ— तो देहाचा त्याग करून अत्यंतदुःखानें पीडित झालेल्या ह्या त्रैलोक्याला अवलोकन करीत त्या ठिकाणीं पुढच्या अनंतकालापर्यंत रहातो. आणि तो शुद्धस्वरूप असून दुःखानें मिश्र न झालेल्या अनंतसुखरूपी समुद्रांत निमग्न झालेला असतो.

यदस्ति सौख्यं भुवनत्रये परं ।
सुरेन्द्रनागेन्द्रनरेन्द्रभोगिनाम् ॥
अनन्तभागोऽपि न तन्निगद्यते ।
निरेनसः सिद्धसुखस्य सूरिभिः ॥ ७१ ॥

अर्थ— ह्या त्रिभुवनांत सुरेंद्र, नागेंद्र, नरेंद्र आणि इतर भोगी लोक ह्यांचें जें अगदीं उच्चमतीचें सुख आहे, तें सुख ज्यांत दुःखाचें व्यवधान मुळींच नाहीं अशा सिद्धात्म्याच्या सुखाचा अनंतावा हिस्सा देखील नाहीं, असें विद्वान् लोक ह्मणतात.

इमे पदार्थाः कथिता महर्षिभि- ।
र्यथायथं सप्त निवेशिता हृदि ॥
विनिर्मलां तत्त्वरुचिं वितन्वते ।

जिनोपदेशा इव पापहारिणः ॥ ७२ ॥

अर्थ— हे सात पदार्थ ( जीव, अजीव, आस्रव, बंध, संवर निर्जरा आणि मोक्ष हे सात पदार्थ ) महर्षींनीं सांगितले आहेत. ते आहेत त्याच स्वरूपाचे जर मनांत ठेवले, तर, पापविनाशक असे जिनोपदेश ज्याप्रमाणें तत्त्वश्रद्धान उत्पन्न करतात, त्याप्रमाणें निर्दोष असें तत्त्वश्रद्धान उत्पन्न करितात.

विरागिणा सर्वपदार्थवेदिना ।
जिनेशिनैते कथिता न वेति यः ॥
करोति शङ्कां न कथाऽपि मानसे ।
निःशङ्कितोऽसौ गदितो महात्मना ॥ ७३ ॥

अर्थ— वीतराग आणि सर्वज्ञ अशा श्रीजिनेंद्रानें हे पदार्थ कथन केले आहेत, किंवा नाहींत? अशी शंका जो करीत नाहीं, इतकेंच नव्हें, तर ही गोष्ट ज्याच्या मनांत सुद्धां येत नाहीं, तो निःशंकित होय; असें महामुनींनीं सांगितलें आहे. ह्या श्लोकांत निःशंकित अंगाचें लक्षण सांगितलें आहे.

विधीयमानाः शमशीलसंयमाः ।
श्रियं ममेमे वितरन्तु चिन्तिताम् ॥
सांसारिकानेकसुखप्रवर्द्धिनीं ।
निष्कांक्षितो नेति करोति काङ्क्षाम् ॥ ७४ ॥

अर्थ— मीं आचरण केलेले जे हे शम, शील आणि संयम, ते संसारसुखाची वृद्धि करणारी अशी संपत्ति मला देवोत अशी इच्छा जो करीत नाहीं, तो निष्कांक्षित जीव समजावा. ह्यांत निष्कांक्षितांगाचें लक्षण सांगितलें आहे.

तपस्विनां यस्तनुमस्तसंस्कृतिं ।

**जिनेन्द्रधर्मं सुतरां सुदुष्करम् ॥**
**निरीक्षमाणो न तनोति निन्दनं ।**
**स भण्यते धन्यतमोऽचिकित्सन् ॥ ७५ ॥**

अर्थ-- जो जिनेंद्रांनीं सांगितलेला दुष्कर धर्म अवलोकन करणारा असा धन्य पुरुष ज्याला कोणत्याही प्रकारचा संस्कार नाहीं अशा तपस्वी लोकांचे शरीराची निंदा करीत नाहीं तो अचिकित्सन् होय. ह्यांत अचिकित्सितांगाचें लक्षण सांगितलें आहे.

**देवधर्मसमयेषु मूढता ।**
**यस्य नास्ति हृदये कदाचन ॥**
**चित्तदोषकलितेषु सन्मतेः ।**
**सोऽर्च्यते स्फुटममूढदृष्टिकः ॥ ७६ ॥**

अर्थ— मनाच्या रागद्वेषादि दोषांनीं युक्त असलेल्या देव, धर्म व शास्त्र ह्यांच्याबद्दल ज्या सद्बुद्धि मनुष्याच्या मनांत केव्हांही मूढता नाहीं; तो अमूढदृष्टि मनुष्य सर्वांनीं पूजिला जातो. ह्यांत अमूढदृष्टित्वाचें लक्षण सांगितलें आहे.

**यो निरीक्ष्य यतिलोकदूषणं ।**
**कर्मपाकजनितं विशुद्धधीः ॥**
**सर्वथाऽप्यवति धर्मबुद्धितः ।**
**कोविदास्तमुपगूहकं विदुः ॥ ७७ ॥**

अर्थ-- जो शुद्धधी असा मनुष्य कर्माच्या विचित्र परिणामामुळें उत्पन्न झालेला यतिजनांचा दोष अवलोकन करून त्याचें धर्मबुद्धीनें सर्व प्रकारें रक्षण करतो; ह्मणजे त्या दोषाचें आच्छादन करतो; त्याला शास्त्रज्ञलोक उपगूहक असें समजतात.

ह्यांत उपगूहनांगाचें लक्षण सांगितलें आहे.

**विवर्तमानं जिननाथवर्त्मनो ।**
**निपीड्यमानं विविधैः परीषहैः ॥**
**विलोक्य यस्तत्र करोति निश्चलं ।**
**निरुच्यतेऽसौ स्थितिकारकोत्तमः ॥७८॥**

अर्थ— जिनेंद्रांनीं सांगितलेल्या धर्मापासून मागें सरलेला ह्मणजे त्या धर्माचा ज्यानें त्याग केला आहे असा, आणि अनेक प्रकारच्या परीषहांनीं पीडित झालेला असा मनुष्य अवलोकन करून जो त्याला जिनधर्मांत स्थिर करतो त्याला स्थिरीकरण करणारा असें ह्मणतात. ह्यांत स्थिरीकरणांगाचें स्वरूप व लक्षण सांगितलें आहे.

**करोति सङ्घे बहुधोपसर्गै- ।**
**रुपद्रुते धर्मधियाऽनपेक्षः ॥**
**चतुर्विधव्यापृतिमुज्वलां यो ।**
**वात्सल्यकारी स मतः सुदृष्टिः ॥ ७९ ॥**

णर्थ— अनेक उपसर्गांनीं पीडित झालेल्या संघाच्या ठिकाणीं धर्मबुद्धीनें जो निरिच्छ असा सम्यग्दर्शनी मनुष्य शुद्ध असे आहारदानादि चार व्यापार करतो, तो वात्सल्य करणारा होय; असें मुनींनीं मानलें आहे. ह्यांत वात्सल्यांगाचें लक्षण सांगितलें आहे.

**निरस्तदोषे जिननाथशासने ।**
**प्रभावनां यो विदधाति भक्तितः ॥**
**तपोदयाज्ञानमहोत्सवादिभिः ।**
**प्रभावकोऽसौ गदितः सुदर्शनः ॥ ८० ॥**

अर्थ- जो सम्यग्दर्शनी मनुष्य तपश्चर्या, दया, ज्ञान, महोत्सव इत्यादिकांच्या योगानें; जिनेंद्रांनीं प्रतिपादन केलेल्या शास्त्रावि-षयीं लोकांत भक्तीनें प्रतिष्ठा करतो, तो प्रभावक होय असें शास्त्रांत सांगितलें आहे. ह्यांत प्रभावनांगाचें लक्षण सांगितलें आहे.

**गुणैरमीभिः शुभदृष्टिकण्ठिकां ।**
**दधाति बद्धां हृदि योऽष्टभिः सदा ॥**
**करोति वश्याः सकलाः स सम्पदो ।**
**वधूरिवेष्टाः सुभगो वशंवदः ॥ ८१ ॥**

अर्थ— जो इंद्रियनिग्रही श्रावक वर सांगितलेल्या निःशंकित वगैरे ह्या आठ गुणांच्या योगानें सम्यग्दृष्टिरूपी कंठी आपल्या हृदयाचे ठिकाणीं सर्वदा धारण करतो, तो—ज्याप्रमाणें सुंदर पुरुष आपल्या प्रिय अशा स्त्रिया वश करतो त्याप्रमाणें—सर्व संपत्ति आपल्यास वश करून घेतो.

**सुदर्शनं यस्य स नाकभाजनं ।**
**सुदर्शनं यस्य स सिद्धिभाजनम् ॥**
**सुदर्शनं यस्य स धीविभूषितः ।**
**सुदर्शनं यस्य स शीलभूषितः ॥ ८२ ॥**

अर्थ— ज्याला सम्यग्दर्शन असतें तो स्वर्गाला योग्य होतो. ज्याला सम्यग्दर्शन असते तो सर्व सिद्धींचें पात्र होतो. ज्याला सम्यग्दर्शन आहे तो ज्ञानवान् होतो. आणि ज्याला सम्यग्द-र्शन आहे तो शीलवान् असतो.

**नो जायेते पावने ज्ञानवृत्ते ।**
**सम्यक्त्वेन प्राणिनो वर्जितस्य ॥**
**शर्माधारे कोशराज्ये न दृष्टे ।**

**नूनं क्वापि न्यायहीनस्य राज्ञः ॥ ८३ ॥**

अर्थ— सम्यग्दर्शनविहीन असलेल्या पुरुषाला पवित्र असें सम्यग्ज्ञान आणि सम्यक्चारित्र ह्यांची प्राप्ति होत नाहीं. योग्यच आहे. कारण, ज्याच्या ठिकाणीं न्याय नाहीं अशा राजाला खजिना आणि राज्य हे सुखकर झाले आहेत असें कोठेंच दिसत नाहीं.

**सुदर्शनेनेह विना तपस्या- ।**
**मिच्छन्ति ये सिद्धिकरीं विमूढाः ॥**
**कांक्षन्ति बीजेन विनाऽपि मन्ये ।**
**कृषिं समृद्धां फलशालिनीं ते ॥ ८४ ॥**

अर्थ— सम्यग्दर्शन असल्यावांचून जे मूर्खलोक सिद्धि देणारी तपश्चर्या करावी अशी इच्छा करतात, ते बीज न पेरतां शेतांत पुष्कळ धान्य उत्पन्न होण्याची इच्छा करतात असें मला वाटतें.

**लोकालोकविलोकिनीमकलिलां गीर्वाणवर्गार्चितां।**
**धत्ते केवलसम्पदं शमवतामानीय या लीलया ॥**
**सम्यग्दृष्टिरपास्तदोषनिवहा यस्यास्ति सा निश्चला।**
**तेन प्रापि न किं सुखं बुधजनैरभ्यर्च्यमानं स्थिरम्८५**

अर्थ— देव देखील जिची प्रतिष्ठा करतात अशी व लोकालोकांचें ज्ञान करून देणारी आणि निर्दोष अशी जी केवलज्ञान-संपत्ति, तिची प्राप्ति-जी सम्यग्दृष्टि शांतियुक्त असलेल्या जीवांना सहज आपण आणून-करून देते; ती निर्दोष अशी सम्यग्दृष्टि ज्याची स्थिर आहे, त्याला विद्वानांना मान्य असलेलें असें कोणतें सुख कायम मिळणार नाहीं बरें? पाहिजे तें सुख कायम मिळेल.

सम्यक्त्वोत्तमभूषणोऽमितगतिर्धत्ते व्रतं यस्त्रिधा ।
भुक्त्वा भोगपरम्परामनुपमां गच्छत्यसौ निर्वृतिम् ॥
सर्वापायनिषूदिनीमपमलां चिन्तामणिं सेवते ।
यः पुण्याभरणार्चितः स लभते पूतां न कां सम्पदम्॥

अर्थ— सम्यक्त्व हें ज्याचें उत्तम भूषण आहे असा जो सम्यग्ज्ञानवान् जीव तीन्ही प्रकारचें चारित्र धारण करतो तो अनेकप्रकारचे भोग भोगून निरुपम आणि सर्व अपायांचा नाश करणारी आणि निर्दोष अशा मुक्तीला प्राप्त होतो. बरोबरच आहे. कारण, पुण्यरूपी अलंकारांनीं ज्याची पूजा केली आहे असा जो मनुष्य चिंतामणीचें आराधन करतो, तो पवित्र अशा कोणत्या संपत्तीला मिळवीत नाहीं बरें?

॥ इत्यमितगतिकृतश्रावकाचारे तृतीयः परिच्छेदः ॥ ३ ॥

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

॥ चतुर्थः परिच्छेदः ॥

**केचिद्वदन्ति नास्त्यात्मा परलोकगमोद्यतः ॥**
**तस्याभावे विचारोऽयं तत्त्वानां घटते कुतः ॥ १ ॥**

अर्थ— कित्येक लोक " परलोकगामी असा आत्माच नाहीं " असें ह्मणतात. मग तो आत्माच जर नाहीं तर हा तत्त्वांचा विचार कसा जुळणार?

**विद्यते परलोकोऽपि नाभावे परलोकिनः ॥**
**अभावे परलोकस्य धर्माधर्मक्रिया वृथा ॥ २ ॥**

अर्थ— आणखी ते असे ह्मणतात कीं, परलोकांत रहाणारा कोणी दिसत नसल्यामुळें परलोक नाहीं. मग परलोकच जर नाहीं, तर धर्मक्रिया व अधर्मक्रिया ह्या व्यर्थ झाल्या.

**इहलोके सुखं हित्वा ये तपस्यन्ति दुर्धियः ॥**
**हित्वा हस्तगतं ग्रासं ते लिहन्ति पदाङ्गुलीः॥३॥**

अर्थ— ह्मणून ह्या लोकांतील सुख टाकून देऊन जे दुर्बुद्धि लोक तपश्चर्या करतात, ते हातांतील घास टाकून पायांचीं बोटें चाटतात.

**विहाय कलिलाशङ्कां यच्चेष्टं चेष्टतां जनः ॥**
**चेतनस्य विनष्टस्य विद्यते न पुनर्भवः ॥ ४ ॥**

अर्थ— ह्याकरितां पातकाची शंका सोडून देऊन मनुष्यानें आपल्याला जें करावें असें वाटेल तें अवश्य करावें. एकदा हा जीव नाहींसा झाला ह्मणजे तो पुनः उत्पन्न व्हावयाचा नाहीं.

**नान्यलोकमतिः कार्या मुक्त्वा शर्मैहलौकिकम् ॥**
**दृष्टं विहाय नादृष्टे कुर्वते धिषणां बुधाः ॥ ५ ॥**

अर्थ— ह्या लोकांतील सुख टाकून परलोकांतील सुखाची इच्छा कोणीं करूं नये. कारण, दृष्ट गोष्टीचा त्याग करून अदृष्ट गोष्टीची इच्छा शहाणे लोक करीत नसतात.

**पृथिव्यम्भोऽग्निवातेभ्यो जायते यन्त्रवाहकः ॥**
**पिष्टोदकगुडादिभ्यो मदशक्तिरिव स्फुटम् ॥ ६ ॥**

अर्थ— पृथ्वी, जल, तेज आणि वायु ह्या चारींपासून शरीररूपी यंत्राला वाहणारा असा जीव— पीठ, पाणी, गूळ इत्यादिकांपासून जशी मद आणणारी शक्ति उत्पन्न होते, त्याप्रमाणें— उत्पन्न होतो; ही गोष्ट स्पष्ट दिसते.

**जन्मपश्चत्वयोरस्ति न पूर्वपरयोरयम् ॥**
**सदा विचार्यमाणस्य सर्वथाऽनुपपत्तितः ॥ ७ ॥**

अर्थ— ह्या जीवाला जन्ममरण असल्यामुळें हा पूर्वींही नव्हता; आणि पुढेंही नाहीं. हा जीव सर्वदा आहे असें जर ह्मणावें, तर ह्याच्या जन्ममरणांची केव्हांही उपपत्ति होणार नाहीं.

**परात्मवैरिणां नैतन्नास्तिकानां कथञ्चन ॥**
**युज्यते वचनं तत्त्वविचारानुपपत्तितः ॥ ८ ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें नास्तिकांचें ह्मणणें आहे. परंतु ते परात्म्याचे (मुक्त झालेल्या आत्म्याचे) वैरी असल्यामुळें व त्यांचें ह्मणणें तत्त्वविचाराला जुळत नसल्यानें तें कसेंही बरोबर होत नाहीं.

**विद्यते सर्वथा जीवः स्वसंवेदनगोचरः ॥**
**सर्वेषां प्राणिनां तत्र बाधकानुपपत्तितः ॥ ९ ॥**

अर्थ— जीवतत्त्व हें कोणत्याही प्रकारें विचार केला असतां

विद्यमान आहे. कारण तें स्वसंवेदनांत [ मी आहें ह्या प्रतीतींत ] सर्वदा विषय असतें. आणि ह्या प्रतीतींत कोणत्याही प्राण्याला बाधकाची उपलब्धि झालेली नाहीं. ह्मणजे, कोणत्याही कारणानें कोणत्याही जीवाला " मी नाहीं " अशी प्रतीति झालेली नाहीं. ह्मणून, जीवतत्त्व आहे ह्यांत शंका नाहीं.

**शक्यते न निराकर्तुं केनाप्यात्मा कथञ्चन ॥**
**स्वसंवेदनवेद्यत्वात्सुखदुःखमिव स्फुटम् ॥ १०**

अर्थः-- आत्मा ( जीव ) हा स्वसंवेदनानें ह्मणजे ' मी आहें ' ह्या प्रतीतीनें जाणण्याला योग्य आहे. ह्मणून, ज्याप्रमाणें सुखदुःखांचें ज्ञान आपल्याला होत असल्यामुळें " तीं नाहींत " असें कोणालाही ह्मणतां येणें शक्य नाहीं; त्याप्रमाणें, आत्माही " नाहीं " असें ह्मणणें कोणत्याही प्रकारें शक्य नाहीं. हें स्पष्टच आहे.

**अहं दुःखी सुखी चाहमित्येषः प्रत्ययः स्फुटः ॥**
**प्राणिनां जायतेऽध्यक्षो निर्बाधो नात्मना विना ॥११**

अर्थ— " मी दुःखी आहें, मी सुखी आहें " असा प्रत्यक्ष अनुभव सर्व प्राण्यांना स्पष्ट होत आहे. ह्या अनुभवांत ज्याप्रमाणें सुख, दुःख हे विषय आहेत, त्याप्रमाणें " मी " ( जीव अथवा आत्मा ) हाही एक विषय आहे. जर ' मी ' ह्या शब्दानें वाच्य असलेला आत्मा ह्या अनुभवांत ( ज्ञानांत ) विषय नसता तर " मी दुःखी आहें, मी सुखी आहें " हा अनुभव खरा ठरला नसता. तात्पर्य, मी दुःखी आहें मी सुखी आहें हा जो अनुभव सर्व लोकांना येत आहे, त्यावरून ' मी ' ह्या पदाचा अर्थ जो जीव, त्याचें अस्तित्व ह्या शरीरांत सिद्ध

होत आहे. आणि तो ह्या शरीराहून भिन्न असल्याचेंही स्पष्ट होत आहे.·

स्वसंवेदनतः सिद्धे निजे वपुषि चेतने ॥
शरीरे परकीयेऽपि स सिध्यत्यनुमानतः ॥ १२ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें " मी आहें " किंवा " मी सुखी आहें " मी दुःखी आहें " ह्या प्रत्येक होत असलेल्या स्वसंवेदनानें आपल्या शरीरांत ज्ञानवान् अशा जीवाचें अस्तित्व सिद्ध झालें असतां, मग दुसऱ्याच्या शरीरांतही जीवाचें अस्तित्व अनुमानानें सिद्ध होतें.

परस्य ज्ञायते देहे स्वकीय इव सर्वथा ॥
चेतनो बुद्धिपूर्वस्य व्यापारस्योपलब्धितः ॥ १३ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें आपण बुद्धिपूर्वक व्यापार करीत असल्यामुळें ह्मणजे कोणतेंही काम समजून उमजून करीत असल्यामुळें, आपल्या शरीरांत आत्म्याचें अस्तित्व आहे असें मानावें लागतें त्याप्रमाणें दुसरा प्राणीही बुद्धिपूर्वक व्यापार करीत असल्यामुळें त्याच्या शरीरांतही आपल्यासारखाच चेतन असा आत्मा असला पाहिजे; असें सिद्ध होतें.

जन्मपश्चत्वयोरस्ति न पूर्वपरयोरयम् ॥
नैषा गीर्युज्यते तत्र सिद्धत्वादनुमानतः ॥ १४ ॥

अर्थ— जन्म आणि मरण ह्या दोन्ही कालांत ह्मणजे जन्म झाल्यापासून मरण होईपर्यंतच्या कालांत जीव आहे; आणि जन्माच्या पूर्वी व मृत्यूच्या नंतर जीव नाहीं; असें ह्मणणें मुळींच जुळत नाहीं. कारण, त्या कालांतही जीव आहे ही गोष्ट अनुमानानें सिद्ध होते.

**चैतन्यमादिमं नूनमन्यचैतन्यपूर्वकम् ॥**
**चैतन्यत्वाद्यथा मध्यमन्त्यमन्यस्य कारणम् ॥ १५ ॥**

**अर्थ**— त्या अनुमानाचा प्रकार पुढें सांगितल्याप्रमाणें आहे. आत्म्याला नेहमीं जें ज्ञान होत असतें, तें एकाएकीं होतें असें नसून, त्याला त्याच्या पूर्वी झालेलें ज्ञान कारणीभूत असतें; ही गोष्ट आपल्या नेहमीच्या अनुभवाची आहे. ह्यावरून अगदी प्रथम (जन्मल्याबरोबर) जें ज्ञान झालें असेल तेंही त्याच्या पूर्वी असलेल्या ज्ञानापासून झालें असेंच असलें पाहिजे. कारण, तेंही (जन्मल्याबरोबर होणारें ज्ञानही) एक ज्ञानच आहे. अर्थात् तें त्याच्या पूर्वीच्या ज्ञानापासूनच झालें असलें पाहिजे. असें अनुमान निघतें. तसेंच शेवटचें ज्ञान (मरणसमयीं होणारें ज्ञान) हें कोणत्यातरी त्यापुढें होणाऱ्या ज्ञानाला कारणीभूत असलेंच पाहिजे. कारण, तेंही ज्ञानच असल्यानें तें आपलें कार्य केल्यावांचून नष्ट होणें शक्य नाहीं. ह्या दोन अनुमानावरून उत्पत्तीच्या पूर्वी व मरणाच्या नंतर ज्ञानाचें अस्तित्व सिद्ध होतें. आणि ज्ञान हा आत्म्याचा एक गुण किंवा परिणाम असल्यानें त्या ज्ञानाला आश्रयभूत असलेल्या आत्म्याचेंही अस्तित्व-वस्तुतच्या जन्माच्या पूर्वी मृत्यूच्या नंतर-आहे असें सिद्ध होतें. ह्यावरून "जन्माच्या पूर्वी व मृत्यूनंतर आत्मा नाहीं" ह्या नास्तिकाच्या ह्मणण्यांत कांहींच अर्थ नाहीं असें सिद्ध होतें.

**तत्रैव वासरे जातः पूर्वकेणात्मना विना ॥**
**अशिक्षितः कथं बालो मुखमर्पयति स्तने ॥ १६ ॥**

**अर्थ**— जन्माला आलेलें मूल जन्माच्या पूर्वी त्याचा आत्मा नसल्यामुळें कोणत्याही क्रियेविषयीं अशिक्षित असतें. असें

असून तें मूल त्याच दिवशीं आईच्या स्तनावर मुख कसें बरें ठेवतें? तात्पर्य-मूल जन्माला आल्यावर त्याच्या तोंडांत जर आईनें स्तन दिला तर तें चोखावयास लागतें; ही गोष्ट नेहमीं आपण पहातों. आतां त्या मुलाचा आत्मा जर त्याच्या जन्माच्या पूर्वीं नाहीं असें ह्मटलें; तर, त्या ( ह्या वेळीं जन्म पावलेल्या ) आत्म्याच्या हातून कोणतीही क्रिया पूर्वीं घडली नसल्यानें, त्याला आपल्या मुखांत घातलेला स्तन चोखण्याचें ज्ञान असणें शक्य नाहीं ; असें असूनही तें मूल जन्मलेल्या दिवशींच स्तनपान करीत असलेलें आपल्याला नेहमीं आढळतें. त्यामुळें पूर्वीं त्या मुलाचा आत्मा असला पाहिजे, व त्याला स्तनपान करण्याचें ज्ञान असलें पाहिजे असेंच ह्मणावें लागतें. ह्यावरून "जन्माच्या पूर्वीं आत्मा नाहीं" असें ह्मणणें चुकीचें ठरतें.

**भूतेभ्यो येन तेभ्योऽयं चेतनो जायते कथम् ॥**
**विभिन्नजातितः कार्यं जायमानं न दृश्यते ॥१७॥**

अर्थ— ज्याकरितां भिन्न जातीच्या कारणापासून भिन्न जातीचें कार्य झालेलें दृष्टीं पडत नाहीं, त्याकरितां जड असलेल्या पृथ्वी, जल, तेज आणि वायु ह्या महाभूतांपासून चेतन असा हा जीव कसा बरें उत्पन्न होतो? तात्पर्य- पृथ्वी, जल, तेज आणि वायू ह्या चार भूतांपासून जीव उत्पन्न होतो असें नास्तिकांचें ह्मणणें आहे; तें चुकीचें आहे. कारण, तीं चार महाभूतें जड असून जीव हा चेतन आहे, असें असल्यानें 'कारण एका जातीचें व कार्य निराळ्या जातीचें' असें झालें. आपल्याला नेहमीं जीं उदाहरणें दृष्टीं पडतात, त्यांत ज्या जातीचें कारण असेल त्याच जातींचें कार्य असलेलें दृष्टीं पडतें.

कारण एका जातीचें व त्याच्यापासून उत्पन्न झालेलें कार्य निराळ्याच जातीचें असें कोठेंच दृष्टीं पडत नाहीं. त्यामुळें जड अशा पृथिव्यादि चार महाभूतांपासून चेतन जीव उत्पन्न होतो हें ह्मणणें चुकीचें ठरतें.

**प्रत्येकं युगपद्वैभ्यो भूतेभ्यो जायते भवी ॥**
**विकल्पे प्रथमे तस्य तावत्त्वं केन वार्यते ॥१८॥**

अर्थ-- जीव हा त्या चार महाभूतांपैकीं प्रत्येक महाभूतापासून निरनिराळा उत्पन्न होतो? किंवा त्या चार महाभूतांपासून एकदमच उत्पन्ना होतो? असे दोन पक्ष त्यासंबंधानें संभवतात. त्यांत जर "प्रत्येक महाभूतापासून निरनिराळा होतो" असें ह्मटलें, तर तो जीव त्या महाभूताच्या प्रमाणायेवढ्या प्रमाणाचा असला पाहिजे. त्या प्रमाणाचें कोणाच्यानें निवारण करवेल बरें? कोणाच्यानेंही करवणार नाहीं. तात्पर्य जर पृथ्वीपासून जीव उत्पन्न झाला तर तो सर्व पृथ्वीपासून उत्पन्न झाला असल्यानें, संपूर्णपृथ्वीच्या *प्रमाणायेवढ्या प्रमा*णाचा असला पाहिजे. कारण, पृथ्वी जेवढी आहे तेवढ्या तिच्या सर्वभागापासून त्याची उत्पत्ति झाली असली पाहिजे. त्यावांचून पृथ्वीपासून त्याची उत्पत्ति होते असें ह्मणणें संभवणार नाहीं. ह्मणून तो जीव पृथ्वीच्या प्रमाणायेवढ्या प्रमाणाचाच असला पाहिजे, ह्या कल्पनेचें निवारण कोणाच्यानेंही होणार नाहीं. परंतु, कोणत्याही एका जीवाचें प्रमाण पृथ्वीच्या प्रमाणापेक्षां अत्यंत स्वल्प असल्याचें दिसत आहे. ह्मणून ह्या ह्मणण्यांत कांहींच अर्थ नाहीं; असें ह्मणणें भाग आहे.

**विकल्पे स द्वितीयेऽपि कथमेकस्वभावकः ॥**
**भिन्नस्वभावकैर्भिर्जन्यते वद चेतनः ॥ १९ ॥**

अर्थ— पहिल्या पक्षावर वर सांगितलेलें दूषण येतें ह्मणून जर दुसऱ्या पक्षाचा स्वीकार नास्तिक करतील तर सिद्धांती असें ह्मणतात कीं, चैतन्य हाच एक स्वभाव ज्याचा आहे असा जीव परस्पर विरुद्धस्वभावाच्या ह्या चार महाभूतांपासून कसा उत्पन्न होतो? तें सांग.

**चेतनो येन तेभ्योऽपि भूतेभ्यो न विरुध्यते ॥**
**भिन्नानां मौक्तिकादीनां तोयादिभ्योऽपि दर्शनात्२०**

अर्थ— ह्यावर नास्तिकाचें ह्मणणें असें कीं, पाणी वगैरे पदार्थांपासून मोतीं वगैरे विजातीय पदार्थही उत्पन्न होत असलेले ज्यापेक्षां आह्माला दिसतात, त्यापेक्षां चार महाभूतांपासून चेतनजीव उत्पन्न होण्यांत मुळींच विरोध नाहीं.

**तदयुक्तं यतो मुक्ता तोयादीनां विलोक्यते ॥**
**एकपौद्गलिकीजातिर्भिन्नताऽतः कुतस्तनी ॥ २१ ॥**

अर्थ— ह्यावर सिद्धांतवादी ह्मणतो— हें वर लिहिलेलें नास्तिकाचें ह्मणणें अयोग्य आहे. कारण, पाण्यापासून मोतीं होत असलेलें दृष्टीं पडतें खरें, परंतु, त्या दोघांची पुद्गलापासून उत्पन्न होणें ही एकच जाति आहे. ह्मणून, त्या जातींत भिन्नता आली कोठून? मुळींच नाहीं. तात्पर्य— पाण्यापासून मोतीं झालें तर पाणीही पौद्गलिक व मोतींही पौद्गलिक असल्यानें त्या दोघांत विजातीयत्व येत नाहीं. दोन्ही वस्तु एकाच जातीच्या होतात.

**यतः पिष्टोदकादिभ्यो मदशक्तिरचेतना ॥**
**सम्भूताऽचेतनेभ्योऽतो दृष्टान्तोऽस्ति न चेतने २२**

अर्थ— तसेंच पीठ, पाणी वगैरे अचेतन पदार्थांपासून उत्पन्न होणारी जी मदशक्ति, तीही ज्यापेक्षां अचेतनच आहे; त्यापेक्षां चेतनाविषयीं हाही दृष्टांत लागूं पडत नाहीं. तात्पर्य,

पाण्यापासून मोतीं होतें, किंवा पीठ, पाणी वगैरे पदार्थांच्या संयोगापासून मदशक्ति होते, हें ज्याप्रमाणें होतें, त्याप्रमाणेंच अचेतन अशा चार महाभूतांपासून चेतन असा जीव उत्पन्न होतो, हें नास्तिकाचें ह्मणणें चुकीचें आहे. कारण मोतीं किंवा मदशक्ति ह्यांमध्यें कारणापेक्षां ( पाणी, पीठ वगैरे पदार्थ ह्यापेक्षां) विजातीयता नसून कारण जसें अचेतन आहे, तसेंच हें कार्यही अचेतनच आहे. आणि चार महाभूतें आणि जीव ह्या दोहों-मध्यें अत्यंत विजातीयता आहे. ह्मणून मोतीं आणि मद-शक्ति हीं दोन्हीं उदाहरणें अचेतन अशा महाभूतांपासून चेतन असा जीव उत्पन्न होतो ह्या ह्मणण्याला लागू पडत नाहींत.

न शरीरात्मनोरैक्यं वक्तव्यं तत्त्ववेदिभिः ॥
शरीरे तदवस्थेऽपि जीवस्यानुपलब्धितः ॥ २३ ॥

अर्थ— शरीर आणि जीव हे दोनी पदार्थ एकच आहेत, असें तत्त्ववेत्त्यांनीं मुळींच ह्मणूं नये. कारण, मरणानंतर शरीर पूर्वीं होतें तसेंच असूनही त्यांत जीव असल्याचें आढळून येत नाहीं. ह्मणून शरीर आणि जीव हे दोन पदार्थ अगदीं निराळे आहेत.

ज्ञानं विहाय नात्माऽस्ति नेदं वचनमञ्चितम् ॥
ज्ञानस्य क्षणिकत्वेन स्मरणानुपपत्तितः ॥ २४ ॥

अर्थ— ज्ञानाला सोडून दुसरा आत्मा मुळींच नाहीं. ह्मणजे ज्ञान हाच आत्मा आहे. असें ह्मणणेंही योग्य नाहीं. कारण, जर आत्मा ह्मणजे ज्ञान असें होईल तर, ज्ञान क्षणिक अस-ल्यानें ( उत्पन्न झाल्याबरोबर नाश पावणारें असल्यानें ) स्मर-णाची उपपत्ति होणार नाहीं. तात्पर्य—ज्ञान हाच आत्मा असें जर ह्मटलें, तर, ज्ञान प्रत्येक क्षणीं उत्पन्न होऊन नष्ट होणारें

असें असल्यानें ज्ञात वस्तूचें स्मरण होण्याला कांहींच साधन रहात नाहीं. कारण, ज्ञान हाच आत्मा असल्यानें तो ज्ञाना-बरोबरच नष्ट झाला असल्यामुळें ज्या वेळीं ज्ञातवस्तूची स्मृति त्यावेळीं त्याचें अस्तित्व नाहीं असें होतें. असें झाल्यानें स्मृतीला कांहीं कारणच उरलें नाहीं. स्मृति होऊं नये असा प्रसंग येतो. ह्मणून ज्ञान हाच आत्मा असें ह्मणतां येत नाहीं. तर आत्मा हा कथंचित् ज्ञानाहून निराळा आहे असें ह्मटलें पाहिजे.

**नात्मा सर्वगतो वाच्यस्तत्स्वरूपविचारिभिः ॥**
**शरीरव्यतिरेकेण येनासौ दृश्यते न हि ॥ २५ ॥**

अर्थ— आत्म्याच्या स्वरूपाचा विचार करणाऱ्या लोकांनीं आत्मा सर्वगत ( व्यापक ) आहे असें ह्मणूं नये. कारण, शरीरावांचून दुसऱ्या ठिकाणीं तो मुळींच दिसत नाहीं.

**शरीरतो बहिस्तस्य विज्ञानं विद्यते न वा ॥**
**विद्यते चेत्कथं तत्र कृत्याकृत्यं न बुध्यते ॥ २६ ॥**

अर्थ— " आत्मा व्यापक आहे" असें ह्मणणाऱ्याला आह्मी असा प्रश्न करतो कीं, शरीराच्या बाहेर आत्म्याला ज्ञान आहे, किंवा नाहीं ह्याचें उत्तर जर " शरीराच्या बाहेर आत्म्याला ज्ञान आहे " असें असेल तर, मग शरीराच्या बाहेरच्या प्रदे-शांत त्याला कर्तव्य अकर्तव्य ह्यांचें ज्ञान कां होत नाहीं?

**यदि नास्ति कुतस्तस्य तत्र सत्ताऽवगम्यते ॥**
**लक्षणेन विना लक्ष्यं न क्वापि व्यवतिष्ठते ॥ २७ ॥**

अर्थ—जर " शरीराच्या बाहेरच्या प्रदेशांत आत्म्याला ज्ञान नाहीं " असें ह्मटलें; तर मग, शरीराच्या बाहेरील

प्रदेशांत त्याचें अस्तित्व मानण्याचें काय प्रयोजन? मुळींच प्रयोजन नाहीं. कारण, लक्षणावांचून लक्ष्य कोठेंच रहावयाचें नाहीं. म्हणून, चैतन्य हें आत्म्याचें लक्षण आहे; आणि तें लक्षण जर शरीराच्या बाहेरील प्रदेशांत असलेल्या आत्म्याच्या ठिकाणीं उपलब्ध होत नाहीं, तर मग त्या ठिकाणीं 'आत्मा आहे' म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं.

सर्वेषामेक एवात्मा युज्यते नेति जल्पितुम् ॥
जन्ममृत्युसुखादीनां भिन्नानामुपलम्भतः ॥ २८ ॥

अर्थ— दुसरें असें कीं, "आत्मा व्यापक आहे" असें म्हणण्यांत "आत्मा एक आहे" असें म्हटल्यासारखें होतें. परंतु, "आत्मा एक आहे" हें म्हणणें योग्य नाहीं. कारण, जन्म, मृत्यु आणि सुख वगैरे गुण हे निरनिराळे दिसतात. तात्पर्य— आत्मा जर एकच असता तर त्याचा जन्म एकदाच आणि मृत्युही एकदाच म्ह० एका वेळींच व्हावयास पाहिजे होता, पण तसें तर होतच नाहीं. उलट एका जीवाला मृत्यु येतो तर त्याच वेळीं दुसरा जीव जन्म पावतो; असेंच अनुभवाला येत आहे. म्हणून आत्मा एक नसून ते अनेक आहेत असेंच म्हटलें पाहिजे. दुसरें असें कीं, आत्मा जर एकच असता तर, सर्वांला एकाच विषयापासून सुख व्हावयास पाहिजे; व दुःखही एकाच विषयापासून व्हावयास पाहिजे. परंतु तसें होत नाहीं. म्हणून आत्मा एक आहे असें न म्हणतां अनेक आहेत असें म्हणणेंच योग्य आहे.

न वक्तव्योऽणुमात्रोऽयं सर्वैर्येनानुभूयते ॥
अभीष्टकामिनीस्पर्शे सार्वाङ्गीणः सुखोदयः ॥२९॥

अर्थ— प्रिय असलेल्या स्त्रीचा स्पर्श झाला असतां ज्या अर्थी सर्व शरीराला सुख होत असल्याचा अनुभव येतो; त्या अर्थी "आत्मा हा परमाणूयेवढा आहे" असें कोणींही ह्मणूं नये. तात्पर्य– आत्मा हा परमाणूच्या परिमाणायेवढा आहे, असें जर ह्मटलें तर, प्रियस्त्रीच्या स्पर्शानें सर्वांगाला सुख होत असतें, ही गोष्ट सर्वांना अनुभूत असलेली चुकीची ठरेल. कारण, आत्मा परमाणुयेवढा असल्यानें शरीरांत फक्त परमाणुयेवढ्या प्रदेशांतच सुखाचा अनुभव आला पाहिजे. परंतु तसें न होतां प्रियस्त्रीच्या आलिंगनानें सर्व शरीराला आनंद होत असलेल्याचा नेहमीं सर्व लोकांना अनुभव येत आहे. ह्मणून आत्मा हा परमाणुपरिमाण नसून, ज्या शरीरांत तो असेल, त्या शरीराच्या परिमाणाचाच तो आहे, असें अवश्य ह्मटलें पाहिजे.

समीरणस्वभावोऽयं सुन्दरा नेति भारती ॥
सुखज्ञानादयो भावाः सन्ति नाचेतने यतः ॥३०॥

अर्थ— सुख हा प्राणवायूचा स्वभाव आहे, असें कित्येकांचें ह्मणणें आहे. परंतु, हें ह्मणणें मुळींच शोभत नाहीं. कारण, सुख, ज्ञान, वगैरे परिणाम अचेतन वस्तूंच्या ठिकाणीं नसतात. अर्थात् सुख हा प्राणवायूचा स्वभाव नव्हे. कारण, प्राणवायु अचेतन आहे.

न ज्ञानविकलो वाच्यः सर्वथाऽऽत्मा मनीषिभिः ॥
क्रियाणां ज्ञानजन्यानां तत्राभावप्रसङ्गतः ॥ ३१ ॥

अर्थ— आत्मा हा सर्वप्रकारें ज्ञानरहित ( अचेतन ) आहे असें विद्वान् लोकांनीं ह्मणूं नये. कारण, जर आत्मा अचेतन

होईल तर बुद्धिपूर्वकक्रियांचा (समजून उमजून करण्याचा) अभाव होईल. म्हणून आत्मा हा चेतन आहे असेंच मानिलें पाहिजे.

**प्रधानज्ञानतो ज्ञानी न वाच्यो ज्ञानशालिभिः ॥**
**अन्यज्ञानेन न ह्यन्यो ज्ञानी क्वापि विलोक्यते ॥३२॥**

अर्थ-- प्रधानाच्या (प्रकृतीच्या) ज्ञानामुळें पुरुष (आत्मा) हा ज्ञानी आहे; असें सांख्यांचें मत आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, प्रकृति आणि पुरुष हे दोन पदार्थ जगाच्या उत्पत्तीला कारणीभूत आहेत. त्यांत प्रकृति ही पंगूप्रमाणें असून पुरुष हा अंधाप्रमाणें अर्थात् जडाप्रमाणें आपोआप कांहीं न करणारा असा आहे. म्हणून प्रकृति ही त्याच्यावर अधिष्ठित होऊन त्याला ज्याप्रमाणें प्रेरणा करील त्याप्रमाणें तो करतो. ह्यावरून प्रकृतीच्या प्रेरणेमुळें पुरुष (आत्मा) हा चेतनावान् होतो, असा त्यांचा सिद्धांत स्पष्ट होत आहे. परंतु आचार्य म्हणतात, सांख्यशास्त्रकारांच्या ह्या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण, एकाच्या ज्ञानामुळें दुसरा ज्ञानी झालेला कोठेंच दृष्टी पडत नाहीं. ज्ञानी होण्याला स्वतःचेंच ज्ञान असावें लागतें. नाहीं तर एकानें अभ्यास करावा व दुसऱ्याला समजूं लागावें असा प्रसंग येईल.

**न शुद्धः सर्वथा जीवो बन्धाभावप्रसङ्गतः ॥**
**नहि शुद्धस्य मुक्तस्य दृश्यते कर्मबन्धनम् ॥ ३३ ॥**

अर्थ— आत्मा हा सर्वथा शुद्ध आहे असेंही ते म्हणतात. परंतु, त्या म्हणण्यांतही कांहीं अर्थ नाहीं. कारण, जर आत्मा सर्वथा शुद्ध होईल तर तो स्वभावतःच मुक्त असल्यानें त्याला

केव्हांच कर्माचा बंध होणार नाहीं. त्यामुळें बंधच नाहीं असें ह्मणावें लागेल. कारण, शुद्ध असल्यामुळें मुक्त झालेल्या जीवाला कर्माचें बंधन असलेलें दिसत नाहीं. तात्पर्य— शुद्ध अशा आत्म्याला कर्मबंधन असणें शक्य नाहीं. कारण, कर्मापासून मुक्त होऊन आत्मा निष्कर्मा झाला ह्मणजेच तो शुद्ध होत असतो, असें असून तो जर मूळचाच शुद्ध आहे असें मानलें, तर मग त्याला कर्माचा बंध होणेंच शक्य नाहीं. त्यामुळें बंध हा पदार्थच जगांत नाहीं असें होईल.

प्रधानेन कृते धर्मे मोक्षभागी न चेतनः ॥
परेण विहिते भोगे तृप्तिभागी कुतः परः ॥ ३४ ॥

अर्थ— दुसरें असें कीं, प्रकृतीच्या प्रेरणेवांचून आत्मा हा कांहींच करीत नाहीं असें सांख्यशास्त्रकार ह्मणतात. हें सांख्यांचें ह्मणणें अगदींच विरुद्ध आहे. कारण, त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें पाहिलें असतां आत्मा हा कर्ता नसून प्रकृति हीच कर्त्री आहे; असें सिद्ध होतें. त्यामुळें सध्या जीव मोक्षाकरितां जें धर्माचरण करीत आहे, तें जीव करीत नसून प्रकृतीच करीत आहे असें ह्मणावें लागतें. त्यामुळें—प्रकृतीनें केलेल्या धर्माचरणामुळें—जीवाला मोक्षप्राप्ती होतें असें होतें. परंतु तसें होणें शक्य नाहीं. कारण, एकानें भोजन करावें आणि दुसऱ्याला तृप्ति व्हावी, असें कसें बरें होईल? मुळींच तसें होणार नाहीं. ह्मणून सांख्यांच्या ह्मणण्यांत कांहींच अर्थ नाहीं.

प्रधानं यदि कर्माणि विधत्ते मुञ्चते यदि ॥
किमात्माऽनर्थकः सांख्यैः कल्प्यते मम कथ्यताम् ॥ ३५ ॥

अर्थ— आचार्य ह्मणतात— सांख्यांच्या ह्मणण्याप्रमाणें जर

प्रकृति हीच कर्म करते व प्रकृतिच कर्माचा त्यागही करते असें ह्मणावें, तर, आत्मा हा कांहींच करीत नाहीं असें सिद्ध होतें. मग अशा निरर्थक आत्म्याची कल्पना सांख्य कां करतात? हें मला सांगा. तात्पर्य, सांख्यांच्या मताप्रमाणें आत्मा कर्ता नसल्यामुळें व्यर्थ ठरतो. मग अशा आत्म्याचें अस्तित्व कल्पिण्यांत कांहींच अर्थ नाहीं. ह्मणून सांख्यांचें मत ग्राह्य ठरत नाहीं.

न ज्ञानमात्रतो मोक्षस्तस्य जातूपपद्यते ॥
भैषज्यज्ञानमात्रेण न व्याधिः क्वापि नश्यति ३६

अर्थ— वेदांती हे "फक्त आत्मज्ञान झालें असतां मोक्ष होतो" असें ह्मणतात. परंतु, नुसत्या आत्मज्ञानानेंच मोक्ष होतो हें ह्मणणें केव्हांही युक्तियुक्त होत नाहीं. कारण, औषधाचें नुसतें ज्ञान झाल्यानें रोग नाहींसा झाला असें कोठेंच घडत नाहीं.

अचेतनस्य न ज्ञानं प्रधानस्य प्रवर्तते ॥
स्तम्भकुम्भादयो दृष्टा न क्वापि ज्ञानयोगिनः॥३७॥

अर्थ— दुसरें असें कीं, सांख्यांच्या मतांत सांगितलेली प्रकृति ही अचेतन असल्यानें तिला ज्ञान होणें केव्हांच शक्य नाहीं. कारण, खांब, कुंभ वगैरे अचेतन पदार्थ ज्ञानवान् असलेले कोठेंच पहाण्यांत येत नाहींत.

ऊच्यं स्वयमकर्तारं भोक्तारं चेतनं पुनः ॥
भाषमाणस्य सांख्यस्य न ज्ञानं विद्यते स्फुटम् ३८

अर्थ— आत्मा हा स्वतः (प्रकृतीच्या प्रेरणेवांचून) कांहींच न करणारा असा असून कर्मांच्या सुखदुःखादि फलांचा मात्र भोक्ता आहे असें ह्मणणाऱ्या सांख्यांना मुळींच समजत नाहीं; हें स्पष्ट दिसतें.

**सकलैर्न गुणैर्मुक्तः सर्वथाऽऽत्मोपपद्यते ॥**
**न जातु दृश्यते वस्तु शशशृङ्गमिवागुणम् ॥ ३९ ॥**

अर्थ— आत्म्याचे सर्व गुण नाहींसे झाले ह्मणजे तो मुक्त होतो असें कित्येकांचें ( नैयायिकांचें ) ह्मणणें आहे. परंतु त्या ह्मणण्यांत अर्थ नाहीं. कारण, सर्वथा गुणरहित असा आत्मा असणेंच शक्य नाहीं. ह्याचें बीज असें आहे कीं, शशशृंगाप्रमाणें अत्यंतनिर्गुण अशी वस्तु जगांत केव्हांच दृष्टीं पडत नाहीं. तात्पर्य- जगांत जसें सशाचें शिंग नाहीं त्याप्रमाणें निर्गुण वस्तूही जगांत नाहीं. ह्मणून जी वस्तु निर्गुण मानावयाची ती सशाच्या शिंगासारखी होत असल्यानें सर्वथा निर्गुण असा आत्माही केव्हांच असणें शक्य नाहीं.

**न ज्ञानज्ञानिनोर्भेदः सर्वथा घटते स्फुटम् ॥**
**सम्बन्धाभावतो नित्यं मेरुकैलासयोरिव ॥ ४० ॥**

अर्थ— "आत्मा निर्गुण असणें केव्हांच शक्य नाहीं" असें जें वर सांगितलें आहे, त्याचें कारण ह्या श्लोकांत आचार्यांनीं प्रतिपादन केलें आहे. तें असें कीं, आत्मा हा गुणी आणि ज्ञान हा त्याचा गुण आहे. त्यामुळें, ज्याप्रमाणें मेरुपर्वत आणि कैलासपर्वत ह्या दोहोंचा कोणत्याही प्रकारचा संबंध नसल्यामुळें त्या दोहोंचा सर्वप्रकारें भेद नेहमीं स्पष्ट दिसतो; त्याप्रमाणें ज्ञान ( गुण ) आणि ज्ञानी ( गुणी असा आत्मा ) ह्या दोहोंमध्यें सर्वप्रकारें नेहमीं भेदच आहे असें ह्मणतां येत नाहीं. तात्पर्य- ज्ञान आणि ज्ञानी ( आत्मा ) हे कथंचित् अभिन्न असल्यामुळें आत्म्यानें सर्वप्रकारें गुणशून्य ( निर्गुण ) होणें शक्यच नाहीं.

**समवायेन सम्बन्धः क्रियमाणो न युज्यते ॥**
**नित्यस्य व्यापिनस्तस्य सर्वदाऽप्यविशेषतः ॥४१॥**

अर्थ— आतां नैयायिकांचें ह्मणणें असें आहे कीं, आत्मा आणि ज्ञान ह्यांचा समावाय हा संबंध आहे. आणि समवाय हा संबंध परस्पर भिन्न असलेल्या अशा दोन वस्तूंचा असतो. ह्मणून आत्मा आणि ज्ञान ह्या दोहोंचा सर्वथा भेद आहे. ह्या नैयायिकांच्या ह्मणण्यावर आचार्य ह्मणतात– समवायसंबंधानें ज्ञान आणि आत्मा ह्या दोहोंचा संबंध आहे, असें ह्मणणें जुळत नाहीं. कारण, समवाय हा संबंध सर्व जगांत एकच असून व्यापक आहे असें नैयायिकांचें ह्मणणें आहे. त्यामुळें समवायांत फरक मुळींच नसून तो सर्वदा एकरूप असतो. त्या योगानें आत्म्याला उत्पन्न होत असलेल्या ज्ञानांतही फरक होणें शक्य नाहीं; असें ह्मणावें लागतें. परंतु, आत्म्याला प्रतिक्षणीं निरनिराळें ज्ञान होत असलेलें नेहमीं आपण अनुभवीत आहोंत. ह्मणून समवाय हा आत्म्याचा आणि ज्ञानाचा संबंध आहे हें ह्मणणें चुकीचें ठरतें.

**नित्यताऽनित्यता तस्य सर्वथा न प्रशस्यते ॥**
**अभावादर्थनिष्पत्तेः क्रमतोऽक्रमतोऽपि वा ॥४२॥**
**न नित्यं कुरुते कार्यं विकारानुपपत्तितः ॥**
**नानित्यं सर्वथाऽनिष्टमारोग्यं मृतवैद्यवत् ॥ ४३ ॥**

अर्थ— आत्मा हा सर्वथा नित्य आहे असें मिथ्यावादी नैयायिकांचें मत आहे. आणि सर्वथा अनित्य ह्मणजे क्षणिक आहे असें बौद्धांचें मत आहे. आचार्य ह्मणतात कीं, हीं दोन्हीं मतें योग्य नाहींत. कारण, सर्वप्रकारें नित्य किंवा सर्वप्रकारें

अनित्य अशा आत्म्यापासून क्रमानें अथवा एकदम कोणतेंही कार्य होणें शक्य नाहीं. ह्मणजे आत्म्याच्या ठिकाणीं जीं अनेक प्रकारचीं ज्ञानें उत्पन्न होत असलेलीं आपल्या अनुभवास येत आहेत, तीं ज्ञानें क्रमानेंही उत्पन्न होणें शक्य नाहीं. व एकदम उत्पन्न होणेंही शक्य नाहीं. कारण, आत्मा नित्य आहे असें ह्मणावें तर, तो निर्विकारी ठरतो; ह्मणून ज्ञानरूपी विकार त्याच्या ठिकाणीं क्रमानें उत्पन्न होणें जक्य नाहीं; व एकदम उत्पन्न होणेंही शक्य नाहीं. कारण, जर ज्ञानरूपी विकार (परिणाम) क्रमानें अथवा एकदम त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होतात असें ह्मटलें तर तो विकारी (परिणामी) ठरल्यानें त्याचें नित्यत्व जातें. तसेंच तो सर्वथा अनित्य आहे ह्मटलें असतांही ज्याप्रमाणें मेलेल्या वैद्यापासून रोग उत्पन्न करणें व रोग घालविणें ह्या दोन्हीही गोष्टी होणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें आत्मा सर्वथा अनित्य (क्षणिक) असल्यामुळें तो विकार उत्पन्न होईपर्यंतही स्थिर नसल्यानें त्याच्या ठिकाणीं ज्ञानरूपी विकार क्रमानें अथवा एकदम उत्पन्न होणें शक्य नाहीं. ह्मणून "आत्मा सर्वथा नित्य आहे" असें नैयायिकांचें ह्मणणें, व "आत्मा सर्वथा अनित्य आहे" असें बौद्धांचें ह्मणणें चुकीचें आहे; असें सिद्ध होतें.

नामूर्तिः सर्वथा युक्तः कर्मबन्धाप्रसङ्गतः ॥
नभसो न ह्यमूर्तस्य कर्मलेपो विलोक्यते ॥ ४४ ॥

अर्थ— आत्मा हे अमूर्तद्रव्य (निराकार द्रव्य) आहे असें नैयायिक ह्मणतात. परंतु, तें ह्मणणें चुकीचें आहे. कारण,

आत्मा सर्वथा अमूर्त असणें योग्य नाहीं. जर तो सर्वथा अमूर्त असेल तर त्याला कर्मबंध होणार नाहीं. कारण अमूर्त ( निराकार ) असलेल्या आकाशाला कर्मबंध झालेला मुळींच दिसत नाहीं. म्हणजे सर्वथा निराकार असलेल्या आकाशाला कर्मबंध आहे असें अनुमानानेंही सिद्ध करतां येणार नाहीं; ही गोष्ट स्पष्ट आहे.

**स यतो बन्धतोऽभिन्नो भिन्नो लक्षणतः पुनः ॥**
**अमूर्तताऽऽत्मनस्तस्य सर्वथा नोपपद्यते ॥ ४५ ॥**

अर्थ— दुसरें असें कीं, ज्या अर्थी आत्मा हा बंधाशीं तादात्म्य पावलेला ( एकरूप झालेला ) असूनही तो स्वतःच्या ज्ञानादि लक्षणामुळें बंधांहून कथंचित् भिन्नही आहे. त्या अर्थी तो सर्वथा अमूर्त आहे, हें म्हणणें जुळत नाहीं.

**निर्बाधोऽस्ति ततो जीवः स्थित्युत्पत्तिव्ययात्मकः ॥**
**कर्त्ता भोक्ता गुणी सूक्ष्मो ज्ञाता द्रष्टा तनुप्रमः ॥४६**

अर्थ— अशा प्रकारचे मागें सांगितलेले दोष येतात म्हणून जीवात्मा हा उत्पत्ति, स्थिति आणि नाश ह्या तिहींनीं युक्त असून, स्वपरिणामांचा कर्ता, कर्मफलाचा भोक्ता, सूक्ष्म, ज्ञान व दर्शन ह्यांनीं युक्त व शरीरायेवढ्या प्रमाणाचा असा आहे, ही गोष्ट निर्बाध सिद्ध होते.

**स्थिते प्रमाणतो जीवे सर्वेऽप्यर्थाः स्थिता यतः ॥**
**क्रियमाणा ततो युक्ता सप्ततत्त्वविचारणा ॥ ४७ ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें प्रमाणानें जीवतत्त्वाची सिद्धि झाली म्हणजे बाकीचे सर्व पदार्थ सिद्ध होतात. म्हणून जीवादि सात तत्त्वांचा विचार करणें योग्य आहे.

**परे वदन्ति सर्वज्ञो वीतरागो न विद्यते ॥**

**किञ्चिज्ज्ञत्वादशेषाणां सर्वथा रागतत्त्वतः ॥ ४८ ॥**

अर्थ— सर्वज्ञ आणि वीतराग असा जीव ह्या त्रैलोक्यांत नाहीं. कारण सर्व जीव सर्वथा किंचिज्ज्ञ असून रागादि दोषांनीं युक्त असेच आहेत; असें दुसरे ( मिथ्यावादी लोक ) ह्मणतात.

**तदयुक्तं वचस्तेषां ज्ञानं सर्वार्थगोचरम् ॥**
**न विना शक्यते कर्तुं सर्वपुंज्ञानवारणम् ॥ ४९ ॥**

अर्थ— वर जें मिथ्यावादी लोकांचें मत सांगितलें आहे, तें योग्य नाहीं. कारण, " जगांत सर्वज्ञ असा कोणीच नाहीं " असें ह्मणण्यांतच सर्वज्ञ सिद्ध होतो. तें असें कीं, " जगांत सर्वज्ञ कोणीच नाहीं " असें ह्मणणाऱ्याला जगांतील सर्व वस्तूंचें ज्ञान असल्यावांचून " जगांत सर्वज्ञ कोणीच नाहीं " असा वाक्यप्रयोगच करतां यावयाचा नाहीं. तेव्हां अर्थात् ' जगांत सर्वज्ञ कोणीच नाहीं ' असें ह्मणणारा जो जीव, तोच सर्वज्ञ होय.

**समस्ताः पुरुषा येन कालत्रितयवर्तिनः ॥**
**निश्चिताः स नरः शक्तः सर्वज्ञस्य निषेधने ॥ ५० ॥**

अर्थ-- वर जें " जगांत सर्वज्ञ कोणीच नाहीं असें ह्मणणारा जो जीव तोच सर्वज्ञ होय " असें सांगितलें आहे; त्याचें प्रयोजन असें आहे कीं, भूतकाळीं होऊन गेलेले पुरुष, वर्तमानकाळीं असलेले पुरुष, आणि भविष्यत्काळीं होणारे पुरुष ह्या सर्वांचें ज्या मनुष्याला निश्चयात्मक ज्ञान असेल; तोच मनुष्य जगांत सर्वज्ञ नाहीं असें ह्मणण्याला समर्थ आहे. मग असें त्रिकालसंबंधी पुरुषांचें ज्याला ज्ञान झालें आहे, त्याला सर्वज्ञ ह्मणण्यास काय हरकत आहे? मुळींच हरकत नाहीं.

**न चाभावप्रमाणेन शक्यते स निषेधितुम् ॥**

**सर्वज्ञेऽतीन्द्रिये तस्य प्रवृत्तिविगमत्वतः ॥ ५१ ॥**

अर्थ— कोणी ह्मणतील कीं, सर्वज्ञाची उपलब्धि होत नसल्यामुळें सर्वज्ञ नाहीं, ह्मणजे सर्वज्ञ असा कोणीच आह्मांला दिसत नसल्यामुळेंच सर्वज्ञ कोणी नाहीं, असें आह्मीं ह्मणतों; तर असें ह्मणतां येत नाहीं. कारण, सर्वज्ञ हा इंद्रियापासून होणाऱ्या ज्ञानांत विषय होण्याला योग्य नसल्यामुळें इंद्रियांची प्रवृत्तीच त्याच्या ठिकाणीं होत नाहीं. ह्मणून सर्वज्ञ उपलब्ध होत नसल्यामुळें, तो नाहीं ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**प्रमाणाभावतस्तस्य न च युक्तं निषेधनम् ॥**
**अनुमानप्रमाणं हि साधनं तस्य विद्यते ॥ ५२ ॥**

अर्थ— आतां कोणी ह्मणेल कीं,–सर्वज्ञ आहे असें ह्मणण्याला प्रमाण नसल्यामुळें आह्मी सर्वज्ञ नाहीं–असें ह्मणतों. तर हें त्यांचें ह्मणणें योग्य नाहीं. कारण, सर्वज्ञाची सिद्धि करून देणारें असें अनुमानप्रमाण आहे.

**वीतरागोऽस्ति सर्वज्ञः प्रमाणाबाधितत्वतः ॥**
**सर्वदा विदितः सद्भिः सुखादिकमिव ध्रुवम् ५३**

अर्थ— तें अनुमान असें— कोणत्याही प्रमाणानें बाध येत नसल्या कारणानें वीतराग आणि सर्वज्ञ असा कोणीतरी आहे, आणि ज्याप्रमाणें सुखादिकांचें निश्चयानें ज्ञान होतें, त्याप्रमाणें तो सर्वज्ञ सज्जनांनीं ज्ञात आहे. ह्मणजे विचारी पुरुषांना कोणीतरी सर्वज्ञ असलाच पाहिजे असें निश्चयानें वाटत आहे. ह्मणून सर्वज्ञ आहे असें वरील अनुमानानें सिद्ध होतें.

**क्षीयते सर्वथा रागः कापि कारणहानितः ॥**
**ज्वलनो हीयते किं न काष्ठानां च वियोगतः ५४**

अर्थ— वरील अनुमानाला पुष्टि आणणारें दुसरें एक अनु-

मान आचार्यांनीं ह्या श्लोकांत दाखविलें आहे. तें असें— रागादिकषाय हे त्यांच्या अंतरंग कारणांचा नाश झाल्यामुळें कोणत्या तरी जीवाच्या ठिकाणीं सर्वथा क्षीण झालेच पाहिजेत. ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण, जर काष्ठांचा वियोग झाला ह्मणजे लांकडें काढून टाकलीं, तर अग्नीचा नाश होत नांहीं काय? अवश्य होतो. त्याप्रमाणें एखाद्या कोणत्यातरी जीवाच्या ठिकाणीं रागद्वेषादि कषायांना उत्पादक अशा कर्मांचा नाश झाल्यामुळें रागादिकषायांचाही निःशेष नाश झालाच पाहिजे. अर्थात् ह्याप्रमाणें ज्या जीवाच्या रागद्वेषादिकांचा नाश झाला असेल तो जीव शुद्ध झाल्यामुळें सर्वज्ञ आहे ह्मणण्यास काय हरकत आहे? मुळींच हरकत नाहीं.

प्रकर्षस्य प्रतिष्ठानं ज्ञानं क्वापि प्रपद्यते ॥
परिमाणमिवाकाशे तारतम्योपलब्धितः ॥ ५५ ॥

अर्थ— सर्वज्ञसाधक असें दुसरें एक अनुमान असें आहे कीं, ज्ञानामध्यें तारतम्य (कमीजास्तीपणा, एकाचें ज्ञान कमीं तर दुसऱ्याचें ज्ञान त्यापेक्षां अधिक, तिसऱ्याचें त्याच्यापेक्षां अधिक ह्याप्रमाणें कमीजास्तपणा) आपल्याला सर्वत्र अढळतो. त्यावरून ज्ञान हें कोठेंतरी– ह्मणजे कोणत्यातरी एखाद्या जीवाच्या ठिकाणीं– आपल्या शेवटच्या मर्यादेला पोहोंचलेंच असलें पाहिजे. जसें परिमाणामध्यें कमीजास्तीपणा दिसत असल्यामुळें तें (परिमाण) आकाशाचे ठिकाणीं आपल्या शेवटच्या मर्यादेला पोचलें आहे; त्याप्रमाणेंच ज्ञानही आपल्या शेवटच्या मर्यादेला पोचलेंच असलें पाहिजे; ही गोष्ट अनुमानानें सहज सिद्ध होते.

प्रकर्षावस्थितिर्यत्र विश्वदृश्वा स गीयते ॥
प्रणेता विश्वतत्त्वानां प्रहताशेषकल्मषः ॥ ५६ ॥

अर्थ— ह्या वरील अनुमानावरून ज्या जीवाच्या ठिकाणीं ज्ञानाची शेवटच्या मर्यादेनें स्थिति असेल तो जीव-त्यानें संपूर्ण कर्मांचा क्षय केला असल्यानें—विश्वदृश्वा ह्मणजे सर्वज्ञ होय, आणि तो सर्वज्ञ असल्यामुळें सर्वतत्त्वांचें निरूपण करणारा होय, असें आह्मी ह्मणतों. ह्याप्रमाणें वरील अनुमानानें सर्वज्ञाची सिद्धि होते.

बोध्यमप्रतिबन्धस्य बुध्यमानस्य न श्रमः ॥
बोधस्य दहतोऽसह्यं पावकस्येव विद्यते ॥ ५७ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें जोरानें पेटून जाळणाऱ्या अग्नीला काय पाहिजे तें जाळण्यास श्रम होत नाहींत, त्याप्रमाणें निष्प्रतिबंध झाल्यामुळें सर्व विषयांचें ग्रहण करणाऱ्या ज्ञानालाही कोणत्याही प्रकारचे आयास होत नाहींत. तात्पर्य— कर्मावरणांतून मुक्त झालेलें ज्ञान संपूर्णवस्तूंचें सहज ग्रहण करतें.

अनुपदेशसंवादि लाभालाभादिवेचनम् ॥
समस्तज्ञमृतेऽन्यस्य निर्लिङ्गं शोभते कथम् ॥ ५८ ॥

अर्थ— दुसऱ्याच्या उपदेशावांचून ह्मणजे कोणी तरी सांगितल्यावांचून लाभ कोणता, अलाभ ( नाश ) कोणता वगैरे गोष्टींचें पृथक्करण करणें ही गोष्ट सर्वज्ञाशिवाय दुसऱ्यानें केली असतां ती निर्हेतुक असल्यानें शोभेल तरी कशी ? मुळींच शोभणार नाहीं.

अपौरुषेयतो युक्तमेतदागमतो न च ॥
युक्त्या विचार्यमाणस्य सर्वथा तस्य हानितः ५९

अर्थ— आतां कोणी ह्मणतील कीं, अपौरुषेय ( कोणीं मनुष्यानें न केलेल्या ) अशा आगमावरून ( वेदावरून ) वरील गोष्टीचा निर्णय करतां येण्यासारखा आहे; तर तसें होणें

शक्य नाहीं. कारण, त्या अपौरुषेय आगमाचा युक्तीनें विचार केला असतां त्याचा सर्वथा नाश होतो. ह्मणजे वेद हा अपौरुषेय आहे कीं काय? ह्याचा युक्तीनें विचार करूं लागल्यास तो अपौरुषेय नसून पौरुषेय आहे असेंच ठरतें.

**आगमोऽकृत्रिमः कश्चिन्न कदाचन विद्यते ॥**
**तस्य कृत्रिमतस्तस्माद्विशेषानुपलम्भतः ॥ ६० ॥**

अर्थ— कोणताही आगम ( शास्त्र ) अकृत्रिम ( पुरुषप्रयत्नावांचून उत्पन्न झालेला असा ) केव्हांच असणें शक्य नाहीं. कारण, जो आगम अपौरुषेय आहे असें मिथ्यावादी लोकांचें ह्मणणें आहे, त्यांत कृत्रिम ( पुरुषप्रयत्नानें झालेल्या ) आगमापेक्षां कांहींच विशेष उपलब्ध होत नाहीं. ह्मणजे, पौरुषेय आगम आणि अपौरुषेय आगम ह्या दोहोंत कांहीं फरक दिसत नाहीं. ह्मणून अपौरुषेय आगम असणें संभवनीय नाहीं.

**पश्यन्तो जायमानं यत्ताल्वादिक्रमयोगतः ॥**
**वदन्त्यकृत्रिमं वेदमनार्यं किमतः परम् ॥ ६१ ॥**

अर्थ— अक्षरोच्चाराला अवश्य लागणाऱ्या तालु वगैरे स्थानांच्या क्रमानें होत असलेल्या योगामुळें हा वेद उत्पन्न झालेला आहे, असें पाहून सुद्धां, हे मिथ्यामतांतील लोक त्याला अकृत्रिम ( पुरुषप्रयत्नावांचून झालेला ) असें ह्मणतात, ह्यापेक्षां अधिक मूर्खपणा तो कोणता?

**त्रिलोकव्यापिनो वर्णा व्यज्यन्ते व्यञ्जकैरिति ॥**
**न सत्यभाषिणी भाषा सर्वव्यक्तिप्रसङ्गतः ॥ ६२ ॥**

अर्थ— वर्ण ( अक्षरें ) हे त्रैलोक्यांत व्याप्त झालेले असून त्यांच्या व्यक्त होण्याचीं साधनें जेथें मिळतात, त्या ठिकाणीं ते व्यक्त होतात, असें वेदवादी लोकांचें ह्मणणें आहे.

परंतु तें ह्मणणें खरें नाहीं. कारण, त्रैलोक्यांत व्यापून असणाऱ्या वर्णांना त्यांच्या व्यक्त होण्याचीं साधनें (मनुष्यांनीं केले जणारे वर्णोच्चारांचे प्रयत्न) मिळालीं असतां ते वर्ण व्यक्त होतात असें ह्मणणें जर खरें मानिलें, तर, वर्ण हे व्यापक असल्यानें एकाच कालीं सर्व जगांत व्यक्त व्हावयास पाहिजेत; तसें तर केव्हांच होत नाहीं. ह्मणजे, आपण जेवढीं अक्षरें उच्चारूं तेवढीं सर्व जगांत व्यक्त होत नसून अल्पप्रदेशांत व्यक्त होत असतात. ह्मणून वेदवादी लोकांच्या ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. असें ह्मणणें भाग आहे.

**एकत्रभाविनः केचिद्व्यज्यन्ते नापरे कथम् ॥**
**न दीपव्यज्यमानानां घटादीनामयं क्रमः ॥ ६३ ॥**

अर्थ— दुसरें असें कीं, एका तालुस्थानाच्या ठिकाणीं उत्पन्न होणारे देखील सर्व वर्ण व्यक्त होत नसून त्यांतील कित्येक वर्णच व्यक्त होतात. ह्यांत तालुस्थानापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व वर्णांचें व्यंजक (प्रकाशक अथवा स्पष्ट करणारें) तालुस्थान असून बाकीचे वर्ण कां बरें व्यक्त होत नाहींत? अवश्य व्यक्त व्हावयास पाहिजेत. कारण, दीपानें व्यक्त होणाऱ्या घटादिपदार्थांचा असा क्रम नाहीं. ह्मणजे ते कित्येक व्यक्त होतात, कित्येक व्यक्त होत नाहींत असा प्रकार नाहीं. तर दीपानें व्यक्त होणारे जितके पदार्थ त्या ठिकाणीं असतील तितके सर्व पदार्थ त्या दीपानें व्यक्त होत असतात.

**व्यञ्जकव्यतिरेकेण निश्चीयन्ते घटादयः ॥**
**स्पर्शप्रभृतिभिर्जातु न वर्णाश्च कथञ्चन ॥ ६४ ॥**

अर्थ— आणखी असें कीं, दीपादिकांनीं व्यक्त केले जाणारे जे घटादिपदार्थ असतात, ते, त्यांना व्यक्त करणारा (स्पष्ट

दाखवून देणारा ) दीप जरी नसला, तथापि स्पर्शादिकांनींही व्यक्त होत असतात. ह्मणजे दीप नसला तरी मनुष्याला पदार्थाला स्पर्श केल्यानें हा घट आहे, पट आहे, वगैरे ज्ञान होतें. तसें वर्णाचें मात्र केव्हांही होत नाहीं. [ह्मणजे, त्यांची व्यंजकजीं ताल्वादि स्थानें तीं नसल्यास त्यांची केव्हांच व्यक्तता होत नाहीं. असें कां व्हावें?

**व्यज्यन्ते व्यञ्जकैर्वर्णा न व्यज्यन्ते पुनर्ध्रुवम् ॥**
**इत्यत्र विद्यते काचिन्न प्रमा वेदवादिनाम् ॥ ६५ ॥**

अर्थ— आणखी असें कीं, वर्णांच्या स्पष्टीकरणाला लागणारी सामग्री असली तरच वर्ण व्यक्त होतात, नाहीं तर निश्चयानें होत नाहींत; असें ह्मणण्याला वेदवादी लोकांना कोणतेंच प्रमाण दाखवितां येणार नाहीं. मग त्यांचें तरी ह्मणणें [ वर्ण त्रैलोक्यव्यापी आहेत व त्यांच्या व्यक्त होण्याचीं साधनें ज्या ठिकाणीं मिळतात त्या ठिकाणीं ते व्यक्त होतात असें ह्मणणें ] खरें कशावरून समजावें?

**विना सर्वज्ञदेवेन वेदार्थः केन कथ्यते ॥**
**स्वयमेवेति नो वाच्यं संवादित्वप्रसङ्गतः ॥ ६६ ॥**

अर्थ— सर्वज्ञ अशा परमेश्वरावांचून वेदाचा अर्थ आपोआप कोण सांगणार? कोणीही सांगणारा नाहीं. असें वेदवादी लोकांचें ह्मणणें आहे. परंतु तसें ह्मणतां येत नाहीं. कारण, तसें ह्मटलें तर ईश्वर आमच्याप्रमाणें बोलका आहे असें ह्मणावें लागेल.

**न पारम्पर्यतो ज्ञानमासर्वज्ञं प्रवर्तते ॥**
**समस्तानामिवान्धानां मूलज्ञानं विना कृतम् ६७**

अर्थ— वेदार्थाचें ज्ञान हें परंपरेनें सर्वज्ञ अशा ईश्वरापासून

चालत आलें आहे असें ह्मणण्यांतही कांहीं अर्थ नाहीं. कारण, वेदवाद्यांच्या मतांत वास्तविक सर्वज्ञ असा कोणी नसल्यानें सर्वजग आंधळ्यासारखें आहे; आणि त्यामुळें अगदीं प्रथम ज्याला वेदाच्या अर्थाचें ज्ञान झालें असेल, त्याला तें ज्ञान कोणीही सांगितल्यावांचूनच झालें आहे, असें ह्मणावें लागेल.

**कृत्रिमेष्वप्यनेकेषु न कर्ता स्मर्यते यतः ॥**
**कर्त्रस्मरणतो वेदो युक्तो नाकृत्रिमस्ततः ॥ ६८ ॥**

अर्थ— आतां वेदवाद्यांचें आणखी एक ह्मणणें आहे. तें असें कीं, वेदाचा कर्ता कोण ह्याचें स्मरण कोणालाच होत नाहीं. अर्थात् वेदाचा कर्ता अमुक असें माहिती नसल्या-मुळें त्या कर्त्याचें स्मरण होत नाहीं. त्यामुळें वेद हा कोणी तरी केला असावा असें ह्मणतां येत नाहीं. ह्यावर आचार्य ह्मणतात कीं, जसा वेदाचा कर्ता अमुक असें तुह्मांला आठवत नाहीं, त्याप्रमाणें पुष्कळ ग्रंथांच्या कर्त्यांचें स्मरण होत नाहीं. ह्मणजे कोणी तरी केलेले असलेल्या अशा पुष्कळ ग्रंथाच्या कर्त्यांचेंही ज्ञान नसल्यामुळें त्यांची आह्मांला आठवण होत नाहीं. ह्मणून ते ग्रंथ कोणी केलेले नाहींत असें होत नाहीं. तेव्हां " कर्त्याचें स्मरण होत नाहीं " येवढ्यानेंच " वेद कोणी केलेला नाहीं " असें ह्मणतां येत नाहीं. तात्पर्य–कर्ता माहिती नसल्यानें, त्याचें स्मरण होत नाहीं येवढ्यानें " वेद कोणी केलेला नाहीं " ह्मणजे " वेद अपौरुषेय आहे " असें ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**हिंसादिवादकत्वेन न वेदो धर्मकांक्षिभिः ॥**
**ठकोपदेशवन्नूनं प्रमाणीक्रियते बुधैः ॥ ६९ ॥**

अर्थ— वेद हा हिंसादि दुष्कृत्यें करावयास सांगणारा असल्यामुळें धार्मिक असे ज्ञाते लोक ठकाच्या उपदेशाप्रमाणें त्याला ( वेदाला ) मुळींच प्रमाण मानीत नाहींत.

**वीतरागश्च सर्वज्ञो जिन एवावशिष्यते ॥**
**अपरेषामशेषाणां रागद्वेषादिदूषितः ॥ ७० ॥**

अर्थ— वीतराग आणि सर्वज्ञ असा एक श्रीजिनेंद्रच कायतो उरतो. कारण, बाकीच्या सगळ्यांना रागद्वेष वगैरे दोषच असलेले दिसतात.

**न विरागा न सर्वज्ञा ब्रह्मविष्णुमहेश्वराः ॥**
**रागद्वेषमदक्रोधलोभमोहादियोगतः ॥ ७१ ॥**

अर्थ— ब्रह्मदेव, विष्णु आणि महादेव हे तिघेही वीतराग नाहींत, व सर्वज्ञही नाहींत. कारण, त्यांच्यामध्यें राग, द्वेष, मद, क्रोध, लोभ, मोह, वगैरे दोष आहेत.

**रागवन्तो न सर्वज्ञा यथा प्रकृतमानवाः ॥**
**रागवन्तश्च ते सर्वे न सर्वज्ञास्ततः स्फुटम् ॥ ७२ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें आतांच्या कालांतील मनुष्यें रागवान् असल्यामुळें सर्वज्ञ नाहींत, त्याप्रमाणें ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर हे तीनही रागवान् असल्यामुळें सर्वज्ञ नाहींत; हें स्पष्ट आहे.

**आश्लिष्टास्तेऽखिलैर्दोषैः कामकोपभयादिभिः ॥**
**आयुधप्रमदाभूषाकमण्डल्वादियोगतः ॥ ७३ ॥**

अर्थ— ते तिघेही आयुधें, स्त्रिया, अलंकार, कमंडलु वगैरे वस्तूंनीं युक्त असल्यामुळें काम, क्रोध, भय वगैरे सर्व दोषांनीं युक्त असे आहेत.

**प्रमदा भाषते कामं द्वेषमायुधसङ्ग्रहः ॥**
**अक्षसूत्रादिकं मोहं शौचाभावं कमण्डलुः ॥७४॥**

अर्थ— त्यांत स्त्री ही त्यांच्यांत कामविकार असल्याचें सांगते, अयुधांचा संग्रह हा क्रोधाचें कथन करतो. रुद्राक्षांची माला ही मोह असल्याचें दाखविते. आणि कमंडलु हा त्यांच्या अशुद्धपणाचें निवेदन करितो.

**परमः पुरुषो नित्यः सर्वदोषैरपाकृतः ॥**
**तस्यैतेऽवयवाः सर्वे रागद्वेषादिभागिन ॥ ७५ ॥**

अर्थ— वेदवादी ह्मणतात कीं, ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर ह्यांनाही कारणीभूत असला तो परमपुरुष ( परमात्मा किंवा निर्गुण ब्रह्म ) नित्य असून सर्वदोषरहित असा आहे. आणि त्याचेच अंश असे हे ब्रह्मा विष्णु आणि महादेव हे तिघे रागद्वेषादि दोषांनीं युक्त आहेत; असा आमचा सिद्धांत आहे.

**नैषाऽपि रोचते भाषा विचारोद्यतचेतसाम् ॥**
**रागित्वेऽवयवानां हि विरागोऽवयवी कुतः ॥७६ ॥**

अर्थ— आचार्य ह्मणतात- हें वर सांगितलेलें जें वेदवादी लोकांचें ह्मणणें आहे, तें विचारी मनुष्यांना बरें वाटण्यासारखें नाहीं. कारण, अवयव हे रागद्वेषादिकांनीं युक्त असल्यावर अवयवी जो परमात्मा तो विराग कसा असणार? मुळींच असणें शक्य नाहीं.

**बुद्धिमद्धेतुकं विश्वं कार्यत्वात्कलशादिवत् ॥**
**बुद्धिमाँस्तस्य यः कर्ता कथ्यते स महेश्वरः ॥७७॥**
**न विना शम्भुना नूनं देहद्रुमनगादयः ॥**
**कुलालेनेव जायन्ते विचित्राः कलशादयः ॥७८॥**

**ततोऽस्ति जगतः कर्ता विश्वदृश्वा महेश्वरः ॥**
**वचनं विद्यते नेदं चिन्त्यमानं विचक्षणैः ॥ ७९ ॥**

अर्थ— वेदवादी लोकांचें अणखी असें ह्मणणें आहे कीं, घटादि वस्तु ज्याप्रमाणें कार्य असल्यामुळें बुद्धिमान् अशा कर्त्यानें (कुलालानें) केलेल्या आहेत, त्याप्रमाणें हें जगही कार्य असल्यानें कोणीतरी बुद्धिमान् अशा कर्त्यानेंच केलेलें असलें पाहिजे. आणि त्याचा जो बुद्धिमान् असा कर्ता तोच महेश्वर (महादेव) होय. ज्याप्रमाणें विचित्र असे घट, रांजण वगैरे पदार्थ कुंभारावांचून होणें शक्य नाहींत, त्याप्रमाणें विचित्र असे शरीर, वृक्ष, पर्वत वगैरे पदार्थही त्या महेश्वरावांचून होणें शक्य नाहीं. ह्मणून सर्व विश्वाचें ज्याला ज्ञान आहे असा महेश्वर हा जगाचा कर्ता आहे, असें मानलेंच पाहिजे. ह्याप्रमाणें वेदवादी लोकांचें ह्मणणें आहे. परंतु विद्वान् लोकांनीं विचार केला असतां तें ह्मणणें टिकत नाहीं. त्याचें कारण पुढें सांगितलें आहे.

**कार्यत्वादित्ययं हेतुस्तस्य साधयते यथा ॥**
**बुद्धिमत्त्वं तथा तस्य देहवत्त्वमपि ध्रुवम् ॥ ८० ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें घटादिवस्तु कार्यरूप असल्यानें त्यांचा कोणीतरी कर्ता असतो, त्याप्रमाणें विश्व हेंही कार्यरूप असल्यानें त्याचाही कोणीतरी कर्ता बुद्धिमान असा असलाच पाहिजे, असें अनुमानानें सिद्ध होतें; असें वेदवादी लोकांचें ह्मणणें आहे. पण त्यांत दोष येतो. तो असा कीं– “ जगाचा कर्ता कोणीतरी बुद्धिमान् असला पाहिजे ” असें अनुमान करण्याला “जग हें कार्यरूप असल्यामुळें ” हा हेतु आहे; आणि त्या हेतूनें

जगाचा कर्ता कोणीतरी बुध्दिमान् असा असला पाहिजे असें अनुमान होतें, हें जरी खरें आहे, तथापि ज्याप्रमाणें घटादिवस्तु कार्यरूप असल्यानें त्यांचा कर्ता बुद्धिमान् असून देहधारी असतो त्याप्रमाणें जग हें कार्यरूप असल्यानें त्याचाही कर्ता कोणीतरी बुध्दिमान् असून देहधारी असला पाहिजे, ही गोष्टही त्याच हेतूनें सिद्ध होते. अर्थात् जगाचा कर्ता जो ईश्वर महादेव वेदवाद्यांनीं मानिला आहे, तो जसा जग हें कार्य असल्यानें बुद्धिमान् मानला आहे तसाच तो देहधारी आहे असेंही त्यांनीं मानिलें पाहिजे.

नाशरीरी मया दृष्टः कुम्भकारः क्वचिद्यतः ॥
कुलालस्तस्य दृष्टान्तस्ततो ब्रूते सदेहताम् ॥ ८१ ॥

अर्थ— ज्या अर्थीं शरीर नसलेला कुंभार घटादि वस्तु निर्माण करीत असलेला कोठेंच आह्मीं पाहेलेला नाहीं, त्या अर्थीं जगाचा कर्ता जो ईश्वर महादेव तोही देहधारी असल्यावांचून त्याला जग करता येणें शक्य नाहीं. तेव्हां कुंभाराचा दृष्टांतही ईश्वराला शरीर असावयास पाहिजे ह्याची सिद्धि करून देत आहे.

सदेहस्य च कर्तृत्वे सोऽस्मदादिसमो मतः ॥
दृश्यतां प्रतिपद्येत कुम्भकारादिवत्ततः ॥ ८२ ॥

अर्थ—जगाचा कर्ता जो महादेव तो जर वरील अनुमानाप्रमाणें देहधारी झाला, तर मग तो आमच्यासारखाच असल्यानें कुंभाराप्रमाणें तो आह्मांला दिसला पाहिजे, असा प्रसंग येतो.

भुवनं क्रियते तेन विनोपकरणैः कथम् ॥

**कृत्वा निवेश्यते कुत्र निरालम्बे विहायसि ॥ ८३॥**

अर्थ— ईश्वर जग उत्पन्न करतो असें जर ह्मणावें; तर जगाच्या उत्पादनाला लागणाऱ्या सामग्रीवांचून जग कसें उत्पन्न करतो? आणि जग उत्पन्न करून ह्या निराश्रय अशा आकाशांत कोठें बरें ठेवितो? अशी शंका येते.

**विचेतनानि भूतानि सिसृक्षावशतः कथम् ॥**
**विनिर्माणाय विश्वस्य वर्तन्ते तस्य कथ्यताम् ॥८४**

अर्थ— "ईश्वर जग उत्पन्न करतो; ह्मणजे ईश्वराच्या नुसत्या इच्छेनेंच हीं पंचमहाभूतें जगाच्या रूपानें परिणाम पावतात." असें वेदवादी लोकांचें ह्मणणें आहे. आचार्य ह्मणतात ह्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण, ईश्वराला जी जगाच्या उत्पत्तीची इच्छा होतें, तेवढ्याच कारणानें हीं अचेतन असलेलीं पंचमहाभूतें त्या जगाच्या उत्पादनाला कशी बरें प्रवृत्त होतात! हें सांगा.

तात्पर्य पंचमहाभूतें हीं अचेतन असल्यानें ईश्वराच्या फक्त इच्छेनेंच तीं जगन्निर्माणाला प्रवृत्त होणें शक्य नाहीं. ह्याप्रमाणें वेदवाद्यांच्या मताचें खंडण करून आतां बौद्धांच्या मताचें खंडण करतात.

**बुध्दोऽपि न समस्तज्ञः कथ्यते तथ्यवादिभिः ॥**
**प्रमाणादिविरुद्धस्य शून्यत्वादेर्निवेदनात् ॥ ८५ ॥**

अर्थ— गौतमबुद्ध हाही सर्वज्ञ आहे असें सत्यभाषी लोक ह्मणत नाहींत. कारण, त्यानें प्रमाणाला विरुद्ध दिसणाऱ्या अशा सर्वशून्यत्वादिकांचें आपल्या मतांत निरूपण केलें आहे. त्याचें ह्मणणें असें कीं, हें सर्व जग शून्यापासून उत्पन्न झालें

आहे. ह्मणजे, ह्या जगाच्या मुळाचा शोध केला असतां मुळांत कांहीं नाहीं असेंच ह्मणावें लागतें. ह्मणून शून्यापासुन उत्पन्न झालेलें हें जगहीं शून्यरूपच आहे. हें जग दुःखरूप आहे; क्षणिक आहे, आणि स्वलक्षण आहे, ह्मणजे सर्व वस्तु क्षणिक असल्यानें त्या आमच्यासारख्या आहेत असें ह्मणतां येत नसल्यानें, त्या आपल्या सारख्याच आपण आहेत. असें बुद्धाचें मत आहे; परंतु तें प्रमाणानें सिद्ध होत नाहीं.

**प्रमाणेनाप्रमाणेन सर्वशून्यत्वसाधने ॥**
**विकल्पद्वयमायाति कोकयुग्ममिवाम्भसि ॥ ८६ ॥**

अर्थ— कारण, त्या मताचा विचार करूं लागलें असतां ज्याप्रमाणें सरोवरांत चक्रवाक व चक्रवाकी अशी जोडी प्राप्त होते, त्याप्रमाणें " सर्व जगावर शून्यत्वाचें जें साधन बौद्धमतीं लोक करतात तें काय प्रमाणानें करतात, कीं प्रमाणावांचून करतात? " अशी ही विकल्पाचा जोडी समोर येते ह्मणजे हे दोन प्रश्न उद्भवतात.

**साधनेऽस्य प्रमाणेन सर्वशून्यव्यतिक्रमः ॥**
**अङ्गीकृतेः प्रमाणस्य तन्निषेधविधायिनः ॥ ८७ ॥**

अर्थ— त्यांत " सर्वशून्यत्व आह्मीं प्रमाणानें सिद्ध करतो " असें जर ह्मणतील तर त्यांच्या सर्वशून्यत्वाचा नाश होतो. कारण, शून्यत्वाचें साधक ह्मणून जें प्रमाण त्यांनीं स्वीकारलें आहे, तें प्रमाण जर शून्यरूप असतें, तर तें साधक झालें नसतें. ह्मणून तें अस्तित्वरूप आहे, असें म्हटलें पाहिजे. आणि तसें म्हटलें असतां त्या प्रमाणाला शून्यरूपता नसल्यानें सर्वशून्यत्वाचा निरास होतो. कारण, प्रमाण हेंही सर्वांतर्गतच

असल्यानें शून्यरूपच असलें पाहिजे. तें तसें नसल्यानें बौद्धांच्या सिद्धांताला बाध आल्यासारखें झालें.

**प्रमाणव्यतिरेकेण सर्वशून्यत्वसाधने ॥**
**सर्वस्य चिन्तितं सिध्येत्तत्त्वं केन निषिध्यते ॥८८॥**

अर्थ— प्रमाणावांचूनच सर्ववस्तूंचें शून्यत्व आह्मीं साधन करतो असें ह्मणावें, तर, जगांतील सर्व मतें खरीं ठरतील. कारण, बौद्धांनीं जसें प्रमाणावांचूनच सर्वशून्यत्व सिद्ध केलें आहे, त्याप्रमाणें बाकीच्या मतांतील तत्त्वेंही त्या त्या सिद्धांतवाद्यांनीं प्रमाणावांचूनच सिद्ध केलेलीं आहेत. मग त्यांचा निषेध कशानें करता येईल? मुळींच करता यावयाचा नाहीं.

**सर्वत्र सर्वदा तत्त्वे क्षणिके स्वीकृते सति ॥**
**फलेन सह सम्बन्धो धार्मिकस्य कुतस्तनः ॥ ८९ ॥**

अर्थ— दुसरें असें कीं, जीव हा सर्वदा सर्व ठिकाणीं क्षणिक आहे असें मानिलें असतां, धर्माचरण करणाऱ्या जीवाला त्या धर्माचरणापासून उत्पन्न होणाऱ्या फलाचा संबंध कसा बरें व्हावा? होणार नाहीं. कारण, जीव क्षणिक असल्यानें धर्माचरण करणारा जीव फलोपभोगाच्या समयीं रहात नाहीं. अर्थात् धर्माचरण करणारा जीव निराळा आणि त्याचें फल भोगण्याच्या वेळीं असलेला जीव निराळा असें होतें.

**वध्यस्य वधको हेतुः क्षणिके स्वीकृते कथम् ॥**
**प्रत्यभिज्ञा कथं लोकव्यवहारप्रवर्तिनी ॥ ९० ॥**

अर्थ— तसेंच जीव क्षणिक मानला असतां वध्याच्या ( वध करण्याला योग्य अशा जीवाच्या ) वधाचें कारण कसें संभवणार! तात्पर्य— वधाची शिक्षा होण्याला योग्य अस

अपराध केला असतां वधाची शिक्षा होते. पण जीव क्षणिक असल्यानें अपराध करणारा जीव शिक्षा करण्याच्या वेळीं नाहीं, असें झाल्यामुळें अपराधच नाहींसा झाला. मग शिक्षा कशी करावयाची? दुसरें असें कीं, सर्व वस्तु क्षणिक मानिल्यानें सर्वव्यवहाराला साधनीभूत असलेली अशी प्रत्यभिज्ञा कशी व्हावी? होणार नाहीं. कारण, भूतकाळीं व वर्तमानकाळीं असलेला असा पदार्थ प्रत्यभिज्ञेंतील विषय असतो. जसें "काल पाहिलेला तोच हा मनुष्य होय" ह्या ज्ञानाला प्रत्यभिज्ञा असें ह्मणतात. ह्यांत काल पाहिलेला मनुष्यच आज दृष्टीं पडला असल्यानें तो मनुष्य ( ह्या ज्ञानांतील विषय ) काल ( भूतकाळीं ) आणि आज ( वर्तमानकाळीं ) असलेला असा पदार्थ आहे. आणि तो ह्या दोनी काळीं असणारा एकच अशा रूपानें ह्या ज्ञानांत विषय झाला आहे. ह्या ज्ञानाला "प्रत्यभिज्ञा" असें ह्मणतात. आतां जर सर्व पदार्थ क्षणिक मानले, तर, काल पाहिलेला आणि आज पाहिलेला ह्या दोहोंचें ऐक्य होणार नाहीं. कारण, सर्व पदार्थ क्षणिक ( प्रत्येक क्षणीं उत्पन्न होऊन नाश पावणारे ) असे असल्यानें काल पाहिलेला मनुष्य निराळा व आज पाहिलेला मनुष्य निराळा असें होऊन त्या दोघांचें ऐक्य मानतां येणार नाहीं. त्यामुळें "काल पाहिलेला तोच हा मनुष्य होय" असें ज्ञान होणार नाहीं.

व्याघ्रयाः प्रयच्छतो देहं निगद्य कृमिमन्दिरम् ॥
दातृदेवविमूढस्य करुणा बत कीदृशी ॥ ९१ ॥
जननी जगतः पूज्या हिंसिता येन जन्मनि ॥
मांसोपदेशिनस्तस्य दया शौद्धोदनेः कुतः ॥९२॥

अर्थ— ज्यानें शरीर हें किड्यांचें घर आहे असें मानून त एका वाघिणीला दिलें त्या दाता आणि देव ह्या दोहोंविषयीं ज्ञानशून्य असलेल्या बुद्धाला दया कसली बरें? तसेंच जगाला पूज्य असलेली अशी माता ज्यानें त्याच जन्मांत मारली त्या मांसभक्षणाचा उपदेश करणाऱ्या बुद्धाला दया कोठून असणार? अर्थात् अशा निर्दय मनुष्यानें उपदेशिलेलें मत ग्राह्य कसें होणार? मुळींच होणार नाहीं.

**यो ज्ञात्वा प्राकृतं धर्मं भाषतेऽसौ निरर्थकः ॥**
**निर्गुणो निष्क्रियो मूढः सर्वज्ञः कपिलः कथम् ॥९३**

अर्थ— जो तुच्छ धर्म समजून घेऊन बडबडत आहे तो हा व्यर्थ ( ज्याच्यापासून कोणताच उपयोग नाहीं असा ) निर्गुण आणि निष्क्रिय असा मूर्ख कपिल सर्वज्ञ कसा बरें होईल? मुळींच होणार नाहीं.

**आर्यास्कन्धानलादित्यसमीरणपुरःसराः ॥**
**निगद्यन्ते कथं देवाः सर्वदोषपयोधयः ॥ ९४ ॥**

अर्थ— सर्वदोषांचे समुद्रच कीं काय! अशा पार्वती, कार्तिकस्वामी, अग्नि, वायु वगैरे ज्यांत अग्रेसर आहेत अशांना देव कसें ह्मणावें?

**गाढमश्नाति या हन्ति खुरशृङ्गैः शरीरिणः ॥**
**सा पशुर्गौः कथं वन्द्या वृषस्यन्ती स्वदेहजम् ॥९५**

अर्थ— जी पुष्कळ खाते, लाथांनीं व शिंगांनीं दुसऱ्याला मारते आणि आपल्यापासून झालेल्या मुलाबरोबरही कामक्रीडा करते, ती पशू असलेली गाय वंद्य कशी बरें होईल? होणार नाहीं.

**चेद्दुग्धपानतो वन्द्या महिषी किं न वन्द्यते ॥**
**विशेषो दृश्यते नास्या महिषीतो मनागपि ॥**

अर्थ— जर गायीचें दूध प्यावयास मिळतें ह्मणून ती वंद्य असेल, तर मग ह्मैस कां बरें वंद्य नाहीं? कारण, ह्मशीपेक्षां गायीमध्यें कांहीं अधिक विशेष असावा असें आह्माला तरी दिसत नाहीं.

**या तीर्थमुनिदेवानां सर्वेषामाश्रयः सदा ॥**
**ऊह्यते हन्यते सा गौर्मूढैर्विक्रीयते कथम् ॥ ९७ ॥**

अर्थ— जी गाय तीर्थें, मुनी आणि देव ह्या सर्वांना नेहमीं आश्रय आहे असें मानतात, तीच गाय तिला वंद्य मानणारे मूर्ख मारतात आणि विकतात! हें कसें बरें होतें?

**मुसलं देहली चुल्ली पिप्पलश्चम्पको जलम् ॥**
**देवा यैरभिधीयन्ते वर्ज्यन्ते तैः परेऽत्र के ॥९८॥**

अर्थ— मुसळ, देव्हडी, चूल, पिंपळ, चाफा, पाणी ह्यांना जे देव असें ह्मणतात, त्यांनीं दुसरे कोणते पदार्थ सोडले आहेत? मुळींच नाहीत. अर्थात् सर्वांनाच ते देव म्हणत असतात.

**इत्थं विविच्य परिमुच्य कुदेववर्गं ।**
**गृण्हाति यो जिनपतिं भजते स तत्त्वम् ॥**
**गृण्हाति यः शुभमतिः परिमुच्य काचं ।**
**चिन्तामणिं स लभते खलु किं न सौख्यम् ॥९९॥**

अर्थ— ह्याप्रमाणें विचार करून कुदेवांचा त्याग करून जो मनुष्य जिनपतीचें ग्रहण करतो तो तत्वाचें (आत्मस्वरूपाचें सेवन करतो. बरोबरच आहे. कारण जो सुबुद्धि मनुष्य कांच टाकून देऊन चिंतामणि ग्रहण करतो, तो सुख मिळवीत नाहीं काय? अवश्य मिळवितो.

**मिथ्यात्वदूषणमपास्य विचित्रदोषं ।**

**संरूढसंसृतिवधूपरितोषकारि ॥**
**सम्यक्त्वरत्नममलं हृदि यो निधत्ते ।**
**मुक्त्यङ्गनाऽमितगतिस्तमुपैति सद्यः ॥ १०० ॥**

अर्थ— ज्यामध्यें अनेकप्रकारचे दोष आहेत; आणि जें अनादिकालापासून चालत आलेल्या संसृतिरूपी वधूचा संतोष करणारें आहे असें मिथ्यात्वरूपी दूषण टाकून देऊन, जो पुरुष निर्दोष असें सम्यक्त्वरूपी रत्न आपल्या हृदयीं धारण करतो त्याला जिच्यापासून अनंतज्ञानाची प्राप्ति होते अशी मुक्तिसुंदरी तत्काल प्राप्त होते.

इत्यमितगतिकृतश्रावकाचारे चतुर्थः परिच्छेदः

---

## परिच्छेद पांचवा.

---

मद्यमांसमधुरात्रिभोजनं ।
क्षीरवृक्षफलवर्जनं त्रिधा ॥
कुर्वते व्रतजिघृक्षया बुधा- ।
स्तत्र पुष्यति निषेविते व्रतम् ॥ १ ॥

अर्थ—मद्य, मांस, मध, रात्रिभोजन आणि पंचोदुंबरफळें ह्यांचा त्याग शहाणे लोक व्रत घेण्याच्या इच्छेनें करतात. त्या त्यागाचें मन, वाणी, आणि काय ह्या तिहींच्या योगानें सेवन केलें असतां तें व्रत वृद्धि पावतें.

मद्यपस्य धिषणा पलायते ।
दुर्भगस्य वनितेव दूरतः ॥
निन्द्यता च लभते महोदयं ।
क्लेशितेव गुरुवाक्यमोचितः ॥ २ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें दरिद्री मनुष्याची स्त्री दूर पळून जाते; त्याप्रमाणें मद्यपान करणाऱ्यांची बुद्धि दूर पळून जाते. आणि वडिलाचें बोलणें न ऐकल्यानें ज्याप्रमाणें क्लेश वाढतात, त्याप्रमाणें मद्यपाची निंदा सर्वत्र वृद्धि पावते.

विह्वलः स जननीयति प्रियां ।
मानसेन जननीं प्रियीयति ॥
किङ्करीयति निरीक्ष्य पार्थिवं ।
पार्थिवीयति कुधीः स किङ्करम् ॥ ३ ॥

अर्थ— मद्यपान करणाऱ्याच्या मनाला मोह होत असल्यानें तो आपल्या स्त्रीला माता व मातेला स्त्री समजतो!

आणि राजाला पाहून त्याला आपला नोकर समजतो व नोक-
राला तो दुर्बुद्धि राजा समजतो!

सर्वतोऽप्युपहसन्ति मानवा।
वाससीमपहरन्ति तस्कराः॥
मूत्रयन्ति पतितस्य मण्डला।
विस्तृते विवरकाङ्क्षया मुखे॥ ४॥

अर्थ— मद्यप्राशन करणाऱ्याला सर्व लोक हंसतात, त्याचें वस्त्र चोर काढून नेतात; आणि तो जमिनीवर पडला असतां त्याच्या उघडलेल्या तोंडांत हें बिळ आहे असें समजून त्यांत कुतरे लघ्वी करतात.

मंक्षु मूर्च्छति बिभेति कम्पते।
फूत्करोति ह्रदते प्रछर्दति॥
खिद्यते स्खलति वीक्षते दिशो।
रोदिति स्वपिति जक्षतीर्ष्यति॥ ५॥

अर्थ—मद्यपान केलेला मनुष्य तत्काल मूर्च्छित होतो, भितो, कांपूं लागतो, फुसफुसूं लागतो, बसल्या ठिकाणीं मलमूत्र करतो, ओकतो, खिन्न होतो, वारंवार ठेंचकळतो, चोहीकडे पाहूं लागतो, रडूं लागतो, निजतो, खाऊं लागतो, आणि लोकाला ईर्षा दाखवितो.

ये भवन्ति विविधाः शरीरिण-।
स्तत्र सूक्ष्मवपुषो रसाङ्गिकाः॥
तेऽखिला झटिति यान्ति पञ्चतां।
निन्दितस्य चषकस्य पानतः॥ ६॥

अर्थ— मद्याच्या रसानेंच ज्यांचें शरीर बनलेलें आहे असे जे अनेक सूक्ष्मशरीराचे जीव त्या मद्यांत उत्पन्न झालेले

असतात; ते सर्व जीव मद्याचा निंद्य पेला प्राशन केल्यानें तत्काल मरण पावतात.

वारुणीनिहितचेतसाऽखिला ।
यान्ति कान्तिमतिकीर्तिसम्पदः ॥
वेगतः परिहरन्ति योषितो ।
वीक्ष्य कान्तमपराङ्गनागतम् ॥ ७ ॥

अर्थ— पुरुषाचें चित्त मदिरेवर आसक्त झाल्यानें कांति, बुद्धि, कीर्ति आणि लक्ष्मी ह्या सर्व त्याला सोडून जातात. योग्यच आहे. कारण, आपला पति परस्त्रीच्या ठिकाणीं रत झालेला पाहून स्त्रिया त्याचा झटकन त्याग करीत असतात.

गायति भ्रमति वक्ति गद्गदं ।
रौति धावति विगाहते क्रमम् ॥
हन्ति हृष्यति न बुध्यते हितं ।
मद्यमोहितमतिर्निषीदति ॥ ८ ॥

अर्थ— मद्यानें ज्याची बुद्धि मोहित झालेली आहे असा मनुष्य गाऊं लागतो, फिरूं लागतो, अडखळत बडबडतो, ओरडतो, धांवूं लागतो, पायांत पाय अडकून हेलपाटतो, लोकांना मारूं लागतो, हर्षित होतो, हित जाणत नाहींसा होतो आणि फारच खिन्न होतो.

तोतुदीति भविनः सुरारतो ।
वावदीति वचनं विनिन्दितम् ॥
मोमुषीति परवित्तमस्तधी-- ।
बोभजीति परकीयकामिनीः ॥ ९ ॥

अर्थ— मद्यावर असक्त झालेला मनुष्य दुसऱ्याला वरचेवर त्रास देतो, निंद्य भाषण वारंवार बोलतो, दुसऱ्य...

द्रव्य वरचेवर चोरतो; आणि ज्ञानशून्य झाला असल्यानें परस्त्रीचें वारंवार सेवन करतो.

नानटीति कृतचित्रचेष्टितो ।
मम्मनीति पुरतोऽजनं जनम् ॥
लोलुठीति भुवि रासभोपमो ।
रारटीति सुरापविमोहितः ॥ १० ॥

अर्थ— मद्यपान करणारा मनुष्य बेशुद्ध होऊन अनेक प्रकारच्या चेष्टा करून वारंवार नाचूं लागतो, पुढें कोणी मनुष्य असल्यास त्याला मनुष्य न मानतां भलतेंच कांहीं तरी मानतो, गाढवासारखा जमिनीवर लोळतो आणि ओरडूं लागतो.

सीधुलालसधियो वितन्वते ।
धर्मसंयमविचारणां यके ॥
मेरु मस्तकनिविष्टमूर्तय- ।
स्ते स्पृशन्ति चरणैर्भुवस्तलम् ॥ ११ ॥

अर्थ— मद्यपानाकरितां ज्याचें मन लुब्ध झालें आहे असे जे लोक धर्म आणि संयम ह्यांचा विचार करीत असतील, ते मेरुपर्वतावर बसून तेथून पायांनीं भूतलावर स्पर्श करतात, असें ह्मटलें पाहिजे. अर्थात् ते न होणारी गोष्ट करण्यास प्रवृत्त झाल्याप्रमाणें मूर्ख होत.

दोषमेवमवगम्य वारुणीं ।
सर्वथा तु दवयन्ति पण्डिताः ॥
कालकूटमवबुध्य दुःखदं ।
भक्षयन्ति किमु जीवितार्थिनः ॥१२ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें मद्यांतील दोष जाणून पंडितलोक मद्याला सर्वप्रकारें दूर वर्ज्य करतात. योग्यच आहे. कारण, दुःखद

असें कालकूट नांवाचें विष असलेलें जाणून जगण्याची इच्छा करणारे कोण बरें भक्षण करतील?

मांसभक्षणविषक्तमानसो ।
यः करोति करुणां नराधमः ॥
भूतले कुलिशवह्नितापिते ।
नूनमेष वितनोति वल्लरीम् ॥ १३ ॥

अर्थ— मांसभक्षणाविषयीं ज्याचें मन आसक्त झालें आहे असा जो नीच मनुष्य जीवावर दया करीत असेल, तो विद्युत्पातानें तापलेल्या भूमीवर नाजूक वेली लावितो असें समजावें.

जायते न पिशितं जगत्रये ।
प्राणिघातनमृते यतस्ततः ॥
मंक्षु मूलमुदखानि खादता ।
हा ! दया झटिति धर्मशाखिनः ॥ १४ ॥

अर्थ— मांस हें ह्या त्रैलोक्यांत कोठेंही प्राणिवध केल्यावांचून ज्या अर्थी मिळत नाहीं; त्या अर्थी मांसभक्षण करणाऱ्या मनुष्यानें धर्मरूपी वृक्षाचें मूळ जी दया, ती तत्काल एकदम समूळ खाणून टाकिली असें ह्मटलें पाहिजे. अरेरे!

देहिनो भवति पुण्यसञ्चयः ।
शुद्धया न कृपया विना ध्रुवम् ॥
दृश्यते न लतयाऽऽमया विना ।
सार्द्रया जगति पुष्पसञ्चयः ॥ १५ ॥

अर्थ— प्राण्याला जो पुण्याचा संचय होतो तो निर्दोष अशी दया त्याच्यामध्यें असल्यावांचून खचित होत नाहीं. योग्यच आहे. कारण अपक्व आणि हिरव्यागार असलेल्या वेलीवांचून पुष्पसंचय आह्मीं तरी ह्या जगांत पाहिला नाहीं.

**भक्षयन्ति पिशितं दुराशया ।**
**ये स्वकीयबलपुष्टिकारिणः ॥**
**पातयन्ति भवभागिनस्तके ।**
**स्वं च तेन न विनाऽस्ति पातकः ॥ १६ ॥**

अर्थ— आपल्या शारीरबलाची वृद्धि करणारे जे दुष्ट लोक मांसभक्षण करितात, ते संसारी होऊन आपल्या स्वतःला नरकांत पाडतात. त्या मांसभक्षकावांचून दुसरा पातकी नाहीं.

**हन्ति स्वादति पणायते पलं ।**
**मन्यते दिशति संस्करोति यः ॥**
**यान्ति ते षडपि दुर्गतिं स्फुटं**
**न स्थितिः खलु परत्र पापिनाम् ॥ १७ ॥**

अर्थ— जो मांसाकरितां जीववध करतो, जो मांस खातो, जो मांस विकत घेतो, जो मांस भक्षण करावें असें मानतो, जो मांस खावयास दुसऱ्यास सांगतो, आणि जो मांस शिजवितो, हे सहा प्रकारचेही मनुष्य दुर्गतीला जातात, हें स्पष्ट आहे. कारण, पापी जीवाला परलोकांत चांगली गति मिळत नाहीं.

**अत्ति यः कृमिकुलाकुलं पलं ।**
**पूयशोणितवसादिमिश्रितम् ॥**
**तस्य किञ्चन न सारमेयतः ।**
**शुद्धबुद्धिरभिवेक्ष्यतेऽन्तरम् ॥ १८ ॥**

अर्थ— जो मनुष्य किड्यांच्या समुदायानें व्यापलेलें व पू, रक्त, चर्बी वगैरेंनीं मिश्र असलेलें मांस भक्षण करतो त्याच्यामध्यें आणि कुत्र्यामध्यें शुद्धबुद्धीचे लोक कांहीं अंतर आहे असें मानीत नाहींत.

आमिषाशनपरस्य सर्वथा ।
विद्यते न करुणा शरीरिणः ॥
पापमर्जति तया विना परं ।
बम्भ्रमीति भवसागरे ततः ॥ १९ ॥

अर्थ— मांस भक्षण करणाऱ्या मनुष्याला करुणा मुळींच असत नाहीं. ती नसल्यामुळें तो पापकर्माचें संपादन करतो. आणि त्यामुळें तो ह्या संसारसमुद्रांत भ्रमण करूं लागतो.

नास्ति दूषणमिहामिषाशने ।
यैर्हृषीकवशगैर्निगद्यते ॥
व्याघ्रसूकरकिरातधीवरा- ।
स्तैर्निकृष्टहृदयैर्गुरूकृताः ॥ २० ॥

अर्थ— ह्या जगांत मांस भक्षण केलें असतां कांहीं दोष नाहीं असें जे इंद्रियनिग्रही लोक ह्मणत असतील, त्या नीच मनांच्या लोकांनीं वाघ, डुकर, भिल्ल आणि कोळी हे लोक आपले गुरु केले आहेत असें समजावें.

मांसवल्भननिविष्टचेतसः ।
सन्ति पूजिततमा नरा यदि ॥
गूथयूथकृतदेहपुष्टयः ।
सूकरा न नितरां तथा कथम् ॥ २१ ॥

अर्थ— मांसभक्षणांत ज्यांचें अंतःकरण गढून गेलेलें आहे असे लोक जर पूज्य होतात तर, मनुष्यांचा मल खाऊन ज्यांनीं आपलें शरीर पुष्ट केलें आहे असे गांवडुकर अत्यंत पूज्य कां बरें होणार नाहींत?

भक्षयन्ति पलमस्तचेतनाः ।
सप्तधातुमयदेहसम्भवम् ॥

**यद्वदन्ति च सुचित्तमात्मनः ।**
**किं विडम्बनमतःपरं बुधाः ॥ २२ ॥**

अर्थ— अज्ञानी लोक सप्तधातुमय ( रस ह्मणजे अंगावरील कातडें खरवडलें असतां रक्त न येतां जें नुसतेंच पाणी येतें तें, रक्त, मांस, चर्बी, हाडें, मज्जा आणि शुक्र ह्यांना सात धातु ह्मणतात ) अशा शरीरापासून उत्पन्न झालेलें मांस भक्षण करतात; आणि आपलें मन फार शुद्ध आहे असें जें ह्मणतात, हे पंडित हो त्यापेक्षां दुसरी थट्टा ती कोणती ?

**भुञ्जते पलमघौघकारि ये ।**
**ते व्रजन्ति भवदुःखमूर्जितम् ॥**
**ये पिबन्ति गरलं सुदुर्जरं ।**
**ते श्रयन्ति मरणं किमद्भुतम् ॥ २३ ॥**

अर्थ— पातकांचा ओघ उत्पन्न करणारें असें मांस जे लोक खातात ते तीव्र अशा संसारदुःखाला प्राप्त होतात. ह्यांत आश्चर्य काय आहे! कारण, जे आपल्याला न पचेल असें विष प्राशन करतात ते मरण पावतात.

**चित्रदुःखसुखदानपण्डिते ।**
**ये वदन्ति पिशिताशने समे ॥**
**मृत्युजीवितविवर्द्धनोद्यते ।**
**ते वदन्ति सदृशे विषामृते ॥ २४ ॥**

अर्थ— अनेक प्रकारचीं दुःखें देणारें मांस आणि अनेकप्रकारचीं सुखें देणारें अन्न हीं दोन्हीं सारखींच ( भक्ष्यच ) आहेत असें जे लोक ह्मणतात; ते लोक मृत्यु आणि जीवित ह्यांची वृद्धि करण्याला तयार असलेल्या विष आणि अमृत ह्या दोन वस्तु सारख्याच असें ह्मणतात, असें समजावें.

**जायते द्वितयलोकदुःखदं ।**
**भक्षितं पिशितमङ्गसङ्गिनाम् ॥**
**भक्षितं द्वितयजन्मशर्मदं ।**
**जायतेऽशनमपास्तदूषणम् ॥ २५ ॥**

अर्थ— प्राण्यांचें मांस भक्षण केलें असतां तें हा लोक आणि परलोक ह्या दोन्ही ठिकाणीं दुःख देणारें होतें. आणि निर्दोष असें अन्न भक्षण केलें असतां तें दोन्ही लोकांत सुख देणारें होतें.

**मांसमित्थमवबुध्य दूषितं ।**
**त्यज्यते हितगवेषणात्रिधा ॥**
**मन्दिरं न विदता निषेव्यते ।**
**तीव्रदृष्टिविषपन्नगाकुलम् ॥ २६ ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें मांस हें दूषित आहे असें जाणून जो ज्ञानी मनुष्य आपल्या कल्याणाचा शोध करून मन, वचन आणि काय ह्या तीहींच्या योगानें त्याचा त्याग करतो, तो ज्यांच्या दृष्टीमध्यें तीव्र विष आहे अशा सर्पांनीं व्याप्त झालेलें गृह ( नरक ) सेवन करीत नाहीं.

**माक्षिकं विविधजन्तुघातजं ।**
**स्वादयन्ति बहुदुःखकारि ये ॥**
**स्वल्पजन्तुविनिपातिभिः समा- ।**
**स्ते भवन्ति कथमत्र खड्गिकैः ॥ २७ ॥**

अर्थ-- अनेक जीवांच्यां नाशापासून उत्पन्न झालेला ह्मणून पुष्कळ दुःख देणारा असा मध जे चाखतात ते लोक, ज्यांनीं साऱ्या जन्मांत फारच थोड्या जीवांचा नाश केला आहे अशा शस्त्रधारी लोकांशीं बरोबरीचे कसे होतील? अर्थात् त्यां

च्यापेक्षां मध खाणारे अधिक पातकी होत.

ग्रामसप्तकविदाहरेफसा ।
तुल्यता न मधुभक्षिरेफसः ॥
तुल्यमञ्जलिजलेन कुत्रचि- ।
न्निम्नगापयति जलं न जायते ॥ २८ ॥

अर्थ-- सात गांवें जाळल्यानें उत्पन्न होणाऱ्या पातकाशीं सुद्धां मध खाणाऱ्या मनुष्याच्या पातकाची तुलना व्हावयाची नाहीं. बरोबरच आहे. कारण, नदीचें पाणी ओंजळींतल्या पाण्याशीं कोठेंही तुल्य व्हावयाचें नाहीं.

म्लेच्छलोकमुखलालयाऽविलं ।
मद्यमांसशितभाजनस्थितम् ॥
सारघं गतघृणस्य खादतः ।
कीदृशं भवति शौचमुच्यताम् ॥ २९ ॥

अर्थ— म्लेंच्छ लोकांच्या तोंडांतील लाळ ज्यांत मिसळली आहे असा आणि मद्यमांसाच्या भांड्यांत ठेविलेला व मधमाशापासून उत्पन्न झालेला मध खाणाऱ्या निर्दय मनुष्याची शुद्धता कसली बरें होणार सांगा?

यश्चिखादिषति सारघं कुधी- ।
र्मक्षिकागणविनाशनस्पृहः ॥
पापकर्दमनिषेधनिम्नगा ।
तस्य हन्त करुणा कुतस्तनी ॥ ३० ॥

अर्थ— जो दुर्बुद्धि मनुष्य मध खाण्याची इच्छा करितो, तो माशांच्या समूहाचा नाश करण्यास इच्छितो असें समजावें. त्या मनुष्याला पापरूपी चिखलाचा नाश करणारी नदीच कीं काय! अशी करुणा कोठून बरें असणार? अरेरे!

**भक्षितो मधुकणोऽपि सञ्चितं ।**
**सूदते झटिति पुण्यसञ्चयम् ॥**
**काननं विषमशोचिषः कणः ।**
**किं न भस्मयति वृक्षसङ्कटम् ॥ ३१ ॥**

अर्थ-- मधाचा एक कणजरी भक्षण केला तथापि तो त्या वेळेपर्यंत सांठविलेल्या पुण्याच्या समुदायाचा तत्काल नाश करतो, ह्यांत आश्चर्य काय! कारण, अग्नीचा एक कण सुद्धां वृक्षांनीं भरलेल्या अरण्याची राख करीत नाहीं काय!

**योऽस्ति नाम मधु भेषजेच्छया ।**
**सोऽपि याति लघु दुःखमुल्बणम् ॥**
**किं न नाशयति जीवितेच्छया ।**
**भक्षितं झटिति जीवितं विषम् ॥ ३२ ॥**

अर्थ- जो कोणी औषधाच्या इच्छेनें मध खातो, तो देखील लवकर भयंकर दुःखाला प्राप्त होतो. कारण, जगण्याच्या इच्छेनें जर विष भक्षण केलें तर तें तत्काल जीविताचा नाश करीत नाहीं काय?

**घोरदुःखदमवेत्य कोविदा ।**
**वर्जयन्ति मधु शर्मकांक्षिणः ।**
**कुत्र तापकमवेत्य पावकं ।**
**गृण्हते शिशिरलोलमानसाः ॥ ३३ ॥**

अर्थ— सुखाची इच्छा करणारे विद्वान् लोक मध हा भयंकर दुःख देणारा आहे असें समजून त्याचा त्याग करतात. बरोबरच आहे. कारण, अग्नि ताप देणारा आहे असें समजल्यावर थंडीची इच्छा करणारे लोक कोठें तरी त्याला ( अग्नीला ) जवळ घेतात काय?

**संसजन्ति विविधाः शरीरिणो ।**
**यत्र सूक्ष्मतनवो निरन्तराः ॥**
**तद्ददाति नवनीतमङ्गिनं ।**
**पापतो न परमत्र सेवितम् ॥ ३४ ॥**

अर्थ— ज्याच्यावर सूक्ष्मशरीराचे अनंत जीव दाटून चिकटलेले असतात असें जें लोणीं तें भक्षण केलें असतां मनुष्याला ह्या जगांत पातकावांचून दुसरें कांहीं फळ नाहीं.

**चित्रजीवगणसूदनास्पदं ।**
**यैर्विलोक्य नवनीतमद्यते ॥**
**तेषु संयमलवोऽपि विद्यते ।**
**धर्मसाधनपरायणः कुतः ॥ ३५ ॥**

अर्थ— लोणीं हें अनेक प्रकारच्या जीवांच्या नाशाचें स्थान आहे असें समजूनहि जे लोक तें खातात; त्यांच्याठिकाणीं धर्मसाधनाचा मुख्य उपाय अशा संयमाचा लेश तरी कसा असणार?

**यन्मुहूर्तयुगतः परं सदा ।**
**मूर्च्छति प्रचुरजीवराशिभिः ॥**
**तद्गिलन्ति नवनीतमत्र ये ।**
**ते व्रजन्ति खलु कां गतिं मृताः ॥ ३६ ॥**

अर्थ— जे दोन घटकेच्या पुढें नेहमीं पुष्कळ जीवसमुदायांनीं व्याप्त होत; असतें तें लोणीं ह्या जगांत जे लोक गिळतात (खातात) ते मरणानंतर कोणत्या गतीला जातात बरें?

**ये जिनेन्द्रवचनानुसारिणो ।**
**घोरजन्मवनपातभीरवः ॥**
**तैश्चतुष्टयमिदं विनिन्दितं ।**
**जीवितावधि विमुच्यते त्रिधा ॥ ३७ ॥**

अर्थ— श्रीजिनेंद्राच्या उपदेशाला अनुसरून वागणारे व भयंकर अशा संसाररूपी अरण्यांत आपलें पतन होईल ह्मणून भिणारे असे जे सज्जन असतात, ते आपल्या मरणापर्यंत मद्य, मांस, मध आणि लोणी ह्या चार निंद्य पदार्थांचा मन, वाणी आणि काय ह्या तिहींच्या योगानें त्याग करतात.

मद्यमांसनवनीतसारघं ।
यैश्चतुष्कमिदमद्यते सदा ॥
गृद्धिरागवधसङ्गबृंहणं ।
तैश्चतुर्गतिभवो विगाह्यते ॥ ३८ ॥

अर्थ— काम, राग, हिंसा आणि परिग्रह ह्या चारीला वाढविणाऱ्या अशा मद्य, मांस, लोणी आणि मध ह्या चार वस्तु (ह्यांतील प्रत्येक वस्तु कामादिक चारींची वृद्धि करणारी आहे. असें समजावें) जे कोणी सर्वदा सेवन करीत असतील ते चार गतींनीं युक्त असलेल्या ह्या संसारांत चिरकाल शिरतात.

यः सुरादिषु निषेवनेऽधमो ।
नित्यमेकमपि लोलमानसः ॥
सोऽपि जन्मजलधावटाट्यते ।
कथ्यते किमिह सर्वभक्षिणः ॥ ३९ ॥

अर्थ— जो नीच व लोभी अंतःकरणाचा मनुष्य मद्य वगैरे चार वस्तूंपैकीं एकच वस्तु नेहमीं सेवन करतो तो देखील ह्या संसारसमुद्रांत भ्रमण करतो. मग चारी वस्तु भक्षण करणाऱ्याचें ह्या ठिकाणीं काय सांगावयाचें आहे?

यत्र राक्षसपिशाचसञ्चरो ।
यत्र जन्तुनिवहो न दृश्यते ॥
यत्र मुक्तमपि वस्तु भक्ष्यते ।

यत्र घोरतिमिरं विजृम्भते ॥ ४० ॥
यत्र नास्ति यतिवर्गसङ्गमो ।
यत्र नास्ति गुरुदेवपूजनम् ॥
यत्र संयमविनाशिभोजनं ।
यत्र संसजति जीवभक्षणम् ॥ ४१ ॥
यत्र सर्वशुभकर्मवर्जनं ।
यत्र नास्ति गमनागमक्रिया ॥
तत्र दोषनिलये दिनात्यये ।
धर्मकर्मकुशला न भुञ्जते ॥ ४२ ॥

अर्थ— ज्या ठिकाणीं राक्षस, पिशाच ह्यांचा संचार आहे, ज्या ठिकाणीं कोणत्याही प्राण्यांचा समुदाय दिसत नाहीं, ज्या ठिकाणीं टाकून दिलेले पदार्थही पुनः भक्षण केले जातात, ज्या ठिकाणीं भयंकर काळोख वाढत आहे, ज्या ठिकाणीं यतींचा समागम नाहीं, ज्या ठिकाणीं गुरु व देवता ह्यांचें पूजन नाहीं, ज्या ठिकाणीं संयमाचा नाश करणारें भोजन आहे, ज्या ठिकाणीं जीवभक्षणाचा प्रसंग येणें शक्य आहे, ज्या ठिकाणीं कोणत्याही प्रकारचें शुभकर्म होत नाहीं, आणि ज्या ठिकाणीं कोणीही जात येत नाहीं अशा ठिकाणीं धर्मामध्यें प्रवीण असलेले लोक ( धार्मिक लोक ) भोजन करीत नाहींत. आणि सूर्यास्त झाल्यानंतर भोजन करीत नाहींत.

भुञ्जते निशि दुराशया यके ।
गृद्धिदोषवशवर्तिनो जनाः ॥
भूतराक्षसपिशाचशाकिनी- ।
सङ्गतिः कथममीभिरस्यते ॥ ४३ ॥

अर्थ— गृद्धिरूपी दोषाच्या ( वाटेल तेव्हां भोजन करण्याची

इच्छा ह्या दोषाच्या ) ताब्यांत सांपडून जे दुष्ट लोक रात्रीं भोजन करतात, ते भुतें, राक्षस, पिशाच, शाकिनी ह्यांच्या संगतीचा कसा बरें त्याग करतील? मुळींच करणार नाहींत.

बल्भते दिननिशीथयोः सदा ।
यो निरस्तयमसंयमक्रियः ॥
शृङ्गपुच्छशफसङ्गवर्जितो ।
भण्यते पशुरयं मनीषिभिः ॥ ४४ ॥

अर्थ— जो मनुष्य यमसंयमांच्या क्रिया टाकून देऊन दिवसा आणि रात्रीं सर्वदा भोजन करतो त्याला शहाणे लोक शिंगें, शेपूट आणि खूर नसलेला हा एक पशु आहे असें ह्मणतात.

आमनन्ति दिवसेषु भोजनं ।
यामिनीषु शयनं मनीषिणः ॥
ज्ञानिनामवसरेषु जल्पनं ।
शान्तये गुरुषु पूजनं कृतम् ॥ ४५ ॥

अर्थ— ज्ञानी लोकांचें भोजन दिवसा असतें, रात्रीं शयन असतें, योग्यप्रसंगीं भाषण असतें, आणि शांतीकरितां केलेलें असें गुरुपूजन असतें, असें विद्वान् लोक समजतात.

भुज्यते गुणवतैकदा सदा ।
मध्यमेन दिवसे द्विरुज्वले ॥
येन रात्रिदिनयोरनारतं ।
भुज्यते स कथितोऽधमो नरः ॥ ४६ ॥

अर्थ— सद्गुणी मनुष्य एका दिवसांत एकदा भोजन करतो. मध्यम प्रतीचा ह्मणजे उत्तम सद्गुणी नव्हे असा मनुष्य सूर्यप्रकाशानें स्वच्छ असलेल्या दिवसांतच दोन वेळां भोजन करतो. आणि जो दिवस आणि रात्र ह्या दोनी कालांत सर्वदा भोजन करतो, तो मनुष्य अधम होय असें सांगितलें आहे.

ये विवर्ज्य वदनावसानयो- ।
वासरस्य घटिकाद्वयं सदा ॥
भुञ्जते जितहृषीकवादिन- ।
स्ते भवन्ति भवभारवर्जिनः ॥ ४७ ॥

अर्थ— जे इंद्रियनिग्रही ह्मणविणारे लोक सकाळच्या आरंभीच्या दोन घटका व संध्याकाळच्या शेवटच्या दोन घटका टाकून नेहमीं भोजन करतात, ते ह्या जन्ममरणरूपी संसाराच्या ओझ्यानें रहित असे होतात. ह्मणजे त्यांना संसाराची पीडा होत नाहीं.

ये विधाय गुरुदेवपूजनं ।
भुञ्जतेऽह्नि विमले निराकुलाः ॥
ते विधूय लघु मोहतामसं ।
सम्भवन्ति सहसा महोदयाः ॥ ४८ ॥

अर्थ— जे श्रावक गुरु आणि देवता ह्यांचें पूजन करून स्वस्थमनानें निर्दोष अशा दिवसाच्या कालांत भोजन करतात, ते थोड्याच कालांत मोहरूपी अंधकार घालवून देऊन एकदम मोठे उत्कर्षशाली होऊन उत्पन्न होतात.

यो विमुच्य निशि भोजनं त्रिधा ।
सर्वदाऽपि विदधाति वासरे ॥
तस्य याति जननार्धमञ्चितं ।
भुक्तिवर्जितमपास्तरेफसः ॥ ४९ ॥

अर्थ— जो श्रावक मन, वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें रात्रिभोजनाचा त्याग करून केव्हांही दिवसां भोजन करतो; त्यानें रात्रिभोजनामुळें उत्पन्न होणारें पातक दूर फेकून दिल्यामुळें त्याचें स्तुत्य असें अर्धें आयुष्य उपवासांत

जातें. ह्मणजे त्यानें आपलें अर्धें आयुष्य उपवास केल्यासारखें होतें.

**यो निवृत्तिमविधाय वल्भनं ।**
**वासरेषु विदधाति मूढधीः ॥**
**तस्य किञ्चन न विद्यते फलं ।**
**भावि तेन भविना कुलान्तरम् ॥ ५० ॥**

अर्थ— जो मूर्ख मनुष्य रात्रिभोजनाचा त्याग केल्यावांचून दिवसा भोजन करूं लागतो, त्याला कांहींही फल मिळत नाहीं. त्या जीवाला भावी कुलांतर ( पुढच्या जन्मांत दुसऱ्या कुलांत अर्थात् ज्या कुलांत रात्रिभोजनाचा त्याग करण्याचा विधि आहे त्या कुलांत जन्म ) प्राप्त होतें.

**ये व्यवस्थितमहस्सु सर्वदा ।**
**शर्वरीषु रचयन्ति भोजनम् ॥**
**निम्नगामि सलिलं निसर्गत- ।**
**स्ते नयन्ति शिखरेषु शाखिनाम् ॥ ५१ ॥**

अर्थ— दिवसा करावयाचें असलेलें भोजन जे लोक नेहमीं रात्रीं करतात, ते लोक स्वभावतः सखल प्रदेशांत जाणारें पाणी झाडांच्या शेंड्यांवर चढवितात असें ह्मणावें लागतें!

**सूचयन्ति सुखदायि येऽङ्गिनां ।**
**रात्रिभोजनमपास्तचेतनाः ॥**
**पावकोद्धतशिखाकरालितं ।**
**ते वदन्ति फलदायि काननम् ॥ ५२ ॥**

अर्थ— विचारशून्य झालेले असे जे लोक रात्रिभोजन हें जीवांना सुख देणारें आहे असें सुचवितात, ते लोक अग्नीच्या भडकलेल्या ज्वालांनीं भयंकर दिसणारें अरण्य फळें देणारें आहे असें ह्मणतात.

ये ब्रुवन्ति दिनरात्रिभोगयो- ।
स्तुल्यतां रचितपुण्यपापयोः ॥
ते प्रकाशतमसोः समानतां ।
दर्शयन्ति सुखदुःखकारिणोः ॥ ५३ ॥

अर्थ— जे लोक पुण्य उत्पन्न करणारें दिवाभोजन आणि पाप उत्पन्न करणारें रात्रिभोजन ह्या दोहोंचा सारखेपणाच आहे असें सांगतात, ते लोक सुख देणारा प्रकाश आणि दुःख देणारा अंधार हे दोन्ही सारखेच आहेत असें लोकांना दाखवितात.

रात्रिभोजनमपि श्रयन्ति ये ।
धर्मबुद्धिमधिकृत्य दुर्धियः ॥
ते क्षिपन्ति पविवन्हिमण्डलं ।
वृक्षपद्धतिविवृद्धये स्फुटम् ॥ ५४ ॥

अर्थ— जे दुर्बुद्धीचे लोक धर्मबुद्धि मनांत आणून रात्रिभोजनाचाही स्वीकार करतात ते झाडांची पंक्ति वाढण्याकरितां तिच्यावर वीज किंवा अग्नि टाकतात हें स्पष्ट आहे.

ये विधृत्य सकलं दिनं क्षुधां ।
भुञ्जते सुकृतकांक्षया निशि ॥
ते विवृध्य फलशालिनीं लतां ।
भस्मयन्ति फलकांक्षया पुनः ॥ ५५ ॥

अर्थ— जे लोक सारा दिवस भूक दाबून धरून पुण्याच्या इच्छेनें रात्रीं भोजन करतात ते फलांनीं शोभणारी अशी वेली वाढवून तिला पुनः चांगलीं फलें यावींत ह्या इच्छेनें जाळून टाकतात, असें वाटतें.

ये सदाऽपि घटिकाद्वयं त्रिधा ।
कुर्वते दिनमुखान्तयोर्बुधाः ॥

**भोजनस्य नियमं विधीयते ।**

**मानितैः स्फुटमुपोषितद्वयम् ॥ ५६ ॥**

अर्थ--- दिवसाच्या प्रारंभीच्या दोन घटिका आणि सूर्यास्ताच्या अगोदरच्या दोन घटका ह्या कालांत जे विद्वान् लोक भोजनाचा नियम करतात अर्थात् ह्या कालांत जे शहाणे लोक भोजन करीत नाहींत, त्यांनीं महिन्यांतून दोन दिवस उपवास केल्याप्रमाणें होतें.

**रोगशोककलिराटिकारिणी ।**

**राक्षसीव भयसूयिनी प्रिया ॥**

**कन्यका दुरितपाकसम्भवा ।**

**रोगिता इव निरन्तरापदः ॥ ५७ ॥**

अर्थ— रात्रिभोजन करणाऱ्याची स्त्री ही रोग, शोक, कलह आणि राटि (?) ह्याला करणारी व पतीला भय उत्पन्न करणारी राक्षसीच कीं काय अशी होते. आणि कन्या ह्या दुष्कर्माच्या परिणामामुळें उत्पन्न होणाऱ्या आणि ज्यांच्या पासून निरंतर दुःख होत आहे अशा व्याधीच कीं काय अशा होतात.

**देहजा व्यसनकर्मयन्त्रिताः ।**

**पन्नगा इव वितीर्णभीतयः ॥**

**निर्धनत्वमनपायि सर्वदा ।**

**पात्रदानमिव दत्तवृद्धिकम् ॥ ५८ ॥**

अर्थ— त्याचे पुत्र व्यसनांत जखडून जाऊन सर्पाप्रमाणें त्याला भय दाखविणारे होतात. आणि ज्याप्रमाणें पात्राला दान केलें असतां दान केलेला पदार्थ वृद्धि पावतो त्याप्रमाणें अविनाशी असें दारिद्र्य त्याच्या घरांत वृद्धि पावत असतें.

सङ्कटं सतिमिरं कुटीरकं ।
नीचचित्तमिव रध्रसंकुलम् ॥
नीचजातिकुलकर्मसङ्गमः ।
शीलशौचशमधर्मनिर्गमः ॥ ५९ ॥

अर्थ— नीच मनुष्याचें चित्त ज्याप्रमाणें दुष्कल्पनांनीं भरलेलें व अज्ञानानें व्याप्त झालेलें असें असतें, त्याप्रमाणें त्याचें घर दुष्ट लोकांनीं गजबजलेलें अंधारानें व्याप्त व अनेक अनर्थांनीं भरलेलें असें असतें. आणि त्याला नीच जातीमध्यें उत्पन्न झाल्यामुळें जो कर्माचा संबंध होतो, तो शील, शुद्धता, शम आणि धर्म ह्यांना घालविणारा असतो.

व्याधयो विविधदुःखदायिनो ।
दुर्जना इव परापकारिणः ॥
सर्वदोषगणपीड्यमानता ।
रात्रिभोजनपरस्य जायते ॥ ६० ॥

अर्थ— अनेक दुःखें देणाऱ्या अशा व्याधि दुसऱ्याला पीडा करणाऱ्या दुर्जनाप्रमाणें त्याला त्रास देत असतात. आणि रात्रिभोजन करणाऱ्याला सर्व प्रकारच्या दोषांची पीडा होते.

पद्मपत्रनयनाः प्रियंवदाः ।
श्रीसमाः प्रियतमा मनोरमाः ॥
सुन्दरा दुहितरः कुलालयाः ।
पुण्यपङ्क्तय इवात्तविग्रहाः ॥ ६१ ॥

अर्थ— रात्रिभोजनाचा त्याग करणाऱ्याच्या मुली-कमलपत्राप्रमाणें ज्यांचे नेत्र आहेत अशा, मधुर बोलणाऱ्या, लक्ष्मीप्रमाणें तेजस्वी दिसणाऱ्या, पित्याला अत्यंत प्रिय, सुंदर असल्यामुळें पतीच्या मनाला रमविणाऱ्या, कुलाच्या वृद्धीचें

स्थानच कीं काय! अशा असल्यामुळें शरीर धारण करणाऱ्या पुण्यपंक्तीच कीं काय! अशा प्रकारच्या असतात.

भ्रंशितव्यसनवृत्तयोऽमलाः ।
पावना हिमकरा इवाङ्गजाः ॥
शक्रमन्दिरमिवास्ततामसं ।
मन्दिरं प्रचुररत्नराजितम् ॥ ६२ ॥

अर्थ— त्याचे पुत्र ज्यांनीं व्यसनाचा त्याग केला आहे ह्मणून जे पवित्र असल्यानें चंद्राप्रमाणें आनंद देणारे आहेत असे असतात. आणि त्याचें घर अनेक रत्नांनीं सुशोभित असून इंद्राच्या मंदिराप्रमाणें अंधकाराचा नाश झाल्यामुळें दैदीप्यमान असतें.

लब्धचिन्तितपदार्थमुज्वलं ।
भूरिपुण्यमिव वैभवं स्थिरम् ॥
सर्वरोगगणमुक्तदेहता ।
सर्वशर्मनिवहाधिवासिता ॥ ६३ ॥

अर्थ— त्याचें ऐश्वर्य महापुण्याप्रमाणें स्थिर असून इच्छित पदार्थांची प्राप्ति करून देणारें व निर्दोष असें असतें. त्याचें शरीर सर्वप्रकारच्या रोगांनीं सोडलेलें असें असून सर्वप्रकारच्या कल्याणाच्या रहाण्याचें घर असतें.

ज्ञानदर्शनचरित्रभूतयः ।
सर्वयाचितविधानपण्डिताः ॥
सर्वलोकपतिपूजनीयता ।
रात्रिभुक्तिविमुखस्य जायते ॥ ६४ ॥

अर्थ— रात्रिभोजनाचा ज्यानें त्याग केला त्याला सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान आणि सम्यक्चारित्र ह्यांचें ऐश्वर्य प्राप्त होतें.

तें त्याचें संपूर्ण इच्छित पूर्ण करण्याविषयीं समर्थ असतें. आणि तो श्रावक त्रिलोकाधिपतींनीं पूज्य असा होतो.

**सूकरी संवरी वानरी धीवरी ।**
**रोहिणी मण्डली शाकिनी क्लेशिनी ॥**
**दुर्भगा निःसुता निर्धना शर्वरी- ।**
**भोजिनी भाजनी जायते भामिनी ॥६५॥**

अर्थ— जी स्त्री रात्रिभोजन करणारी असेल, ती डुकरीण, धोबीण, वानरी, धीवरी, गाय, कुत्री, शाकिनी होते. ती दुःख भोगणारी होते. ती दुर्भाग्याची होऊन निपुत्रिक होऊन निर्धन अशी होते.

**बान्धवैरञ्चिता देहजैर्वन्दिता ।**
**भूषणैर्भूषिता दूषणैर्वर्जिता ॥**
**श्रीमती न्हीमती धीमती धर्मिणी ।**
**वासरे जायते भुक्तितः शर्मिणी ॥ ६६ ॥**

अर्थ— दिवसा भोजन केल्यानें स्त्री तिच्या बंधुगणांनीं पूजिलेली, पुत्रांनीं वंदिलेली, अलंकारांनीं भूषित व दूषणांनीं रहित अशी होऊन श्रीमती, लज्जावती, बुद्धिमती, धार्मिक आणि सुखी अशी होते.

**रात्रिभोजनविमोचिनां गुणा ।**
**ये भवन्ति भवभागिनां परे ॥**
**तानपास्य जिननाथमीशते ।**
**वक्तुमत्र न परे जगत्रये ॥ ६७ ॥**

अर्थ— रात्रिभोजन त्याग करणाऱ्या संसारी जीवांचे जे उत्कृष्ट गुण आहेत ते सांगण्यास ह्या लोकांत जिनेंद्रावांचून दुसरे कोणीही समर्थ होत नाहींत.

**यत्र सूक्ष्मतनवस्तनूभृतः ।**
**सम्भवन्ति विविधाः सहस्रशः ॥**
**पञ्चधा फलमुदुम्बरोद्भवं ।**
**तन्न भक्षयति शुद्धमानसः ॥ ६८ ॥**

अर्थ— ज्यांत अनेक प्रकारचे सूक्ष्म शरीराचे हजारो जीव उत्पन्न होतात तें पांच प्रकारचें उदुंबरफल शुद्धमनाचे लोक भक्षण करीत नाहींत.

**क्षीरभूरुहफलानि भुञ्जते ।**
**चित्रजीवनिहितानि येऽधमाः ॥**
**जन्मसागरनिपातकारणं ।**
**पातकं किमिह ते न कुर्वते ॥ ६९ ॥**

अर्थ— ज्यांत अनेकप्रकारचे जीव रहात आहेत अशीं चीक येणाऱ्या झाडांचीं फलें जे नीच लोक भक्षण करतात; ते ह्या संसारसमुद्रांत पडण्याला साधनीभूत असलेलें असें कोणतें बरें पाप करीत नाहींत?

**ससंख्यजीवस्य विघातवृत्तिभि- ।**
**र्न धीवरैरस्ति समं समानता ॥**
**अनन्तजीवव्यपरोपकारिणा- ।**
**मुदुम्बराहारविलोलचेतसाम् ॥ ७० ॥**

अर्थ— मोजतां येतील अशा कित्येक जीवांना वध करून जीवन करणाऱ्या धीवरांशीं उदुंबरफल भक्षण करण्याविषयीं ज्यांचें मन उत्सुक झालें आहे अशा लोकांचा सारखेपणा व्हावयाचा नाहीं. कारण, उंबराचें फल खाणारे अनंत (ज्यांची संख्या समजत नाहीं) जीवांचा वध करतात.

**ये खादन्ति प्राणिवर्गं विचित्रं ।**

**दृष्ट्वा पञ्चोदुम्बराणां फलानि ॥**
**श्वभ्रावासं यान्ति ते घोरदुःखं ।**
**किं निस्त्रिंशैः प्राप्यते नैव दुःखम् ॥ ७१ ॥**

अर्थ— पंचोदुंबरफलें अवलोकन करून जे त्यांतील अनेक जातीच्या जीवसमूहाला खाऊन टाकतात, ते ज्यांत भयंकर दुःख आहे अशा नरकांत जातात. योग्यच आहे. कारण, तरवारीप्रमाणें कठोर असे जे असतात, त्यांना कोणतें बरें दुःख प्राप्त होत नाहीं?

**अघप्रधार्याणि विचिन्त्य धर्मधी- ।**
**रुदुम्बराणां न फलानि वल्भते ॥**
**विधातुमिष्टे सुखदे प्रयोजने ।**
**करोति कस्तद्विपरीतमुत्तमः ॥ ७२ ॥**

अर्थ— उदुंबरफलें हीं पाप उत्पन्न करणारीं आहेत असा विचार करून धर्माविषयीं बुद्धि धारण करणारा मनुष्य तीं खात नाहीं. कारण, करण्याला इष्ट असलेल्या अशा सुख देणाऱ्या कार्यांत कोणताही उत्तम मनुष्य विपरीत व्यापार करील काय?

**आदावेते स्फुटमिह गुणा निर्मला धारणीयाः ।**
**पापध्वंसि व्रतमपमलं कुर्वता श्रावकीयम् ॥**
**कर्तुं शक्यं स्थिरमुरुभरं मन्दिरं गर्तपूरं ।**
**न स्थेयोभिर्दृढतममृते निर्मितं ग्रावजालैः ॥७३॥**

अर्थ— पापाचा नाश करणारें श्रावकव्रत करणाऱ्या मनुष्यानें मद्यत्यागादि जे निर्मल गुण वर स्पष्ट सांगितले आहेत ते प्रथम धारण केले पाहिजेत. बरोबरच आहे. कारण, मोठमोठ्या

धोंड्यांनीं पाया घट्ट भरल्यावांचून वर मोठें घर बांधणें मुळींच शक्य नाहीं.

दातुं दक्षः सुरतरुरिव प्रार्थनीयं जनानां ।
चित्ते येषामिति गुणगणो निश्चलत्वं बिभर्ति ॥
भुक्त्वा सौख्यं भुवनमहितं चिन्तितावाप्तभोगं ।
ते निर्बाधाममितगतयः श्रेयसीं यान्ति लक्ष्मीम् ॥७४॥

अर्थ— कल्पवृक्षाप्रमाणें सर्वलोकांचें इच्छित देण्याला समर्थ असा हा वर सांगितलेला गुणांचा समुदाय ज्यांच्या मनांत स्थिर रहातो, ते जीव अनंतज्ञानी होऊन मनांत आणल्याबरोबर ज्याचा भोग होत आहे असें आणि त्रिभुवनांत वंद्य असलेलें असें स्वर्गसुख भोगून, शेवटीं नाश न पावणाऱ्या व कल्याण करणाऱ्या अशा लक्ष्मीला (मोक्षलक्ष्मीला) प्राप्त होतात.

इत्यमितगतिकृतश्रावकाचारे पञ्चमः परिच्छेदः

## षष्ठः परिच्छेदः

मद्यादिभ्यो विरतैर्व्रतानि कार्याणि भक्तितो भव्यैः ॥
द्वादश तरसा च्छेत्तुं शस्त्राणि शितानि भववृक्षम् १

अर्थ— मद्यादिकांचा ज्यांनीं त्याग केला आहे अशा भव्य श्रावकांनीं ह्या संसाररूपी वृक्षाचा वेगानें च्छेद करण्याचीं शस्त्रेंच कीं काय अशीं बारा व्रतें केलीं पाहिजेत.

अणुगुणशिक्षाद्यानि व्रतानि गृहमेधिनां निगद्यन्ते ॥
पञ्चत्रिचतुःसंख्यासहितानि द्वादश प्राज्ञैः ॥ २ ॥

अर्थ— ५ अणुव्रतें, ३ गुणव्रतें आणि ४ शिक्षाव्रतें अशीं गृहस्थांनीं करावयाचीं बारा व्रतें विद्वानांनीं सांगितलीं आहेत.

हिंसाऽसत्यस्तेयाब्रह्मपरिग्रहनिवृत्तिरूपाणि ॥
ज्ञेयान्यणुव्रतानि स्थूलानि भवन्ति पंचात्र ॥ ३ ॥

अर्थ— हिंसा, असत्य ( खोटें बोलणें ) स्तेय ( चोरी करणें ) अब्रह्म ( स्त्रीसमागम करणें ) आणि परिग्रह ह्यांच्यापासून निवृत्त होणें ह्मणजे ह्यांचा त्याग करणें ह्या स्वरूपाचीं हीं पांच स्थूल अणुव्रतें आहेत.

द्वेधा जीवा जैनैर्मतास्त्रसस्थावरादिभेदेन ॥
तत्र त्रसरक्षायां तदुच्यतेऽणुव्रतं प्रथमम् ॥ ४ ॥

अर्थ— श्रीजिनांनीं त्रसजीव आणि स्थावरजीव असे जीवांचे दोन प्रकार मानिले आहेत. त्यांत त्रसजीवांची हिंसा न करणें हें पहिलें ह्मणजे स्थूल अहिंसा अणुव्रत असें ह्मणतात.

स्थावरघाती जीवस्त्रससंरक्षी विशुद्धपरिणामः ॥
योऽक्षविषयानिवृत्तः स संयतासंयतो ज्ञेयः ॥ ५ ॥

अर्थ— जो जीव ( श्रावक ) स्थावरजीवाची हिंसा करतो व

त्रसजीवाचें रक्षण करतो आणि ज्याचे परिणाम शुध्द असून ज्यानें इंद्रियांचे विषय सोडले नाहींत तो संयतासंयत ह्मणजे थोडा संयम पाळणारा व थोडा न पाळणारा असा समजावा.

हिंसा द्वेधा प्रोक्ताऽऽरम्भानारम्भजत्वतो दक्षैः ॥
गृहवासतो निवृत्तो द्वेधाऽपि त्रायते तां च ॥ ६ ॥

अर्थ— आरंभापासून झालेली हिंसा ( गृहस्थधर्मांत निरुपायामुळें घडणारी हिंसा ) व अनारंभापासून झालेली हिंसा ( तीव्रकषायामुळें निष्कारण घडणारी हिंसा ) अशी हिंसा दोन प्रकारची आहे असें विद्वानांनीं सांगितलें आहे. ज्यानें गृहवास सोडिला आहे; तो ह्या दोनी प्रकारच्या हिंसेचें रक्षण करतो ह्मणजे ही दोनी प्रकारची हिंसा होऊं देत नाहीं.

गृहवाससेवनरतो मन्दकषायप्रवर्तितारम्भः ॥
आरम्भजां स हिंसां शक्नोति न रक्षितुं नियतम् ॥ ७

अर्थ — गृहवास सेवन करण्यांत आसक्त झालेला व मंदकषायानें ज्यानें अवश्य लागणारे कृषी वगैरे आरंभ सुरूं केलेले आहेत अशा श्रावकाच्या आरंभापासून होणाऱ्या हिंसेचें रक्षण होणें केव्हांही शक्य नाहीं. ह्मणजे वर सांगितलेल्या श्रावकाच्या हातून आरंभापासून होणारी हिंसा होते.

शमिताद्याष्टकषायः प्रवर्तते यः परत्र सर्वत्र ॥
निन्दागर्हाविष्टः स संयमासंयमं धत्ते ॥ ८ ॥

अर्थ— ज्यानें अनंतानुबंधि क्रोध, मान, मया, लोभ आणि अप्रत्याख्यान क्रोध, मान, माया, लोभ ह्या आठ कषायांचा उपशम केलेला असून जो सर्वव्यवहारांत ( ऐहिक व पारलौकिक कर्मांत ) प्रवृत्त झालेला आहे आणि निंदा गर्हा ह्या दोहींनीं युक्त आहे तो श्रावक संयमासंयमाला धारण करतो. तात्पर्य—अशा

श्रावकाला संयतासंयतच ह्मणावें.

**कामासूयामायामत्सरपैशून्यदैन्यमदहीनः ॥**
**धीरः प्रसन्नचित्तः प्रियंवदो वत्सलः कुशलः ॥९॥**
**हेयादेयपटिष्ठो गुरुचरणाराधनोद्यतमनीषः ॥**
**जिनवचनतोयधौतस्वान्तकलङ्को भवविभीरुः १०**
**सम्यक्त्वरत्नभूषो मन्दीकृतसकलविषयकृतगृद्धिः**
**एकादशगुणवर्ती निगद्यते श्रावकः परमः ॥ ११ ॥**

अर्थ— काम, असूया ( दुसऱ्याच्या गुणाला दोष मानणें ) माया ( कपट ) द्वेष, चहाडी, दीनता, आणि उन्मटपणा हे दोष ज्याच्यामध्यें नाहींत, आणि धीर असून प्रसन्नमनाचा, मधुर बोलणारा, दुसऱ्यावर वात्सल्य करणारा आणि शहाणा असा आहे, ग्राह्य काय आणि त्याज्य काय ह्याचें ज्याला चांगलें ज्ञान आहे, गुरुचरणाची सेवा करण्याविषयीं ज्याला इच्छा उत्पन्न झाली आहे, जिनोपदेशरूपी उदकानें ज्यानें आपल्या मनाचा मल धुवून टाकिला आहे, जो संसाराला भीत आहे असा आणि सम्यक्त्वरत्नानें भूषित असून ज्यानें सर्व विषयांचा उपभोग कमी केलेला आहे असा अकराव्या प्रतिमेचें धारण करणारा जो श्रावक, तो उत्तम श्रावक होय असें सांगितलें आहे.

**संरम्भसमारम्भारम्भैर्योगकृतकारितानुमतैः ॥**
**सकषायैरभ्यस्तैस्तरसा सम्पद्यते हिंसा ॥ १२ ॥**

अर्थ— संरंभ ( प्रमादवान् अशा पुरुषाचा हिंसेविषयीं प्रयत्न ) समारंभ ( हिंसा करण्यास लागणारी सामग्री जमविणें ) आणि आरंभ (प्रत्यक्ष हिंसा करण्यास प्रवृत्त होणें ) ह्या तिहींच्या योगानें, व तीन योगांच्या योगानें ( मन, वचन शरीर ह्यांच्या व्यापारांना योग असें ह्मणतात. ) कृत ( स्वतः करणें ) कारित

(दुसऱ्याकडून करविणें) अनुमत (दुसऱ्याच्या करण्यास अनुमोदन देणें) ह्या तीन प्रकारांनीं, व नेहमीं परिचित असलेल्या क्रोधादि चार कषायांच्या योगानें, वेगानें हिंसा होते. ह्याचें तात्पर्य असें आहे कीं, संरंभज समारंभज आणि आरंभज असे हिंसेचे मूळ तीन प्रकार आहेत. त्यांत संरंभ मानसिक, वाचिक आणि कायिक असा तीन प्रकारचा आहे. समारंभ आणि आरंभ ह्या प्रत्येकांत असेच तीन तीन प्रकार आहेत. मिळून हिंसेचे नऊ प्रकार झाले. त्या मानसिकसंरंभांत कृत, कारित आणि अनुमत असे तीन प्रकार आहेत. ह्याप्रमाणेंच वाचिक व कायिक संरंभाचेही असेच तीन तीन प्रकार आहेत. तसेंच समारंभ आणि आरंभ ह्यांच्याही मानसिक, कायिक, वाचिक ह्या तीन प्रकरणांत वरील कृत, कारित आणि अनुमत हे तीन प्रकार प्रत्येकांचे आहेत. मिळून एकंदर सत्तावीस प्रकार झाले. ह्या सत्तावीस प्रकारांत क्रोधजन्य, मायाजन्य, मानजन्य आणि लोभजन्य असे चार चार प्रकार प्रत्येकाचे आहेत. मिळून हिंसेचे एकंदर एकशेंहें आठ प्रकार होतात, असें समजावें. ते सर्वप्रकार सागारधर्मामृतांत स्पष्ट दाखविले आहेत. त्यावरून पाहून जिज्ञासूंनीं समजून घ्यावेत.

त्रित्रित्रिचतुःसंख्यैः संरम्भाद्यैः परस्परं गुणितैः ॥
अष्टोत्तरशतभेदा हिंसा सम्पद्यते नियतम् ॥ १३ ॥

अर्थ— संरंभ, समारंभ आणि आरंभ हीं तीन हिंसेचीं मूळ कारणें आहेत. त्यांत प्रत्येकांत तीन योग (मन, वचन, काय) आहेत. अर्थात् संरंभादिकांचे प्रत्येकांचे तीन तीन प्रकार होऊन एकंदर नऊ प्रकार झाले. ह्या नऊ प्रकारांतील प्रत्येक प्रकारांत कृत, कारित आणि अनुमत हे तीन भेद आहेत.

ह्यामुळें एकंदर सत्तावीस प्रकार होतात. ह्या सत्तावीस प्रकारां-पैकीं प्रत्येक प्रकारांत चार कषायांचा योग केला ह्मणजे एकंदर हिंसेच्या कारणांचे एकशेहे आठ भेद झाले. त्या प्रत्येक कार-णानें होणारी हिंसा निराळी असल्यानें हिंसेचेही एकशेहे आठ प्रकार होतात असें समजावें.

**जीवत्राणेन विना व्रतानि कर्माणि नो निरस्यन्ति ॥**
**चन्द्रेण विना ऋक्षैर्न हन्यन्ते तिमिरजालानि ॥ १४ ।**

अर्थ-- अहिंसा पाळल्यावांचून नुसतीं व्रतें कर्मांची निर्जरा करीत नाहींत. योग्यच आहे. कारण, चंद्रावांचून नुसत्या नक्षत्राच्यानें अंधाराचा नाश करवत नाहीं.

**तिष्ठन्ति व्रतनियमा नाहिंसामन्तरेण सुखजनकाः ॥**
**पृथिवीं न विना दृष्टास्तिष्ठन्तः पर्वताः क्वापि ॥ १५ ॥**

अर्थ—अहिंसेवांचून सुखकारक असे व्रतनियम रहात नाहींत. बरोबरच आहे. कारण, पृथ्वीवांचुन राहिलेले पर्वत कोठेंही दिसत नाहींत.

**निघ्नानेनाहिंसामात्माऽऽधारां निपात्यते नरके ॥**
**स्वाधारं नहि शाखां छिन्दानः पतति किं भूमौ ॥१६**

अर्थ— जीवाला आधारभूत असलेल्या अहिंसाव्रताचा नाश करणाऱ्या मनुष्यानें आपला आत्मा नरकांत पाडला जातो. ह्यांत आश्चर्य काय? कारण आपल्या आधारभूत असलेल्या ढापीला तोडणारा मनुष्य जमिनीवर पडत नाहीं काय?

**स मतो विरताविरतः स्वल्पकषायो विवेकपरमनिधिः ॥**
**रक्षति यस्त्रसदशकं प्रणिहन्ति स्थावरचतुष्कम् ॥ १७ ॥**

अर्थ— जो श्रावक दहा प्रकारच्या त्रसजीवांची ( द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, असंज्ञिपंचेंद्रिय आणि संज्ञिपंचेंद्रिय हे पांच

प्रकारचे त्रसजीव आहेत. ह्यांत प्रत्येकांत पर्याप्तक आणि अप-र्याप्तक असे दोन भेद आहेत. मिळून त्रसजीवांचे दहा प्रकार आहेत ) हिंसा करीत नाहीं, आणि चार प्रकारच्या स्थावरजी-वांची हिंसा करतो; तो विरताविरत होय. तो स्वल्पकषाय ह्मणजे ज्याचे कषाय कमी झालेले आहेत असा असून विवे-काचा समुद्र असतो.

**सर्वविनाशी जीवस्त्रसहननं त्यज्यते यतो जैनैः ॥**
**स्थावरहननानुमतिस्ततः कृता तैः कथं भवति ॥ १८ ॥**

अर्थ— साधारणतः जीव हा सर्वजीवांचा अर्थात् वर सांगि-तलेल्या दहा प्रकारच्या त्रसजीवांचा व चार प्रकारच्या स्थाव-रजीवांचा नाश करणारा आहे. त्यांत जैनांनीं जर त्रसजी-वांची हिंसा करावयाचें सोडलें तर, तेवढ्यानें त्यांनीं (जैनांनीं) स्थावरजीवांची हिंसा करण्यास अनुमति दिली असें कसें बरें होईल?

**त्रिविधा द्विविधेन मता विरतिर्हिंसादितो गृहस्थानाम् ॥**
**त्रिविधा त्रिविधेन पुनर्गृहचारकतो निवृत्तानाम् ॥ १९ ॥**
**जीववपुषोरभेदो येषामैकान्तिको मतः शास्त्रे ॥**
**कायविनाशे तेषां जीवविनाशः कथं वार्यः ॥ २० ॥**

अर्थ— ज्यांच्या शास्त्रांत जीव आणि शरीर ह्यांचा अभेद आहे असा एकच प्रकार मानलेला आहे; त्यांच्या मताप्रमाणें शरीराचा नाश झाला असतां जीवाच्या नाशाचें निवारण कसें करतां येईल? येणार नाहीं.

**आत्मशरीरविभेदं वदन्ति ये सर्वथा गतविवेकाः ॥**
**कायवधे हन्त कथं तेषां सञ्जायते हिंसा ॥ २१ ॥**

अर्थ— परंतु विचारशून्य असे जे लोक जीव आणि शरीर हीं दोन सर्वथा निराळीं आहेत असें मानतात, त्यांच्या मतानें

शरीराचा नाश केला असतां हिंसा कशी बरें होते? होत नाहीं. तात्पर्य— आत्मा हा देहाहून सर्वथा भिन्न आहे असें मानणाऱ्यांच्या मतानें हिंसा मुळींच होत नसल्यानें हिंसा ह्या शब्दाला अर्थच नाहीं असें होतें; म्हणून हें मत चुकीचें आहे.

भिन्नाभिन्नस्य पुनः पीडा सम्पद्यते तरां घोरा ॥
देहवियोगे यस्मात्तस्मादतिवारिता हिंसा ॥ २२ ॥

अर्थ— आत्मा हा शरीराहून कथंचित् भिन्न व कथंचित् अभिन्न आहे, असें मानणाऱ्या जैनांच्या मतानें– ज्या अर्थी शरीराचा आणि जीवाचा वियोग होण्याच्या वेळीं ( मरणाच्या वेळीं ) फार भयंकर पीडा होते, त्या अर्थी–हिंसा अवश्य संभवते.

तत्पर्यायविनाशो दुःखोत्पत्तिः परश्च संक्लेशः ॥
यः सा हिंसा सद्भिर्वर्जयितव्या प्रयत्नेन ॥ २३ ॥

अर्थ— अन्य जीवाच्या वर्तमानकालिक पर्यायाचा ( मनुष्यादि पर्यायाचा ) नाश, अथवा त्याला दुःखाची उत्पत्ति किंवा त्याला संक्लिष्टपरिणाम ( आर्तध्यान किंवा रौद्रध्यान ) उत्पन्न करणें हीच हिंसा होय असें सज्जन ह्मणतात. ( हा हिंसाशद्बाचा पारिभाषिक अर्थ होय ) हिचा मोठ्या प्रयत्नानें त्याग करावा.

प्राणी प्रमादकलितः प्राणव्यपरोपणं यदादत्ते ॥
सा हिंसाऽकथि दक्षैर्भववृक्षनिषेकजलधारा ॥२४॥

अर्थ— प्रमाद ( क्रोधादि कषाय ) ह्यांनीं युक्त झालेला जीव दुसऱ्या जीवाच्या प्राणांचा जो नाश करतो ती हिंसा होय ( अर्थात् देहाचा आणि प्राणांचा वियोग करणें ही हिंसा होय. ) असें पंडितांनीं सांगितलें आहे. [ हा हिंसाशब्दाचा प्रसिद्ध अर्थ सांगितला आहे. ] ही हिंसा संसारवृक्षावर सिंचन करणारी अर्थात् संसाररूपी वृक्षाला वाढविणारी पाण्याची धार आहे.

तात्पर्य— ज्याप्रमाणें पाण्याची धार वृक्षाला वाढविते त्याप्रमाणें हिंसा ही संसार वाढविते; ह्मणून ती अवश्य त्याज्य आहे.

**म्रियतां मा मृत जीवः प्रमादबहुलस्य निश्चिता हिंसा ॥**
**प्राणव्यपरोपेऽपि प्रमादहीनस्य सा नास्ति ॥ २५ ॥**

अर्थ— दुसरा जीव मरो किंवा न मरो, ज्याच्यामध्यें प्रमाद ( कषाय ) वृद्धि पावले त्याच्या हातून हिंसा निश्चयानें घडली असें समजावें. आणि दुसऱ्याच्या प्राणांचा जरी नाश झाला तथापि प्रमाद ( कषाय ) नसेल त्याच्या हातून हिंसा झाली नाहीं असेंच समजावें.

**यो नित्योऽपरिणामी तस्य न जीवस्य जायते हिंसा ॥**
**न हि शक्यते निहन्तुं केनापि कदाचनाकाशम् ॥ २६ ॥**

**क्षणिको यो व्ययमानः क्रियमाणा तस्य निष्फला हिंसा**
**चलमानः पवमानो न चाल्यमानः फलं कुरुते ॥ २७ ॥**

अर्थ— जो जीव नित्य असल्यामुळें अपरिणामी असेल ह्मणजे ज्याच्या मनांत जीव हा नित्य असून ज्याचा परिणाम होत नाहीं असा आहे, त्या जीवाची केव्हांही हिंसा होत नाहीं. कारण, नित्य असल्यामुळें अपरिणामी असलेलें आकाश कोणालाही मारतां येणें शक्य नाहीं. तसेंच, जो जीव क्षणिक असल्यामुळें प्रतिक्षणीं नाश पावत असेल त्याची हिंसा करून देखील व्यर्थ आहे. ह्मणजे त्या तसल्या जीवाची हिंसाच होत नाहीं. हें योग्यच आहे. कारण, नेहमी हालणारा वायु हालविला असतां काय उपयोग आहे? कांहीं नाहीं. तात्पर्य— जीव नित्य आहे असें ह्मणणाऱ्याच्या मताप्रमाणें विचार केला असतां जीवाला जरी मारलें तथापि हिंसा होत नाहीं, आणि

जीव क्षणिक आहे असें ह्मणणाऱ्यांच्या मताप्रमाणेंही जीवाला मारलें असतां हिंसा होत नाहीं.

**यस्मान्नित्यानित्यः कायवियोगे निपीड्यते जीवः ॥**
**तस्मादुक्ता हिंसा प्रचुरकालिकबन्धवृद्धिकरी ॥ २८ ॥**

अर्थ— ज्या अर्थी जीव हा द्रव्यस्वरूपानें नित्य व पर्यायस्वरूपानें अनित्य असा आहे आणि देहाशीं वियोग होत असतां त्याला फार पीडा होते, त्या अर्थी हिंसा होते असें सांगितलें आहे. ही हिंसा पापकर्माचा अतिशय बंध करणारी आहे. तात्पर्य जीव हा वर सांगितलेल्या दोन प्रकारांपैकीं कोणत्याही एका प्रकाराचा नसून तो कथंचित् नित्य आणि कथंचित् अनित्य असा मानला तरच हिंसा ह्या शब्दाचा अर्थ त्याच्या ठिकाणीं संगत होतो. नाहींतर होत नाहीं.

**देवातिथिमन्त्रौषधिपित्रादिनिमित्ततोऽपि सम्पन्ना ॥**
**हिंसाऽऽधत्ते नरके किं पुनरिह साऽन्यथा विहिता ॥ २९ ॥**

अर्थ— हिंसा ही देव, अतिथि, मंत्र, औषध ह्यांच्या निमित्तानें किंवा बाप, गुरु, वगैरेंच्या निमित्तानें केली असली तथापि ती करणाऱ्याला नरकांतच टाकिते. मग ह्या वरील निमित्ताहून अन्यनिमित्तानें जर हिंसा केली तर ती नरकांत टाकील ह्यांत काय सांगावयाचें आहे?

**आत्मवधो जीववधस्तस्य च रक्षाऽऽत्मनो भवति रक्षा ॥**
**आत्मा न हि हन्तव्यस्तस्य वधस्तेन मोक्तव्यः ॥ ३० ॥**

अर्थ— इतर जीवाचा वध करणें हें आत्मवध केल्यासारखें आहे; आणि इतर जीवांचें रक्षण करणें हें आत्मरक्षण केल्याप्रमाणें आहे; तसेंच आत्मा हा वध करण्यास योग्य नाहीं. ह्मणून इतर जीवांचा वध करण्याचें सोडून द्यावें.

**सर्वा विरतिः कार्या विशेषयित्वाऽविचारभीतेन ॥**
**पौर्वापर्यं दृष्ट्वा सूत्रार्थं तत्त्वतो बुध्द्वा ॥ ३१ ॥**

अर्थ— अतिचार होतील ह्मणून भ्यालेल्यानें मागचा पुढचा विचार करून व सूत्रांचा खरा अर्थ समजून विशेषेंकरून ज्या योगानें अतिचार होईल, अशा सर्व व्यवहाराचा त्याग करावा.

**शक्त्यनुसारेण बुधैर्विरतिः सर्वाऽपि युज्यते कर्तुम् ॥**
**तामन्यथा दधानो भङ्गं याति प्रतिज्ञायाः ॥ ३२ ॥**

अर्थ— विद्वान् लोकांनीं आपल्या शक्तीप्रमाणें सर्व प्रकारच्या आरंभांचा त्याग करावा हें योग्य आहे. असें असतां अहिंसा व्रताची प्रतिज्ञा केलेला श्रावक जर भलतेंच करीत असेल तर त्या योगानें त्याच्या प्रतिज्ञेचा भंग होतो.

**केचिद्वदन्ति मूढा हन्तव्या जीवघातिनो जीवाः ॥**
**परजीवरक्षणार्थं धर्मार्थं पापनाशार्थम् ॥ ३३ ॥**

अर्थ— सर्पादिकांसारखे दुसऱ्या जीवांचा नाश करणारे जीव दुसऱ्या जीवांच्या रक्षणाकरितां, धर्माकरितां व त्या सर्पादि जीवांच्या हातून होत असलेल्या पापाच्या नाशाकरितां ते ( सर्पादि जीव ) मारलेच पाहिजेत; असें कित्येक मूर्ख लोक ह्मणतात.

**युक्तं तन्नैवं सति हिंस्रत्वात्प्राणिनामशेषाणाम् ॥**
**हिंसायाः कः शक्तो निषेधने जायमानायाः ॥ ३४ ॥**

अर्थ— तें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण, असें जर होईल ह्मणजे दुसऱ्या जीवांचा घात करणाऱ्या जीवांना मारावें असें ह्मणणें जर योग्य होईल, तर, सर्वच जीव हिंसक ( दुसऱ्या जीवाचा नाश करणारे ) असल्यानें सहज होत असलेल्या हिंसेचें निवारण करण्यास कोण बरें समर्थ होईल? कोणी होणार

नाहीं. तात्पर्य- सर्व जीव हिंसकच असल्यानें अहिंसाव्रत करणेंच शक्य नाहीं असें होईल.

धर्मोऽहिंसाहेतुर्हिंसातो जायते कथं तथ्यः ॥
न हि शालिः शालिभवः कोद्रवतो जायते जातु ३५

अर्थ— हिंसा होऊं न देण्याला साधनीभूत असलेला धर्म हिंसेच्याच योगानें कसा बरें खरा ठरेल? कारण, साळी पेरल्यानें उत्पन्न होणाऱ्या साळी, कोद्रु पेरून कधींही उत्पन्न व्हावयाच्या नाहीत.

पापनिमित्तं हि वधः पापस्य विनाशने कथं शक्तः ॥
च्छेदनिमित्तः परशुः शक्नोति लतां न वर्धयितुम् ॥३६॥

अर्थ— जीववध हा पापाचें कारण असून तो पाप नाश करण्याला कसा बरें समर्थ होईल? कारण तोडण्याचें साधन असलेली कुऱ्हाड वेली वाढविण्यास केव्हांही समर्थ व्हावयाची नाहीं.

हिंस्राणां यदि घाते धर्मः सम्भवति विपुलसुखदायी ॥
सुखविघ्नस्तर्हि कृतः परजीवविघातिनां घाते ॥ ३७ ॥

अर्थ— हिंसक जीवांचा घात केला असतां जर पुष्कळ सुख देणारा धर्म होत असेल, तर, हिंसकजीवांचा नाश केला असतां त्या जीवांच्या सुखाला विघ्न केल्यासारखें झालें. कारण, जसा मनुष्यानें हिंसक जीवांचा नाश केला असता त्याचा धर्म होतो; त्याप्रमाणेंच हिंसक जीवांनीं मनुष्याचा वध केला असतां त्यांचाही धर्मच होतो ह्मणावयास काय हरकत आहे?

यस्माद्गच्छन्ति गतिं निहता गुरुदुःखसङ्कटां हिंस्राः ॥
तस्माद्दुःखं वधतः पापं न कथं भवति घोरम् ॥ ३८ ॥

अर्थ— हिंसक असे जे सर्पादि जीव ते मारले असतां ज्या

अर्थी मोठ्या दुःखानें व्याप्त असलेल्या अशा स्थितीला प्राप्त होतात, त्या अर्थी वधापासून दुःख व भयंकर असें पाप करसें बरें होत नाहीं ?

**दुःखवतां भवति वधे धर्मो नेदमपि युज्यते वक्तुम् ॥**
**मरणे नरके दुःखं घोरतरं वार्यते केन ॥ ३९ ॥**

अर्थ— दुःखी जीवाला मारलें असतां धर्म होतो हेंही बोलणें योग्य होत नाहीं. कारण, दुःखी जीव मारला असतां तो नरकांत गेल्यावर त्याला जें दुख भोगावें लागतें, त्याचें निवारण कोणाच्यानें करवेल ?

**सुखितानामपि घाते पापप्रतिषेधने परोऽधर्मः ॥**
**जीवस्य जायमानो निषेधितुं शक्यते केन ॥ ४० ॥**

अर्थ— सुखी जीवांच्या हातून पुढें पाप होऊं नये ह्यानिमित्तानें त्यांचा वध केला असताही वध करणाऱ्याचा जो मोठा अधर्म होत आहे त्याचें निवारण कोणाच्यानें बरें करवेल ?

**पौर्वापर्यविरुद्धं सम्यक्त्वमहीध्रपाटने वज्रम् ॥**
**इत्थं विचार्य सद्भिः परवचनं सर्वथा हेयम् ॥ ४१ ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें सज्जनांनीं विचार करून, मागें सांगितलेल्या व पुढें सांगावयाचें त्याला विरुद्ध असलेलें आणि सम्यक्त्वरूपी पर्वताचा भेद करणारें वज्रच कीं काय ! असें अन्यमती लोकांचें भाषण सर्वथा सोडून द्यावें. ह्मणजे त्याप्रमाणें केव्हांही वागूं नये.

**अज्ञानतो यदेनो जीवानां जायते परमघोरम् ॥**
**तच्छक्यते निहन्तुं ज्ञानव्यतिरेकतः केन ॥ ४२ ॥**

अर्थ— अज्ञानामुळें जीवाच्या हातून जें भयंकर पाप घडतें तें ज्ञानावांचून दुसऱ्या कोणाच्यानें घालविणें शक्य आहे बरें ?

अर्थात् त्या पातकाचा नाश करण्याला ज्ञान हेंच समर्थ आहे.

**यो धर्मार्थं छिन्ते हिंस्राहिंस्रसुखदुःखिनो भाविनः ॥**
**पीयूषं स्वीकर्तुं स वपति विषविटपिनो नूनम् ॥ ४३ ॥**

अर्थ— जो मनुष्य हिंसक, अहिंसक, सुखी अथवा दुःखी ह्यांपैकीं कोणत्याही जीवाचा वध धर्माकरितां करतो, तो अमृताच्या प्राप्तीकरितां विषवृक्षांची लावण करतो हें खचीत आहे!

**वचसा वपुषा मनसा हिंसां विदधाति यो जनो मूढः ॥**
**जन्मवनेऽसौ दीर्घे दीर्घं सञ्चार्यते दुःखी ॥ ४४ ॥**

अर्थ-- जो मूर्ख मनुष्य वाणीनें शरीरानें अथवा मनानें हिंसा करतो, तो दुःखी होऊन ह्या अफाट असलेल्या संसाररूपी अरण्यांत दीर्घकालपर्यंत संचार करतो.

**यन्म्लेच्छेष्टविगर्ह्यं यदनादेयं जिघृक्षतां धर्मम् ॥**
**यदनिष्टं साधुजनैस्तद्वचनं नोच्यते सद्भिः ॥ ४५ ॥**

अर्थ-- जें भाषण म्लेंच्छ लोकांनीं ( यवन वगैरे लोकांनीं ) बोलण्याला योग्य असल्यानें निंद्य आहे, जें धर्माचा संग्रह करणाऱ्यांनीं उच्चारण्याला अयोग्य असें आहे आणि जें साधुजनांनीं अप्रिय मानलें आहे; तें भाषण चांगल्या लोकांनीं करूं नये.

**कामक्रोधाव्रीडाप्रमादमदलोभमोहविद्वेषैः ॥**
**वचनमसत्यं सन्तो निगदन्ति न धर्मरतचित्ताः ॥ ४६ ॥**

अर्थ— धर्माचरणांत ज्यांचें मन गढून गेलें आहे असे सत्पुरुष काम, क्रोध, निर्लज्जपणा, प्रमाद, मद, लोभ, मोह आणि द्वेष ह्यामुळेंही असत्य भाषण बोलत नाहींत.

**सत्यमपि विमोक्तव्यं परपीडारम्भतापभयजनकम् ॥**
**पापं विमोक्तुकामैः सुजनैरिव पापिनां वृत्तम् ॥ ४७ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें सुजन पापी लोकांप्रमाणें वागण्याचें सोडून देतात; त्याप्रमाणें, ज्यापासून दुसऱ्याला पीडा होते, ज्याच्या योगानें कृषिकर्मादि आरंभाविषयीं प्रवृत्त होतात, ज्यामुळें दुसऱ्याला त्रास अथवा भय उत्पन्न होतें असें सत्यभाषणही पापाचा त्याग करण्याची इच्छा करणाऱ्यांनीं सोडून दिलें पाहिजे.

**भाषन्ते नासत्यं चतुष्प्रकारमपि संसृतिविभीताः ॥**
**विश्वासधर्महननं विषादजननं बुधावमितम् ॥ ४८ ॥**

अर्थ— विश्वासघात करणारें, धर्माची हानि करणारें, दुसऱ्याच्या मनाला वाईट वाटूं देणारें ज्ञात्या लोकांनीं ज्याचा त्याग केला आहे आणि ज्ञात्यांनीं जें निंद्य मानलें आहे असें चारही प्रकारचें असत्य भाषण संसाराला भिणारे लोक बोलत नाहींत. [ चारही प्रकारचें असत्य भाषण असें जें ह्मटलें आहे त्यांत असत्य भाषणाचे चार प्रकार असे आहेत कीं, असदुद्भावन ह्म० नसलेलें कल्पून सांगणें; सदपलापन ह्म० असलेल्याचें गोपन करून बोलणें; विपरीत ह्म० असलेल्याच्या विरुद्ध बोलणें; नित्यासत्य ह्म० अगदींच खोटें बोलणें हे असत्याचे चार प्रकार आहेत.

**असदुद्भावनमाद्यं वचनमसत्यं निगद्यते सद्भिः**
**ऐकान्तिकाः समस्ता भावा जगतीति विज्ञेयम् ॥ ४९**

अर्थ— वर जें चार प्रकारचें असत्यभाषण सांगितलें आहे त्यांत पहिलें "असदुद्भावन" नांवाचें असत्यभाषण होय; असें पंडितांनीं सांगितलें आहे. त्याचें उदाहरण असें– "जगांतील सर्व पदार्थ ऐकांतिकच ( एका धर्मानें युक्त असेच ) आहेत असें ह्मणणें; हें समजावें. ह्यांत जगांतील सर्व ऐकांतिकच

आहे" असें ह्मटलें असतां जगांतील सर्व पदार्थ ऐकांतिक नसून ऐकांतिक आहेत असें ह्मटल्यानें वास्तविक नसलेल्या ऐकांतिकत्वाची कल्पना केली आहे. ह्मणून हें भाषण असदु-द्भावनरूप असत्यभाषण होय.

सदपलपनं द्वितीयं वितथं कथयन्ति तथ्यविज्ञानाः ॥
सृष्टिस्थितिलययुक्तं किञ्चिन्नास्तीति यदभिहितम् ॥५०

अर्थ— सदपलपन हें दुसरें असत्यभाषण होय असें खरें जाणते लोक ह्मणतात. त्याचें उदाहरण– ह्या जगांत उत्पत्ति, स्थिति आणि नाश ह्या तिहींनीं युक्त असें कांहींच नाहीं असें ह्मणणें. ह्या ह्मणण्यांत असें होतें कीं, जगांतील सर्व पदार्थ वास्तविक पाहिलें असतां उत्पत्ति, स्थिति आणि नाश ह्यांनीं युक्त आहेत, असें असतां त्याचें गोपन करून 'ते तसे नाहींत' असें ह्मणण्यानें त्या पदार्थांच्या नसलेल्या स्वरूपाची कल्पना केल्यासारखी होते. ह्मणून ह्या भाषणाला सदपलपन असें ह्मणतात.

विपरीतमिदं ज्ञेयं तृतीयकं यद्वदन्ति विपरीतम् ॥
सग्रन्थं निर्ग्रन्थं निर्ग्रन्थमपीह सग्रन्थम् ॥ ५१ ॥

अर्थ— जें विपरीत बोलणें तें तिसरें विपरीत नांवाचें असत्य होय. सग्रंथाला निर्ग्रंथ ह्मणणें आणि निर्ग्रंथाला सग्रंथ ह्मणणें हें ह्याचें उदाहरण आहे. ह्यांत निर्ग्रंथाला सग्रंथ ह्मणणें व सग्रंथाला निर्ग्रंथ ह्मणणें हें विरुद्ध आहे हें स्पष्ट आहे.

सावद्याप्रियगर्ह्यप्रभेदतो निन्द्यमुच्यते त्रेधा ॥
वचनं वितथं देहैर्जन्माब्धिनिपातने कुशलम् ५२

अर्थ— सावद्य, अप्रिय आणि गर्ह्य असें निन्द्य नांवाचें चवथें असत्य भाषण तीन प्रकारचें आहे असें मुनींद्रांनीं

सांगितलें आहे. हें भाषण संसारसमुद्रांत जीवाला टाकण्याला समर्थ आहे.

**आरम्भाः सावद्या विचित्रभेदा यतः प्रवर्तन्ते ॥**
**सावद्यमिदं ज्ञेयं वचनं सावद्यविभ्रस्तैः ॥ ५३ ॥**

अर्थ— ज्या भाषणापासून सावद्य ( हिंसायुक्त ) असे हे अनेकप्रकारचे कृष्यादि व्यापार प्रवृत्त होतात तें भाषण सावद्य समजावें; असें सावद्य भाषणाला त्रस्त झालेल्या पंडितांनीं जाणावें.

**कर्कशनिष्ठुरभेदनविरोधनादिबहुभेदसंयुक्तम् ॥**
**अप्रियवचनं प्रोक्तं प्रियवाक्यप्रवणवाणीकैः ॥५४॥**

अर्थ— प्रियवाक्य बोलण्याविषयीं ज्यांची वाणी तयार आहे अशा पंडितांनीं अप्रियवचन हें कर्कश, निष्ठुर, दुसऱ्याच्या हृदयाचा भेद करणारें, विरोध उत्पन्न करणारें असें अनेक प्रकारचें आहे असें सांगितलें आहे.

**हिंसनताडनभीषणसर्वस्वहरणपुरःसरविशेषम् ॥**
**गर्ह्यवचो भाषन्ते गर्होज्झितवचनमार्गज्ञाः ॥५५॥**

अर्थ— निंद्य भाषणाच्या त्यागाचा मार्ग ज्यांना माहीत आहे असे मुनि हिंसेविषयीं बोलणें, ताडनाविषयीं बोलणें, दुसऱ्याला भीति दाखविण्याकरितां बोलणें, दुसऱ्याचें सर्वस्व हरण करण्यासंबंधानें बोलणें वगैरे असें अनेक प्रकारचें गर्ह्य भाषण आहे असें ह्मणतात.

**अर्थ्यं पथ्यं तथ्यं श्रव्यं मधुरं हितं वचो वाच्यम् ॥**
**विपरीतं मोक्तव्यं जिनवचनविचारकैर्नित्यम् ॥५६॥**

अर्थ— ज्या अर्थाचा बोध व्हावयास पाहिजे असेल त्याच अर्थाचा बोध करून देणारें, आत्म्याच्या शुद्धपरिणामांचा विनाश न करणारें, खरें, ऐकण्याला योग्य, श्रवणकालीं

मनोहर आणि इहपरलोकीं कल्याण करणारें असें भाषण जिनवचनाचा विचार करणाऱ्या सज्जनांनीं नेहमीं बोलावें. आणि ह्याच्या विरुद्ध असें जें भाषण तें नेहमीं सोडून द्यावें.

वैरायासाप्रत्ययविषादकोपादयो महादोषाः ॥
जन्यन्तेऽनृतवचसा कुभोजनेनेव रोगगणाः ॥५७॥

अर्थ— ज्याप्रमाणें वाईट अन्न भक्षण केल्यानें अनेक रोग होतात त्या असत्यभाषणानें द्वेष, त्रास, अविश्वास, खेद, क्रोध वगैरे महादोष उत्पन्न होतात.

वचसाऽनृतेन जन्तोर्व्रतानि सर्वाणि झटिति नाश्यन्ते ॥
विपुलफलवन्ति महता दवानलेनेव विपिनानि ॥ ५८ ॥

अर्थ— पुष्कळ फलांनीं भरलेलीं अशीं अरण्यें ज्याप्रमाणें वणव्यानें नाश पावतात, त्याप्रमाणें असत्य भाषणानें मनुष्याची सर्व व्रतें तत्काल नष्ट होतात.

क्षेत्रे ग्रामेऽरण्ये रथ्यायां पथि गृहे खले घोषे ॥
ग्राह्यं न परद्रव्यं भ्रष्टं नष्टं स्थितं वाऽपि ॥ ५९ ॥

अर्थ— शेत, गांव, अरण्य, गांवांतील रस्ता, रहदारीची सडक, घर, धान्याचें खळें अथवा गौळवाडा इत्यादि ठिकाणीं गळून पडलेलें, गमावलेलें अथवा मुद्दाम ठेवलेलें दुसऱ्याचें द्रव्य घेऊं नये.

तृणमात्रमपि द्रव्यं परकीयं धर्मकांक्षिणा पुंसा ॥
अवितीर्णं नादेयं वह्निसमं मन्यमानेन ॥ ६० ॥

अर्थ— दुसऱ्याचें द्रव्य नुसती गवताची काडी जरी असली तथापि ती ज्याची असेल त्यास दिली नसल्यास धर्माची इच्छा करणाऱ्यानें अग्नीसारखें मानून केव्हांही घेऊं नये.

यो यस्य हरति वित्तं स तस्य जविस्य जीवितं हरति ॥

**आश्वासकरं बाह्यं जीवानां जीवितं वित्तम् ॥ ६१ ॥**

अर्थ- जो मनुष्य ज्याचें द्रव्य हरण करतो तो त्याचें जीवित हरण करतो असें समजावें. कारण, द्रव्य हें मनुष्याला समाधान उत्पन्न करणारें बाह्य [ शरीराच्या बाहेरचें ] एक जीवितच आहे.

**सदृशं पश्यन्ति बुधाः परकीयं काञ्चनं तृणं वाऽपि ॥**
**सन्तुष्टा निजवित्तैः परतापविभीरवो नित्यम् ॥ ६२ ॥**

अर्थ— स्वताच्या द्रव्यावर संतुष्ट असणारे व दुसऱ्याला पीडा होईल ह्मणून भिणारे असे सज्जन दुसऱ्याचें सोनें आणि गवत ह्या दोहोंची योग्यता सारखीच समजतात.

**तैलिकलुब्धकखट्टिकमार्जारव्याघ्रधीवरादिभ्यः ॥**
**स्तेनः कथितः पापी सन्ततपरतापदानरतः ॥ ६३ ॥**

अर्थ— चोरी करणारा मनुष्य तेली, फासेपारधी, खाटिक, मांजर, व्याघ्र, कोळी इत्यादिकांपेक्षां पातकी आहे. कारण, तो नेहमी दुसऱ्याला पीडा करण्याच्या कामांत गढून गेलेला असतो.

**स्वसृमातृदुहितृसदृशीर्दृष्ट्वा परकामिनीः पटीयांसः ॥**
**दूरं विवर्जयन्ते भुजगीरिव घोरदृष्टिविषाः ॥ ६४ ॥**

अर्थ— शहाणे लोक परस्त्रिया आपल्या बहिणी, माता किंवा कन्या ह्यांच्यासारख्या मानून, ज्याप्रमाणें ज्यांच्या दृष्टींतही भयंकर विष आहे अशा नागिणींचा त्याग करावा त्याप्रमाणें त्यांचा त्याग करतात.

**न निषेव्या परनारी मदनानलतापितैरपि त्रेधा ॥**
**क्षुत्क्षामैरपि दक्षैर्न भक्षणीयं परोच्छिष्टम् ॥ ६५ ॥**

अर्थ— क्षुधेनें पीडित झालेल्या अशाही शहाण्या मनुष्यानें ज्याप्रमाणें दुसऱ्याचें उष्टें भक्षण करूं नये, त्याप्रमाणें मदनाग्नीनें

तप्त झालेल्या मनुष्यांनीं सुद्धां मनानें, वाणीनें व शरीरानें परस्त्रीचें सेवन करूं नये.

**विषवल्लीमिव हित्वा पररामां सर्वथा त्रिधा दूरम्॥**
**सन्तोषः कर्तव्यः स्वकलत्रेणैव बुद्धिमता ॥ ६६ ॥**

अर्थ— बुद्धिमान् मनुष्यानें एखाद्या विषारी वेलीप्रमाणें परस्त्रीचा मन, वचन आणि शरीर ह्या तिहींच्या योगानें सर्वथा दूर त्याग करून; स्वस्त्रीच्या योगानें संतोष करून घ्यावा.

**नासक्त्या सेवन्ते भार्यां स्वामपि मनोभवाकुलिताः॥**
**वह्निशिखाऽप्यासक्त्या शीतार्तैः सेविता दहति ६७**

अर्थ— मदनानें व्याप्त झालेले ज्ञानी लोक स्वस्त्रीचा देखील उपभोग आसक्त होऊन करीत नाहींत. कारण, अग्नीची ज्वाला थंडीनें पीडित झालेल्या लोकांनींही फार आसक्त होऊन सेवन केली असतां ती जाळतेच.

**दृष्ट्वा स्पृष्ट्वा श्लिष्ट्वा दृष्टिविषा याऽहिमूर्तिरिव हन्ति ॥**
**तां पररामां भव्यो मनसाऽपि न सेवते जातु ॥ ६८ ॥**

अर्थ— जी पाहून, स्पर्श करून व आलिंगन करून नागिणीप्रमाणें मनुष्याला मारून टाकिते त्या परस्त्रीचा उपभोग भव्यजीव मनानें सुद्धा केव्हांही करीत नाहीं.

**तीव्राकारा तप्ता या स्पृष्टा दहति पावकशिखेव ॥**
**मारयति योपभुक्ता प्ररूढविषविटपिशाखेव ॥ ६९ ॥**
**मोहयति झटिति चित्तं निषेवमाणा सुरेव या नितराम्**
**या गलमालिङ्गति निपीडयति गण्डमालेव ॥ ७० ॥**
**व्याघ्रीव याऽऽमिषाशा विलोक्य रभसा जनं विनाशयति**
**पुरुषार्थपरैः सद्भिः परयोषा सा त्रिधा त्याज्या ॥ ७१ ॥**

अर्थ— जी तीव्र आकाराची व मदनानें तप्त झालेली अशी

असल्यानें अग्नीच्या ज्वालेप्रमाणें पुरुषाला जाळते, जी उपभोगिली असतां वाढलेल्या विषवृक्षाच्या शाखेप्रमाणें पुरुषाला मारते, जी सेवन केली असतां सुरेप्रमाणें पुरुषाला तत्काल अतिशय मोह उत्पन्न करिते, जी गंडमालेप्रमाणें पुरुषांच्या कंठाला आलिंगन करते, आणि मांस खाणाऱ्या वाघिणीप्रमाणें जी तत्काल पुरुषाला मारते, ती परस्त्री चतुर्विध पुरुषार्थाचें साधन करण्याविषयीं तत्पर असलेल्या सज्जनांनीं मन, वचन, काय ह्या तीहींच्या योगानें वर्ज्य करावी.

**मलिनयति कुलद्वितयं दीपशिखेवोज्वलाऽपि मलजननी ।**
**पापोपभुज्यमाना परवनिता तापने निपुणा ॥ ७२ ॥**

अर्थ— पापिणी आणि पुरुषाला पीडा करण्यांत कुशल असलेली अशी परस्त्री जरी सुंदर असली तथापि ती उपभोगिली असतां मल ( काजळ ) उत्पन्न करणाऱ्या अशा दीपशिखेप्रमाणें आपल्या आणि दुसऱ्याच्या अशा दोन्ही कुलांना कलंक लावते.

**वास्तु क्षेत्रं धान्यं दासी दासश्चतुष्पदं भाण्डम् ॥**
**परिमेयं कर्तव्यं सर्वं सन्तोषकुशलेन ॥ ७३ ॥**

अर्थ— आनंदसंपादन करण्यांत कुशल असलेल्या श्रावकानें घर, जमीन, धान्य, दासी, दास, जनावरें, भांडीं ह्या सर्व वस्तु परिमित कराव्यात.

**विध्यापयति महात्मा लोभं दावाग्निसन्निभं ज्वलितम् ॥**
**भुवनं तापयमानं सन्तोषोद्गाढसलिलेन ॥ ७४ ॥**

अर्थ-- महात्मा मनुष्य वणव्याप्रमाणें पेटलेला त्रिभुवनाला ताप देणारा असा लोभ संतोषरूप विपुलजलानें विझवितो.

**सर्वारम्भा लोके सम्पद्यन्ते परिग्रहनिमित्ताः ॥**
**स्वल्पयते यः सङ्गं स्वल्पयति स सर्वमारम्भम् ॥ ७५**

अर्थ— ह्या जगांत सर्वप्रकारचे आरंभ ( उद्योग ) परिग्रहा-च्या निमित्तानें होतात. ह्मणून जो परिग्रहाचा संग कमी करतो; तो सर्व आरंभही कमी करतो. ह्मणजे परिग्रह कमी केले असतां सर्व आरंभही कमी होतात.

**ककुबष्टकेऽपि कृत्वा मर्यादां यो न लङ्घयति धन्यः ॥**
**दिग्विरतेस्तस्य जिनैर्गुणव्रतं कथ्यते प्रथमम् ॥ ७६ ॥**

अर्थ— अष्टदिशांच्या ठिकाणीं मर्यादा करून जो धन्य श्रावक त्या मर्यादांचें उल्लंघन करीत नाहीं, त्या दिग्विरत श्रावकाचें हें पाहिलें गुणव्रत होय; असें श्रीजिनांनीं सांगितलें आहे.

**सर्वारम्भनिवृत्तेस्ततः परं तस्य जायते पूतम् ॥**
**पापापायपटीयः सुखकारि महाव्रतं पूर्णम् ॥ ७७ ॥**

अर्थ— दिग्व्रतधारी श्रावकानें केलेल्या मर्यादेच्या बाहेरची सर्व आरंभाची निवृत्ति केली असल्यानें त्याचें पवित्र आणि पापाचा नाश करण्याला समर्थ व सुखकर असें महाव्रत पूर्ण होतें. तात्पर्य—महाव्रत घेण्याची योग्यता येण्याकरितां अणुव्रतें व गुणव्रतें करावयाचीं असल्यानें तीं व्रतें सांग झाल्यानें पुढें करावयाच्या महाव्रतांचीं व्यंगता नाहींशी होऊन त्याला पूर्णता येते. अशा प्रकारें दिग्विरतिव्रत हें महाव्रताच्या पूर्णतेचें साधक असल्यानें दिग्विरतिव्रतानें जी मर्यादेच्या बाहेरची हिंसाविरति होते तीमुळें महाव्रत पूर्ण होतें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

**देशावधिमपि कृत्वा यो नाक्रामति सदा पुनस्त्रेधा ॥**
**देशविरतेर्द्वितीयं गुणव्रतं वर्ण्यते तस्य ॥ ७८ ॥**

अर्थ— देशाची देखील मर्यादा ठरवून जो श्रावक नेहमीं त्या मर्यादेचें मनवचनकायेंकरून उल्लंघन करीत नाहीं त्या देशविरत श्रावकाचें हें दुसरें देशविराति नांवाचें गुणव्रत होय.

**काष्ठेनेव हुताशं लाभेन विवर्धमानमतिमात्रम् ॥**
**प्रतिदिवसं यो लोभं निषेधयति तस्य कः सदृशः ७९**

अर्थ— काष्ठांच्या योगानें ज्याप्रमाणें अग्नि वाढतो त्याप्रमाणें विषयलाभामुळें वाढत असलेल्या लोभाचा जो प्रतिदिवशीं निषेध करतो ह्मणजे लोभ कमी करतो, त्याच्यासारखा दुसरा कोण बरें आहे?

**योऽनर्थं पञ्चविधं परिहरति विवृद्धशुद्धधर्ममतिः ॥**
**सोऽनर्थदण्डविरतिं गुणव्रतं नयति परिपूर्तिम् ॥ ८० ॥**

अर्थ— ज्यांची शुद्ध अशी धर्मबुद्धी वाढली आहे असा जो श्रावक पांच प्रकारच्या अनर्थांचा त्याग करतो, तो अनर्थदंडविरति नांवाचें गुणव्रत पूर्णतेस नेतो.

**मण्डलबिडालकुक्कुटमयूरशुकसारिकादयो जीवाः ॥**
**हितकामैर्न ग्राह्याः सर्वे पापोपकारपराः ॥ ८१ ॥**

अर्थ— कुत्रें, मांजर, कोंबडा, मोर, राघू, मैना वगैरे जीव पातकाला वाढविणारे असल्यामुळें आपल्या कल्याणाची इच्छा करणाऱ्यांनीं केव्हांही धरून ठेवूं नयेत.

**पञ्चानर्था दुष्टाध्यानं पापोपदेशनासक्तिः ॥**
**हिंसोपकारि दानं प्रमादचरणं श्रुतिर्दुष्टा ॥ ८२ ॥**

अर्थ— शिकार, जय, अपजय, युद्ध, परस्त्रीगमन, चोरी इत्यादिकांचें चिंतनें करणें ह्याला दुष्टाध्यान ह्मणतात. शेती, व्यापार इत्यादिकांच्या आरंभाच्या उपदेशांविषयीं आसक्ति ह्याला पापोपदेशासक्ति ह्मणतात. विष, अग्नि, शस्त्र इत्यादिक हिंसेचीं साधनें दुसऱ्यास देणें याला हिंसादान ह्मणतात. विनाकारण जमीन उकरणें, झाड तोडणें, गवत कांपणें, पाणी सांडणें याला प्रमादाचरण ह्मणतात. रागद्वेष वाढविणारी कथा

ऐकणें ह्याला दुष्टश्रुति ह्मणतात. हे पांच अनर्थदंड होत.

**लोहं लाक्षा नीली कुसुम्भमदनं विषं शणः शस्त्रम् ॥**
**सन्धानकं च पुष्पं सर्वं करुणापरैर्हेयम् ॥ ८३ ॥**

अर्थ— लोखंड, लाख, नीळ, कुसुंबा, धोतरा, विष, ताग, शस्त्र, आसुती, कंद ( गड्डे ), पुष्प हे सर्व पदार्थ दयाळु श्रावकानें टाकून द्यावेत. ह्मणजे ह्या वस्तूंचा संग्रह करूं नये.

**नाली सूरणकन्दो दिवसद्वितयोषिते च दधिमथिते ॥**
**विद्धं पुष्पितमन्नं कालिङ्गं द्रोणपुष्पिका त्याज्या ॥ ८४ ॥**

अर्थ— पालाभाजी, सुरणाचा कांदा, दोन दिवस राहिलेलें दही आणि ताक, विटलेलें व विटूं लागलेलें अन्न, कलंगडे आणि राई ह्यांचा त्याग करावा.

**आहारो निःशेषो निजस्वभावादन्यभावमुपयातः ॥**
**योऽनन्तकायिकोऽसौ परिहर्तव्यो दयालीढैः ॥ ८५ ॥**

अर्थ— आपल्या स्वभावाचा त्याग करून निराळ्याच स्वरूपाला प्राप्त झालेले सर्व भक्ष्य पदार्थ, आणि अनंतकायिक ( बटाटे वगैरे ) असे जे पदार्थ असतील त्या सर्वांचा दयाळु श्रावकानें त्याग करावा.

**त्यक्तार्तरौद्रयोगो भक्त्या विदधाति निर्मलध्यानः ॥**
**सामायिकं महात्मा सामायिकसंयतो जीवः ॥ ८६ ॥**

अर्थ— जो आर्त आणि रौद्र ह्या दोन प्रकारच्या ध्यानांचा त्याग करून निर्मल असें ध्यान करतो आणि सामायिक क्रियाहि करतो तो महात्मा जीव सामायिकसंयत होय.

**कालत्रितये त्रेधा कर्तव्या देववन्दना सद्भिः ॥**
**त्यक्त्वा सर्वारम्भं भवमरणविभीतचेतस्कैः ॥ ८७ ॥**

अर्थ— जन्ममरणाबद्दल ज्यांचें मन भीत आहे अशा सज्ज-

नांनीं सर्व आरंभांचा ( कृषि वगैरे कर्मांचा ) त्याग करून तिन्हीं कालीं मन, वचन, काय ह्या तिहींच्या योगानें अर्हंताला वंदना करावी.

सदनारम्भनिवृत्तैराहारचतुष्टयं त्रिधा हित्वा ॥
पर्वचतुष्के स्थेयं शमसँयमसाधनोद्युक्तैः ॥ ८८ ॥

अर्थ— प्रत्येक महिन्यांतील दोन अष्टमी व दोन चतुर्दशी या चार पर्वांच्या दिवशीं, चारप्रकारच्या आहाराचा त्याग करून; प्रपंचासंबंधी आरंभाचा त्याग ज्यांनीं केला आहे असे होत्साते शम आणि सँयम ह्यांच्या साधनाविषयीं उद्योग करीत असावें.

ताम्बूलगन्धमाल्यं नानाभ्यङ्गादिसर्वसंस्कारम् ॥
ब्रह्मव्रतरताचित्तैः स्थातव्यमुपोषितैस्त्यक्त्वा ॥ ८९ ॥

अर्थ— विडा, गंध, माला, अंगाला तेल लावणें वगैरे सर्व संस्कारांचा त्याग करून आणि ब्रम्हचर्यव्रतांत चित्त स्थिर ठेवून पर्वाच्या दिवशीं उपोषण करावें.

उपवासानुपवासैकस्थानेष्वेकमपि विधत्ते यः ॥
शक्त्यनुसारपरोऽसौ प्रोषधकारी जिनैरुक्तः ॥ ९० ॥

अर्थ— उपवास, अनुपवास आणि एकस्थान ह्यांपैकीं एक देखील जो आपल्या शक्तीला अनुसरून करतो, तो प्रोषधोपवास करणारा होय, असें श्रीजिनेंद्रांनीं सांगितलें आहे. उपवास अनुपवास आणि एकस्थान ह्या शब्दांचा अर्थ पुढील आर्येंत सांगतात.

उपवासं जिननाथा निगदन्ति चतुर्विधाशनत्यागम् ॥
सजलमनुपवासममी एकस्थानं सकृद्भुक्तम् ॥ ९१ ॥

अर्थ— चार प्रकारच्या आहाराचा त्याग करणें ह्याला जिनेंद्र

उपवास ह्मणतात. नुसतें जलपान करणें ह्याला अनुपवास ह्मणतात. आणि उपवासाच्या दिवशीं एकवार भोजन करणें ह्याला एकस्थान ह्मणतात.

**भोगोपभोगसंख्या विधीयते येन शक्तितो भक्त्या**
**भोगोपभोगसंख्याशिक्षाव्रतमुच्यते तस्य ॥ ९२ ॥**

अर्थ— जो श्रावक भक्तीनें आपल्या शक्तीप्रमाणें भोग आणि उपभोग ह्यांची संख्या ठरवितो, त्याचें तें भोगोपभोग नांवाचें शिक्षाव्रत होय असें ह्मणतात.

**ताम्बूलगन्धलेपनमज्जनभोजनपुरोगमो भोगः ॥**
**उपभोगो भूषास्त्रीशयनासनवस्त्रवाह्याद्यः ॥ ९३ ॥**

अर्थ— तांबूल, गंध, उटणी, स्नान, भोजन इत्यादिकाला भोग ह्मणतात; आणि अलंकार, स्त्री, शय्या, आसन, वस्त्र, वाहन वगैरेला उपभोग ह्मणतात. ह्यांत एकदाच ज्या वस्तूचा भोग करता येतो त्या वस्तूला भोग, आणि वारंवार ज्या वस्तूचा भोग करता येतो त्या वस्तूला उपभोग असें समजावें.

**परिकल्प्य संविभागं स्वनिमित्तकृताशनौषधादीनाम् ॥**
**भोक्तव्यं सागारैरतिथिव्रतपालिभिर्नित्यम् ॥ ९४ ॥**

अर्थ— अतिथिसंविभाग नांवाचें व्रत पाळणाऱ्या गृहस्थ श्रावकांनीं नेहमीं आपल्याकरितां केलेल्या अन्न औषध वगैरे पदार्थांचा विभाग करून अर्थात् अतिथीचा विभाग सोडून राहिलेलें भक्षण करावें.

**अतरिः स्वयमेव गृहं संयममविराधयन्ननाहूतः ॥**
**यः सोऽतिथिरुद्दिष्टः शद्बार्थविचक्षणैः साधुः ॥ ९५ ॥**

अर्थ— जो संयमाचा नाश न होऊं देतां आपण होऊनच घराकडे आला असेल तो उत्तम अतिथि होय असें शद्बांचें

अर्थज्ञान ज्यांना आहे अशा लोकांनीं सांगितलें आहे.

**अशनं पेयं स्वाद्यं खाद्यमिति निगद्यते चतुर्भेदम् ॥**
**अशनमतिथेर्विधेयो निजशक्त्या संविभागोऽस्य ॥९६॥**

अर्थ— अशन, पेय, स्वाद्य आणि खाद्य असें चार प्रकारचें अन्न आहे. त्यांतून ह्या अतिथीचा विभाग आपल्या शक्तीप्रमाणें काढून ठेवावा.

**मुद्गौदनाद्यमशनं क्षीरजलाद्यं मतं जिनैः पेयम् ॥**
**ताम्बूलदाडिमाद्यं स्वाद्यं खाद्यं त्वपूपाद्यम् ॥ ९७ ॥**

अर्थ— मुगाची खिचडी वगैरे पदार्थ हे अशन होत; दूध, पाणी वगैरे पदार्थ पेय होत; तांबूल, डाळिंब वगैरे पदार्थ हे स्वाद्य होत; आणि अनरसे, करंजा वगैरे अर्थात् फराळाचे पदार्थ खाद्य होत; असें जिनांचें मत आहे.

**ज्ञात्वा मरणागमनं तत्त्वमतिर्दुर्निवारमतिगहनम् ॥**
**पृष्ट्वा बान्धववर्गं करोति सल्लेखनां धीरः ॥ ९८ ॥**

अर्थ— निवारण करण्याला कठीण व फार भयंकर असें मरण आपल्याला प्राप्त झालें आहे असें समजल्यावर तत्त्वज्ञान ज्याला आहे अशा धीर पुरुषानें आपल्या आप्तेष्ट लोकांना विचारून सल्लेखनाविधि करावा.

**आराधनां भगवतीं हृदये निधत्ते ।**
**सज्ज्ञानदर्शनचरित्रतपोमयीं यः ॥**
**निर्धूतकर्ममलपङ्कमसौ महात्मा ।**
**शर्मोदकं शिवसरोवरमेति हंसः ॥ ९९ ॥**

अर्थ— जो सम्यग्ज्ञान, सम्यग्दर्शन, सम्यक्चारित्र आणि तप ह्यांनीं पूर्ण अशी जी भगवती आत्माराधना, तिला मनांत ठेवितो, तो महात्मा पुरुष हंसाप्रमाणें कर्ममलाला धुवून

टाकणारें व कल्याणरूपी उदकानें भरलेलें जें मोक्षरूपी सरोवर त्याला प्राप्त होतो.

जिनेश्वरनिवेदितं मननदर्शनालंकृतं ।
द्विषड्विधमिदं व्रतं विपुलबुद्धिभिर्धारितम् ॥
निधाय नरखेचरत्रिदशसम्पदं पावनीं ।
ददाति मुनिपुङ्गवामितगतिस्तुतिं निर्वृतिम् १००

अर्थ— श्रीजिनेंद्रानें उपदेशिलेलें व सम्यग्ज्ञान आणि सम्यग्दर्शन ह्यांनीं युक्त असलेलें जें बारा प्रकारचें हें वर सांगितलेलें व्रत, तें बुद्धिमान् पुरुषांनीं धारण केलें असतां मनुष्य विद्याधर आणि देव ह्यांची पवित्र अशी संपत्ति त्याला देऊन; मुनिवर्य अशा अमितगति आचार्यांनीं केलेली स्तुति आणि मुक्ति ह्या दोहोंची प्राप्ति करून देतें.

॥ इत्यमितगत्याचार्यकृतश्रावकाचारे षष्ठः परिच्छेदः ॥

# परिच्छेद सातवा.

**व्रतानि पुण्याय भवन्ति जन्तो- ।**
**र्न सातिचाराणि निषेवितानि ॥**
**सस्यानि किं क्वापि फलन्ति लोके ।**
**मलोपलीढानि कदाचनापि ॥ १ ॥**

अर्थ— मागें सांगितलेलीं व्रतें हीं अतिचारांनीं युक्त अशीं जर आचारण केलीं तर तीं पुण्योत्पादक होत नाहींत. बरोबरच आहे. कारण, मळकट झालेलीं अर्थात् ज्यांना कीड वगैरे लागलेली आहे अशीं धान्यें जगांत कोठेंही व केव्हांहीं फल देणारीं होत नाहींत.

**मत्वेति सद्भिः परिवर्जनीया ।**
**व्रते व्रते ते खलु पञ्च पञ्च ॥**
**उपेयनिष्पत्तिमपेक्षमाणा ।**
**भवन्त्युपाये सुधियः सयत्नाः ॥ २ ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें विचार करून प्रत्येक व्रतांत असलेले ते पांच पांच अतीचार सज्जनांनीं टाकून द्यावेत. कारण, फल-प्राप्ति होण्याची इच्छा करणारे लोक तें फल ज्यापासून होणारें असेल त्या उपायाविषयीं मोठा प्रयत्न करीत असतात.

**भारातिमात्रव्यतिरोपघात- ।**
**च्छेदान्नपानप्रतिषेधबन्धाः ॥**
**अणुव्रतस्य प्रथमस्य दक्षैः ।**
**पञ्चापराधाः प्रतिषेधनीयाः ॥ ३ ॥**

अर्थ— अतिशय ओझें लादणें, काठी वगैरेनें मारणें, कान नाक वगैरे कापणें अन्नपानाला प्रतिबंध करणें आणि बांधून ठेवणें हे अहिंसाणुव्रताचे पांच अपराध (अतीचार किंवा चुका) आहेत. व्रत पाळणाऱ्या मनुष्यांनीं हे अतीचार होऊं देऊं नयेत.

**न्यासापहारः परमन्त्रभेदो ।**
**मिथ्योपदेशः परकूटलेखः ॥**
**प्रकाशना गुह्यविचेष्टितानां ।**
**पञ्चातिचाराः कथिता द्वितीये ॥ ४ ॥**

अर्थ— दुसऱ्यानें ठेवलेल्या ठेवीचा अपहार करणें, गुप्त मसलत फोडणें, खोटा उपदेश करणें, खोटा लेख लिहिणें आणि दुसऱ्याचे गुप्त व्यवहार स्पष्ट करणें हे सत्याणुव्रताचे पांच अतीचार सांगितले आहेत.

**व्यवहारः कृत्रिमजस्तैननियोगस्तदाहृतादानम् ।**
**ते मानवैपरीत्यं विरुद्धराज्यव्यतिक्रमणम् ॥ ५ ॥**

अर्थ— कपटाचा ( अधिक मोलाच्या वस्तूंत कमी मोलाची वस्तु मिसळून ) व्यवहार करणें, चोरी करण्याविषयीं दुसऱ्याला प्रवृत्त करणें, दुसऱ्यानें चोरून आणलेल्या वस्तु घेणें, वजन-मापांत बदल करणें आणि राज्याच्या विरुद्ध घडामोडी करणें हे अचौर्याणुव्रताचे अतिचार आहेत.

**आत्तानुपात्तेत्वरिकाङ्गसङ्गा- ।**
**वनङ्गसङ्गो मदनातिसङ्गः ॥**
**परोपयामस्य विधानमेते ।**
**पञ्चातिचारा गदिताश्चतुर्थे ॥ ६ ॥**

अर्थ— विवाहित व्यभिचारिणीशीं संबंध करणें, अविवाहित

व्यभिचारिणीशीं संबंध करणें, रतिक्रीडेचा नव्हे अशा अवयवाशीं समागम करणें, स्वस्त्रीसमागम अतिशय करणें आणि दुसऱ्यांचीं लग्नें करून देणें हे चवथें जें ब्रह्मचर्यव्रत त्याचे पांच अतिचार आहेत,

क्षेत्रवास्तुधनधान्यहिरण्य- ।
स्वर्णकर्मकरकुप्यकसंख्याः ॥
योऽतिलङ्घयति परिग्रहलोल- ।
स्तस्य पञ्चकमवाचि मलानाम् ॥ ७ ॥

अर्थ— १ शेत, २ घर, ३ धन, धान्य, रुपें, सोनें, ४ दासदासी ५ तांबें वगैरे धातु ह्यांचें जें परिमाण ठरविलेलें असेल, त्याचें जो व्रती श्रावक परिग्रहाविषयीं लुब्ध होऊन उल्लंघन करितो; त्याच्या परिग्रह परिमाणाणुव्रताचे हे पांच अतीचार होतात.

स्मृत्यन्तरपरिकल्पनमूर्ध्वाधस्तिर्यग्व्यतिक्रमाः प्रोक्ताः ॥
क्षेत्रवृद्धिः प्राज्ञैरतिचाराः पञ्च तद्विरतेः ॥ ८ ॥

अर्थ— एक मर्यादा ठरली असतां ती विसरून भलतीच मर्यादा ठरली असल्याचें मला आठवतें असें ह्मणणें, वरच्या मर्यादेचा अतिक्रम करणें, खालच्या मर्यादेचा अतिक्रम करणें, तिरकस मर्यादेचा अतिक्रम करणें, ठरलेल्या क्षेत्राची मर्यादा वाढविणें हे पांच दिग्विरतिव्रताचे अतीचार आहेत.

आनयनयुज्ययोजनपुद्गलजल्पनशरीरसञ्ज्ञाख्याः ॥
अपराधाः पञ्च मता देशव्रतगोचराः सद्भिः ॥ ९ ॥

अर्थ— ठरलेल्या मर्यादेच्या बाहेर असलेली वस्तु आपल्या मर्यादेंत आणविणें, मर्यादेच्या बाहेर काम करण्यास चाकराची योजना करणें, मर्यादेच्या बाहेर ढेंकूळ धोंडा

वगैरे फेंकणें, मर्यादेच्या बाहेर ऐकूं जाईल असें मोठ्यानें बोलणें आणि मर्यादेच्या बाहेरील लोकास कळण्याकरितां खुणा करणें हे पांच देशविरतिव्रताचे अतीचार आहेत. असें सज्जनांचें मत आहे.

**असमीक्षितकारित्वं प्राहुर्भोगोपभोगनैरर्थ्यम् ॥**
**कन्दर्पं कौत्कुच्यं मौखर्यमनर्थदण्डस्य ॥ १० ॥**

अर्थ— विचार न करतां विनाकारण कोणतेंहि काम अधिक करणें, भोगोपभोग वस्तु कारणापेक्षां अधिक जमविणें, स्त्रीसंभोगाची इच्छा ज्यांत गर्भित आहे असें थट्टेनें भाषण करणें, चावटपणाच्या चेष्टा करणें, आणि उरमटपणानें पाहिजे तें बोलणें हे पांच अनर्थदंडविरतिव्रताचे अतीचार आहेत.

**योगा दुष्प्रणिधानाः स्मृत्यनुपस्थानमादराभावः ॥**
**सामायिकस्य जैनैरतिचाराः पञ्च विज्ञेयाः ॥ ११ ॥**

अर्थ— कायदुष्प्रणिधान ह्मणजे शरीर चंचल होणें, मनोदुष्प्रणिधान ह्मणजे मन एकाग्र नसणें, वचोदुष्प्रणिधान ह्मणजे मंत्रांतील अक्षरांचा उच्चार बरोबर न होणें, सामायिकाचा पाठ विसरणें आणि सामयिकाविषयीं आदर ( उत्साह ) नसणें हे पांच सामायिकव्रताचे अतीचार आहेत; असें जैनांनीं समजावें.

**ज्ञेया गतोपयोगा उत्सर्गादानसंस्तरकविधाः ॥**
**उपवासे मुनिमुख्यैरनादरः स्मृत्यसमवस्थाः ॥ १२ ॥**

अर्थ— न झाडतां,व न पाहतां उपकरणादि पदार्थ घेणें; मळमूत्र टाकणें; बिछाना वगैरे टाकणें; प्रोषधोपवासाचा अनादर करणें; आणि मनाची एकाग्रता नसणें ह्या क्रिया प्रोषधोपवास व्रतांत

उपयोगी नाहींत; ह्मणजे प्रोषधोपवासव्रताचे हे पांच अतीचार आहेत असें जाणावें.

**सहचित्तं सम्बद्धं मिश्रं दुष्पक्वमभिषवाहारः ॥**
**भोगोपभोगविरतैरतिचाराः पञ्च परिवर्ज्याः ॥ १३ ॥**

अर्थ— सचित्त वस्तु भक्षण करणें, सचित्त वस्तूचा ज्याला स्पर्श झाला आहे असा आहार करणें, सचित्त वस्तु ज्यांत मिसळली आहे असा आहार करणें, चांगलें न शिजलेलें किंवा करपलेलें अन्न भक्षण करणें आणि कामोत्तेजक असे दुसरे पदार्थ भक्षण करणें हे पांच भोगोपभोगव्रताचे अतीचार आहेत. ते वर्ज्य समजावेत.

**मत्सरकालातिक्रमसचित्तनिक्षेपणाविधानानि ॥**
**दानेऽन्यव्यपदेशः परिहर्तव्या मलाः पञ्च ॥ १४ ॥**

अर्थ- दुसऱ्या दात्याचा द्वेष करणें, भोजनकालाचा अतिक्रम करणें, दान करावयाचें अन्न सचित्तवस्तूवर ( ओल्या पानावर वगैरे ) ठेवणें, अन्नावर ओलें पान झांकणें, दान देण्याचें काम दुसऱ्यास सांगणें हे पांच दानाचे अतीचार आहेत. त्यांचा त्याग करावा.

**जीवितमरणाशंसानिदानमित्रानुरागसुखशंसाः ॥**
**सन्न्यासे मलपञ्चकमिदमाहुर्विदितविज्ञेयाः ॥ १५ ॥**

अर्थ–– जीविताची इच्छा, मरणाची इच्छा, निदान ( मला अमकें असावें अशी इच्छा ), मित्रांवर प्रेम आणि पूर्वी भोगिलेल्या सुखाची आठवण करणें हे पांच संन्यासाचे अतीचार आहेत; असें तत्त्वज्ञ अरहंतांनीं सांगितलें आहे.

**शङ्काकांक्षानिन्दापरशंसासंस्तवा मलाः पञ्च ॥**
**परिहर्तव्याः सद्भिः सम्यक्त्वविशोधिभिः सततम् ॥१६॥**

अर्थ— जिनप्रणीत तत्त्वाविषयीं संशय बाळगणें, भोगाची इच्छा करणें, स्वधर्मीयांची निंदा करणें, मिथ्यादृष्टींचें ज्ञान तप वगैरे पाहून सन्तुष्ट होणें, मिथ्यात्वी लोकांची स्तुति करणें हे पांच सम्यक्त्वाचे अतीचार आहेत. ते सम्यक्त्व शुद्ध करणारांनीं टाळावेत.

सप्ततिं परिहरन्ति मलाना- ।
मेवमुत्तमधियो व्रतशुध्द्यै ॥
श्रावका जगति ये शुभचित्ता- ।
स्ते भवन्ति भुवनोत्तमनाथाः ॥ १७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें सत्तर अतिचार व्रतांच्या शुद्धीकरितां जे उत्तम बुद्धीचे श्रावक वर्ज्य करितात, ते सुबुद्धि श्रावक; जगांत श्रेष्ठ असे इंद्र होतात.

निदानमायाविपरीतदृष्टी- ।
र्नाराचपङ्क्तीरिव दुःखकर्त्रीः ॥
ये वर्जयन्ते सुखभागिनस्ते ।
निःशल्यता शर्मकरीह लोके ॥ १८ ॥

अर्थ— बाणांच्या पंक्तीप्रमाणें दुःख देणारीं जीं निदान, माया, आणि मिथ्यात्व ह्या तीन शल्यांचा जे श्रावक त्याग करतात, ते मोठे सुखी होतात. योग्यच आहे. कारण, निःशल्यता (शल्य म्ह० दुःखाचें कारण तें नसणें) ही जगांत सुख देणारी आहे.

यस्यास्ति शल्यं हृदये त्रिभेदं ।
व्रतानि नश्यन्त्यखिलानि तस्य ॥
स्थिते शरीरे ह्यवगाह्य काण्डे ।
जनस्य सौख्यानि कुतस्तनानि ॥ १९ ॥

अर्थ— ज्याच्या शरीरांत वर सांगितलेलें तीन प्रकारचें शल्य असतें त्याची सर्वव्रतें नाश पावतात. बरोबरच आहे. कारण, बाणाचें शल्य शरीरांत घुसून जर स्थिर राहिलें तर त्या मनुष्याला सुख कोठून व्हावें?

प्रशस्तमन्यच्च निदानमुक्तं ।
निदानमुक्तैर्व्रतिनामृषीन्द्रैः ॥
विमुक्तिसंसारनिमित्तभेदा- ।
द्विधा प्रशस्त पुनरभ्यधायि ॥ २० ॥

अर्थ— निदानरहित अशा मुनींद्रांनीं व्रती श्रावकांना आणखी एक प्रशस्त नावाचें निदान सांगितलें आहे. तें मुक्तिसाधन आणि संसारसाधन असें दोन प्रकारचें आहे असें त्या मुनींद्रांनींच सांगितलें आहे.

कर्मव्यपायं भवदुःखहानिं ।
बोधिं समाधिं जिनबोधसिद्धिम् ॥
आकांक्षतः क्षीणकषायवृत्ते- ।
र्विमुक्तिहेतुः कथितं निदानम् ॥ २१ ॥

अर्थ— कर्मांचा नाश, संसारदुःखाचा नाश, रत्नत्रयाची प्राप्ति, समाधि (ज्ञानसहित मरण) आणि जिनांना होत असलेल्या केवलज्ञानाची प्राप्ति ह्यांची इच्छा करणाऱ्या व ज्याची कषायवृत्ति क्षीण झालेली आहे अशा श्रावकाला मुक्तीला साधनीभूत असलेलें प्रशस्तनिदान असतें; असें शास्त्रांत सांगितलें आहे.

जातिं कुलं बान्धववर्जितत्वं ।
दरिद्रतां वा जिनधर्मसिद्ध्यै ॥
प्रयाचमानस्य विशुद्धवृत्तेः ।

**संसारहेतुर्गदितं जिनेन्द्रैः ॥ २२ ॥**

**अर्थ**— जिनधर्माच्या सिद्धीकरितां उत्तमजाति, उत्तमकुल, बंधु (सजीव परिवार) नसणें, किंवा दारिद्य ह्यांची इच्छा करणाऱ्या शुद्धवृत्ति अशा श्रावकाला जें निदान होतें तें संसाराला कारणीभूत असें निदान होय; असें श्रीजिनेंद्रांनीं सांगितलें आहे.

**उत्पत्तिहीनस्य जनस्य नूनं ।**
**लाभो न जातिप्रभृतेः कदाचित् ॥**
**उत्पत्तिमाहुर्भवमुद्धबोधा ।**
**भवं च संसारमनेककष्टम् ॥ २३ ॥**

**अर्थ**— वरील श्लोकांत सांगितलेलें प्रशस्तनिदान हें संसाराला कारणीभूत आहे असें ह्मणण्याचें कारण असें आहे कीं, जो जीव उत्पत्तिरहित झाला त्याला जाति वगैरेंची प्राप्ति केंव्हाही होत नाहीं. अर्थात् उत्तमजाति वगैरे मिळविण्याकरितां उत्पत्ति ह्मणजे पुनर्जन्म प्राप्त झालें पाहिजे. पण, ज्ञानी असे ऋषि उत्पत्तीलाच अनेक दुःखें देणारा असा भव किंवा संसार असें ह्मणतात. ह्मणून वरील प्रशस्त निदान हें संसारसाधनीभूत आहे.

**संसारलाभो विदधाति दुःखं ।**
**शारीरिणां मानसमाङ्गिकं च ॥**
**यतस्ततः संसृतिदुःखभीतै- ।**
**स्त्रिधा निदानं न तदर्थमिष्टम् ॥ २४ ॥**

**अर्थ**— ज्या अर्थी जीवांना संसाराची प्राप्ति झाली असतां मानसिक आणि शारीरिक दुःख होतें, त्या अर्थी संसारदुःखापासून भ्यालेल्या लोकांनीं संसाराकरितां तिन्ही प्रकारांनीं मन, वचन, शरीर ह्यांच्या योगानें निदान करणें चांगलें नाहीं.

**भोगाय मानाय निदानमीशै- ।**

यदप्रशस्तं द्विविधं तदिष्टम् ॥
विमुक्तिलाभप्रतिबन्धहेतोः ।
संसारकान्तारनिपातकारि ॥ २५ ॥

अर्थ—जें मोक्षप्राप्तीच्या प्रतिबंधाकरितां संसाररूपी अरण्यांत जीवाचें पतन करणारें असतें तें अप्रशस्तनिदान होय. तें भोगनिमित्त आणि माननिमित्त असें दोन प्रकारचें आहे, असें जिनेंद्रांनीं मानलें आहे.

ये सन्ति दोषा भुवनान्तराले ।
तानङ्गभाजां वितनोति भोगः ॥
के तेऽपराधा जननिन्दनीया ।
न दुर्जनो चाश्रभसा करोति ॥ २६ ॥

अर्थ— ह्या त्रिभुवनांत जे दोष आहेत ते सर्व दोष भोग हा जीवाला उत्पन्न करतो. ह्मणजे भोग हा जीवाला त्या सर्व दोषांनीं युक्त करतो. दुर्जन सत्वर जे करीत नाहीं असले, लोकनिंद्य असे कोणते बरें अपराध आहेत? सर्व आहेत. तात्पर्य, दुर्जन हा सर्वप्रकारचे निंद्य अपराध करतो. आणि भोगाची इच्छा करणारा हा दुर्जन असल्यानें अर्थातच त्याच्या हातून आपल्या इच्छेच्या तृप्तीकरितां अपराध होणारच.

ये पीडयन्ते परिचर्यमाणा ।
ये मारयन्ते बत पोष्यमाणाः ॥
ते कस्य सौख्याय भवन्ति भोगा ।
जनस्य रोगा इव दुर्निवाराः ॥ २७ ॥

अर्थ— जे सेवन केले असतां पीडा करतात व पोषण केले असतां मारतात, ते भोग दुर्निवार अशा रोगाप्रमाणें असल्यामुळें कोणाला तरी सुख देणारे होतील काय? मुळींच होणार नाहींत.

**निषेव्यमाणो रभसेन मानः ।**
**श्वभ्रालये निक्षिपतेऽतिघोरे ॥ ३४ ॥**

अर्थ—जीवानें मान आनंदानें सेवन केला असतां, तो, सर्वलोकांना पूज्य आणि खऱ्या अशा–लक्ष्मी, क्षमा, कीर्ति, दया आणि पूज्यता–ह्यांचा नाश करून, अत्यंत भयंकर अशा नरकांत त्याला ( मानी जीवाला ) टाकून देतो.

**अनन्तकालं समवाप्य नीचां ।**
**यद्येकदा याति जनोऽयमुच्चाम् ॥**
**तथाप्यनन्ता बत याति जाती- ।**
**रुच्चा गुणः कोऽपि न चात्र तस्य ॥ ३५ ॥**

अर्थ— हा जीव अनंतकालपर्यंत नीच जातीला प्राप्त होऊन जरी एकदा उच्च जातीला प्राप्त झाला, तथापि तो तसाच अनंत उच्चजातींना प्राप्त होतो. परंतु, त्याचा त्या जातींत कोणताही गुण असत नाहीं. अरेरे! ह्मणजे जीवाला उच्च जाति मिळावी असें वाटतें पण ती अनेक वेळां प्राप्त झाली असतांही त्याच्या-मध्यें कांहीं गुण येत नाहीं.

**उच्चासु नीचासु च हन्त जन्तो- ।**
**र्लब्धासु नो योनिषु वृद्धिहानी ॥**
**उच्चो न नीचोऽहमपास्तबुद्धिः ।**
**स मन्यते मानपिशाचवश्यः ॥ ३६ ॥**

अर्थ— जीवाला उच्च किंवा नीच योनि प्राप्त झाल्या असतां त्याची वृद्धि होत नाहीं व हानीही होत नाहीं. फक्त तो जीव मानरूपी पिशाचानें ग्रासलेला व निर्बुद्ध झालेला असा होत्साता " मी उच्च आहे, नीच नाहीं " असें मानीत असतो. ही मोठी खेदाची गोष्ट आहे.

उच्चोऽपि नीचं स्वमवेक्ष्यमाणो ।
नीचस्य दुःखं न किमेति घोरम् ॥
नीचोऽपि वा पश्यति यः स्वमुच्चं ।
स सौख्यमुच्चस्य न किं प्रयाति ॥ ३७ ॥

अर्थ— उच्चजातींतील जीव सुद्धां आपण नीच आहोंत असें मानूं लागला ह्मणजे नीचजातींतील जीवाला होत असलेलें भयंकर दुःख भोगीत नाहीं काय? तसेंच नीच जातींतील जो पुरुष आपल्याला " उच्च आहों " असें मानतो तो उच्च-जातीच्या मनुष्याच्या सुखाला प्राप्त होत नाहीं काय? कारण,

उच्चत्वनीचत्वविकल्प एष ।
विकल्प्यमानः सुखदुःखकारी ॥
उच्चत्वनीचत्वमयी न योनि- ।
र्ददाति दुःखानि सुखानि जातु ॥ ३८ ॥

अर्थ— उच्चत्व आणि नीचत्व ही नुसती कल्पना आहे. ती केली असतां सुख दुःख देते. वास्तविक उच्चयोनि आणि निचयोनी ही सुख किंवा दुःख केव्हांही देत नाहीं.

हिनस्ति धर्मं लभते न सौख्यं ।
कुबुद्धिरुच्चत्वनिदानकारी ॥
उपैति कष्टं सिकतानिपीडी ।
फलं न किंचिज्जननिन्दनीयः ॥ ३९ ॥

अर्थ— उच्चत्वाचें निदान करणारा कुबुद्धि जीव धर्माची हानि करितो ह्मणजे धर्माचरण करीत नाहीं. त्यामुळें त्याला सुख प्राप्त होत नाहीं. योग्यच आहे. कारण, वाळू घाण्यांत घालून चिरडणारा मूर्ख मनुष्य फक्त त्या चिरडण्याचें कष्ट मात्र भोगतो. त्याला फल कांहींच येत नाहीं, तो लोकनिंदेस मात्र पात्र होतो.

**यशांसि नश्यन्ति समानवृत्ते- ।**
**र्गदातुरस्येव सुखानि सद्यः ॥**
**विवर्धते तस्य जनापवादो ।**
**विषाकुलस्येव मनोविमोहः ॥ ४० ॥**

अर्थ— ज्याचें आचरण मानकषायानें युक्त असें असतें त्याची कीर्ति- ज्याप्रमाणें रोगी लोकांचीं तोंडें बिघडतात त्याप्रमाणें- तत्काल बिघडते; आणि ज्याप्रमाणें विषानें व्याप्त झालेल्या मनुष्याची बेशुद्धि वाढते त्याप्रमाणें त्याचा लोकापवाद वाढतो. ह्मणजे पुष्कळ लोक त्याची निंदा करूं लागतात.

**हुताशनेनेव तुषारराशि- ।**
**र्विनाश्यतेऽलं विनयो मदेन ॥**
**नैवानुरागं विनयेन हीने ।**
**लोकेऽशमेनेव चरित्रमेति ॥ ४१ ॥**

अर्थ— जसा अग्नीच्या योगानें बर्फाचा पर्वत नाश पावतो, त्याप्रमाणें मदाच्या योगानें विनय अगदींच नष्ट केला जातो. आणि ज्याप्रमाणें अशांतीमुळें चारित्राची प्राप्ति होत नाहीं, त्याप्रमाणें मनुष्य विनयरहित झाला असतां तो लोकांच्या प्रेमाला पात्र होत नाहीं.

**पूता गुणा गर्ववतः समस्ता ।**
**भवन्ति वन्ध्या यमसंयमाद्याः ॥**
**प्ररूप्यमाणा विधिना विचित्राः ।**
**किमूषरे भूमिरुहाः फलन्ति ॥ ४२ ॥**

अर्थ— गर्विष्ठ मनुष्याचे यमसंयमादिक ( यम ह्मणजे मरणावधि पाळिलीं जाणारीं व्रतें आणि संयम ह्मणजे इंद्रियनिग्रह ) पवित्र सर्व गुण निष्फल होतात. कारण, खाऱ्या मातींत अनेक प्रकारचीं

झाडें लावावयाच्या पद्धतिप्रमाणें जरी लाविलीं तरी तीं फलयुक्त होतात काय?

न जातु मानेन निदानमित्थं ।
करोति दोषं परिचिन्त्य चित्रम् ॥
प्राणापहारं न विलोक्यमानो ।
विषेण तृप्तिं वितनोति कोऽपि ॥ ४३ ॥

अर्थ— मानाच्या योगानें ह्याप्रमाणें होत असलेला विचित्र दोष मनांत आणून शहाणा मनुष्य केव्हांही निदान करीत नाहीं. प्राणाचा नाश होत असलेला पाहून कोणीही मनुष्य विषाच्या योगानें आपली तृप्ति करून घेत नाहीं. ह्मणजे भूक लागली असतां विष कोणीही खात नाहीं.

यो घातकत्वादिनिदानमज्ञः ।
करोति कृत्वाऽऽचरणं विचित्रम् ॥
ह्री वर्धयित्वा फलदानदक्षं ।
स नन्दनं भस्मयते वराकः ॥ ४४ ॥

अर्थ— अनेकप्रकारचें चारित्र पाळून जो मूर्ख मनुष्य हिंसादिकांचें निदान करतो, तो विचारा फल देण्यास समर्थ अशा नंदनवनाला वाढवून जाळून टाकितो. ह्मणजे मारतो. अरेरे! फार वाईट!!

यः संयमं दुष्करमाददानो ।
भोगादिकांक्षां विदधाति मूढः ॥
कण्ठे शिलामेष निधाय गुर्वीं ।
विगाहते तोयमनल्पमध्यम् ॥ ४५ ॥

अर्थ— जो मूर्ख मनुष्य उत्तम संयम धारण करीत असून भोगादिकांची इच्छा करतो, तो गळ्यांत मोठी शिला बांधून

मध्यभागीं खोल असलेल्या पाण्यांत शिरतो!

त्रिधाऽविधेयं सनिदानमित्थं ।
विज्ञाय दोषं चरणं चरद्भिः ॥
अपथ्यसेवां चरयन्ति सन्तो ।
विज्ञातदोषा न कृतौषधेच्छाः ॥ ४६ ॥

अर्थ— चारित्र पाळणाऱ्या श्रावकांनीं वर सांगितल्याप्रमाणें दोष मनांत आणून निदानयुक्त असें चारित्र मन, वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें आचरूं नये. कारण, औषधाची इच्छा करणारे विचारी लोक दोष समजल्यावर अपथ्य करीत नाहींत.

आयासविश्वासनिरासशोक- ।
द्वेषावसादश्रमवैरभेदाः ॥
भवन्ति यस्यामवनाविवागाः ।
सा कस्य माया न करोति कष्टम् ॥ ४७ ॥

अर्थ— पृथ्वीवर ज्याप्रमाणें वृक्ष उत्पन्न होतात; त्याप्रमाणें जिच्याठिकाणीं शरीराला श्रम, विश्वासघात, दुःख, क्रोध, कृशपणा, मानसिक श्रम, वैर हे उत्पन्न होतात, ती माया (कपट) कोणाला बरें त्रास देत नाहीं?

स्वल्पाऽपि सर्वाणि निषेव्यमाणा ।
सत्त्वानि माया क्षणतः क्षिणोति ॥
नाल्पा शिखा किं दहतीन्धनानि ।
प्रवेशिता चित्ररुचोऽश्रितानि ॥ ४८ ॥

अर्थ— माया ही थोडीशी जरी सेवन केली म्हणजे उपयोगांत आणली तरी ती एका क्षणांत सर्व जीवांचा नाश करते. ह्यांत आश्चर्य काय? कारण, अग्नीची अल्प अशी ज्वाला शिरली

असतां एके ठिकाणी रचलेली सर्व लांकडें जाळून टाकीत नाहीं काय?

**निकर्तितुं वृत्तवनं कुठारी।**
**संसारवृक्षं सवितुं धरित्री॥**
**बोधप्रभां ध्वंसयितुं त्रियामा।**
**माया विवर्ज्या कुशलेन दूरम्॥ ४९॥**

अर्थ— चारित्ररूपी अरण्य तोडावयाकरितां कुऱ्हाड, संसाररूपी वृक्ष उत्पन्न करण्यास भूमी, ज्ञानरूपी प्रकाशाचा नाश करण्यास रात्रच कीं काय! अशी ही माया शहाण्या मनुष्यानें दूर वर्ज्य करावी.

**हिनस्ति मैत्रीं वितनोत्यमैत्रीं।**
**तनोति पापं विधुनोति धर्मम्।**
**पुष्णाति दुःखं विधुनोति सौख्यं॥**
**न वञ्चना किं कुरुते विनिन्द्यम्॥ ५०॥**

अर्थ— माया ही मैत्रीचा नाश करून शत्रुत्व वाढविते, पाप उत्पन्न करून धर्मास हांकून देते; आणि दुःख वाढवून सुख दूर घालविते. एकंदरींत माया ही निंद्य असें काय बरें करीत नाहीं?

**न बुध्यते तत्त्वमतत्त्वमङ्गी।**
**विमोह्यमानो रभसेन येन॥**
**त्यजन्ति मिथ्यात्वविषं पटिष्ठाः।**
**सदा त्रिभेदं बहुदुःखदायि॥ ५१॥**

अर्थ— ज्यानें त्वरेनें मोहित केलेला जीव तत्त्व कोणतें आणि अतत्त्व कोणतें, हें जाणत नाहीं, तें पुष्कळ दुःख देणारें आणि तीन प्रकारचें असें मिथ्यात्वरूपी विष शहाणे लोक सर्वदा टाकून देतात.

वदन्ति केचित्सुखदुःखहेतु- ।
न विद्यते कर्म शरीरभाजाम् ॥
मानस्य तस्मिन्निखिलस्य हाने- ।
र्मानव्यपेतस्य न चास्ति सिद्धिः ॥ ५२ ॥

अर्थ— शरीरधारी असा जो जीव त्याच्या सुखदुःखाला कारणीभूत असें कर्म नाहीं, असें कित्येक ह्मणतात. ह्याचें कारण ते असें सांगतात कीं जितकीं प्रमाणें आहेत त्या सर्वांची त्या कर्माच्या ठिकाणीं हानि होते. ह्मणजे कर्म आहे असें कोणत्याच प्रमाणानें ठरत नाहीं ह्मणून ज्याला प्रमाण नाहीं तें सिद्ध होत नाहीं.

सत्त्वेऽपि कर्तुं न सुखादिकार्यं ।
तस्यास्ति शक्तिर्गतचेतनत्वात् ॥
प्रवर्तमानाः स्वयमेव दृष्टा ।
विचेतना क्वापि मया न कार्ये ॥ ५३ ॥

अर्थ— आणखी ते ह्मणतात कीं, जरी कर्म असलें तथापि तें अचेतन असल्यामुळें सुखादि कार्य उत्पन्न करण्याची त्याची शक्ति नाहीं. कारण, अचेतन पदार्थ आपोआप कार्य करण्याविषयीं प्रवृत्त झालेले आह्मी कोठेंच पाहिलेले नाहींत.

एषा महामोहपिशाचवश्यै- ।
र्न युज्यते गीरभिधीयमाना ॥
प्रमाणमस्माकमबाध्यमानं ।
यतोऽस्य सिद्धावनुमानमस्ति ॥ ५४ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें महामोहरूपी पिशाचानें ग्रासलेल्या लोकांचें हें भाषण बरोबर नाहीं. कारण, कर्माच्या सिद्धीविषयीं अबाधित असें आमचें अनुमान प्रमाण आहे.

रागरोषमदमत्सरशोक-।
क्रोधलोभभयमन्मथमोहाः॥
सर्वजन्तुनिवहैरनुभूताः।
कर्मणा किमु भवन्ति विनैते॥ ५५॥

अर्थ— राग, द्वेष, मद, मत्सर, शोक, क्रोध, लोभ, भय, मदनविकार आणि मोह हे सर्वजीवांनीं अनुभवले जाणारे विकार कर्मांवांचूनच होतात काय? तात्पर्य— हे वर सांगितलेल्या विकारावरून कर्मांचें अनुमान करता येतें.

ते जीवजन्याः प्रभवन्ति नूनं।
नैषाऽपि भाषा खलु युक्तियुक्ता॥
नित्यप्रसक्तिः कथमन्यथैषां।
सम्पद्यमाना प्रतिषेधनीया॥ ५६॥

अर्थ— आतां "ते वर सांगितलेले विकार जीवापासूनच उत्पन्न होतात" असें कित्येक ह्मणतात; परंतु त्यांचें हें ह्मणणें युक्तीला जुळत नाहीं. कारण, जर हे वरील विकार कर्मापासून होत नसून जीवापासूनच उत्पन्न होतात असें ह्मटलें, तर ते नेहमींच उत्पन्न होतील. कारण, केव्हांही जीव आहेच. ह्याप्रमाणें त्यांच्या निरंतर उत्पत्तीचें निवारण व्हावयाचें नाहीं. तात्पर्य— मुक्तजीवही जीवच असल्यानें त्याच्यापासूनही हे विकार उत्पन्न होतात असें ह्मणावें लागेल.

नित्ये जीवे सर्वदा विद्यमाने।
कादाचित्का हेतुना केन सन्ति॥
निर्मुक्तानां जायमाना निषेद्धुं।
ते शक्यन्ते केन मुक्तिश्च तेभ्यः॥ ५७॥

अर्थ— हे विकार जीवापासूनच उत्पन्न होतात असें जर

म्हटलें तर, जीव हा नित्य असल्यानें सर्वदा विद्यमान असतां, हे विकार केव्हांतरी उत्पन्न होतात, सर्वदा होत नाहींत; असें कोणत्या कारणामुळें होतें? मुक्त झालेल्या जीवांना ते कोणत्या कारणामुळें उत्पन्न होऊं न देणें शक्य आहे? आणि त्या विकारापासून जीवाची मुक्ति कोणत्या कारणामुळें होते? असे अनेक प्रश्न उद्भवतात.

तुल्यप्रतापोद्यमसाहसानां ।
केचिल्लभन्ते निजकार्यसिद्धिम् ॥
परे न तामत्र निगद्यतां मे ।
कर्माणि हित्वा यदि कोऽपि हेतुः ॥ ५८ ॥

अर्थ— पराक्रम, उद्योग आणि साहस हीं ज्यांचीं सारखीं आहेत अशा लोकांतील कित्येकांना कार्यसिद्धि होते; आणि बाकीच्यांना होत नाहीं; ह्याविषयीं कर्माला सोडून दुसरें जर कोणतें कारण असेल तर मला सांगा.

विचित्रदेहाकृतिवर्णगन्ध- ।
प्रभावजातिप्रभवस्वभावाः ॥
केन क्रियन्ते भुवनेऽङ्गिवर्गा- ।
श्चिरन्तनं कर्म निरस्य चित्राः ॥ ५९ ॥

अर्थ— देहाची आकृति, रंग, गंध, पराक्रम, जाति, उत्पत्ति आणि स्वभाव हे ज्यांचे निरनिराळ्या तऱ्हेचे आहेत असे अनेक प्रकारचे जीव ह्या जगांत पूर्वजन्मांत संपादन केलेल्या कर्माला सोडून दुसऱ्या कोणत्या कारणानें बरे होतात?

विवर्ध्य मासान्नव गर्भमध्ये ।
बहुप्रकारैः कलिलादिभावैः ॥
उद्वर्त्य निष्कासयते सवित्र्याः ।

को गर्भतः कर्म विहाय पूर्वम् ॥ ६० ॥

अर्थ— मातेच्या गर्भामध्यें अनेक प्रकारांनीं कलिल (मांसाचा गोळा) वगैरे अनेक अवस्थांनीं जीवाला नऊ महिनेपर्यंत वाढवून, त्याला पूर्वकर्म सोडून दुसरें कोण कर्म आईच्या गर्भांतून फिरवून बाहेर काढतें?

विलोकमानाः स्वयमेव शक्तिं ।
विकारहेतुं विषमध्यजाताम् ॥
अचेतनं कर्म करोति कार्यं ।
कथं वहेतेति कथं विदग्धाः ॥ ६१ ॥

अर्थ— विषामध्यें उत्पन्न झालेली मोहभ्रमादि विकाराला कारणीभूत असलेली शक्ति स्वतःच पाहून "अचेतन असलेलें कर्म कोणतेंही कार्य कसें बरें करील?" अशी शंका विद्वान् लोक कशी बरें करतील?

नानाप्रकारा भुवि वृक्षजाति- ।
र्विधूय पत्राणि पुरातनानि ॥
अचेतनः किं न करोति कालः ।
प्रत्यग्रपुष्पप्रसवादिरम्या ॥ ६२ ॥

अर्थ— अचेतन असा काल भूमीवर असलेल्या अनेकप्रकारच्या वृक्षांना त्यांचीं जुनीं पानें घालवून देऊन नवीन पुष्पें आणि फलें ह्यांच्या योगानें रमणीय करीत नाहीं काय?

यैर्निःशेषं चेतनामुक्तमुक्तं ।
कार्याकारि ध्वस्तकार्यावबोधैः ॥
धर्माधर्माकाशकालादि सर्वं ।
द्रव्यं तेषां निष्फलत्वं प्रयाति ॥ ६३ ॥

अर्थ— ज्यांना कार्याचें ज्ञान नाहीं अशा ज्या लोकांनीं

चेतन वस्तु सोडून बाकी कोणतीही वस्तु कार्य उत्पन्न करण्याला समर्थ नाहीं असें म्हटलें आहे, त्यांच्या मतानें धर्म, अधर्म, आकाश, काल वगैरे सर्व द्रव्यें निष्फल होतात. हीं सर्वद्रव्यें अचेतन असल्यानें कोणतेंही कार्य करण्याला समर्थ नाहींत असें ठरतें.

जीवैरमूर्तैः सह कर्म मूर्तं ।
सम्बध्यते नेति वचो न वाच्यम् ॥
अनादिभूतं हि जिनेन्द्रचन्द्राः ।
कर्माङ्गिसम्बद्धमुदाहरन्ति ॥ ६४ ॥

अर्थ— अमूर्त अशा जीवांशीं मूर्त असलेलें कर्म कसें संबंध पावतें? असें म्हणूं नये. कारण, श्रीजिनेंद्रांनीं कर्म हें अनादि काळापासून जीवांशीं संबंध पावलेलें असें आहे असें सांगितलें आहे.

इत्यादि मिथ्यात्वमनेकभेदं ।
यथार्थतत्त्वप्रतिपत्तिसूदि ॥
विवर्जनीयं त्रिविधेन सद्भि- ।
र्जैनं व्रतं रत्नमिवाश्रयाद्भिः ॥ ६५ ॥

अर्थ— असें अनेकप्रकारचें मिथ्यात्व खऱ्या तत्त्वांच्या ज्ञानाचा नाश करणारें आहे. म्हणून श्रीजिनांनीं सांगितलेल्या व्रताचा रत्नाप्रमाणें आश्रय करणाऱ्या भव्य श्रावकांनीं मन, वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें मिथ्यात्वाचा त्याग करावा.

उपासकाचाराचे ११ भेद.

एकादशोक्ता विदितार्थतत्त्वै- ।
रुपासकाचारविधेर्विभेदाः ॥
पवित्रमारोढुमनस्यलभ्यं ।
सोपानमार्गा इव सिद्धिसौधम् ॥ ६६ ॥

अर्थ— ह्या उपासकाचाराचे अकरा भेद तत्वज्ञांनीं सांगितले आहेत. ते पवित्र आणि दुर्लभ अशा मोक्षरूपी प्रासादावर चढण्याची इच्छा जीवाला झाली असतां जिन्याच्या मार्गाप्रमाणें आहेत. ह्या अकरा भेदांना एकादश प्रतिमा ( अकरा प्रतिमा ) असें ह्मणतात.

दर्शनिक.

यो निर्मलां दृष्टिमनन्यचित्तः ।
पवित्रवृत्तामिव हारयष्टिम् ॥
गुणावनद्धां हृदये निधत्ते ।
स दर्शनी धन्यतमोऽभ्यधायि ॥ ६७ ॥

अर्थ— मन एकाग्र करणारा असा जो श्रावक पवित्राचारानें व श्रावकाच्या मूलगुणांनीं युक्त असें सम्यग्दर्शन हाराप्रमाणें हृदयाचे ठिकाणीं धारण करतो तो अत्यंत धन्य असा दर्शनी ( पहिली दर्शनप्रतिमा धारण करणारा ) श्रावक होय; असें जिनांनीं प्रतिपादिलें आहे.

व्रतिक.

विभूषणानी व दधाति धीरो ।
व्रतानि यः सर्वसुखाकराणि ॥
आकृष्टुमीशानि पवित्रलक्ष्मीं ।
तं वर्णयन्ते व्रतिनं पटिष्ठाः ॥ ६८ ॥

अर्थ— सर्वसुखांच्या खाणी आणि पवित्र अशा मोक्षलक्ष्मीचें आकर्षण करण्याला समर्थ अशीं व्रतें जो धीर असा श्रावक अलंकाराप्रमाणें धारण करतो, त्याला ज्ञानी लोक व्रती श्रावक ह्म० दुसऱ्या व्रतप्रतिमेला धारण करणारा श्रावक असें ह्मणतात.

सामयिक.

रौद्रार्थमुक्तो भवदुःखमोची ।

**निरस्तनिःशेषकषायदोषः ॥**
**सामायिकं यः कुरुते त्रिकालं ।**
**सामायिकस्थः कथितः स तथ्यम् ॥ ६९ ॥**

**अर्थ**— रौद्रध्यानाचा त्याग करून संसारदुःखांचाही त्याग करणारा आणि ज्यानें संपूर्ण कषाय दोष टाकून दिले आहेत. असा जो श्रावक त्रिकाल सामायिकविधि करतो तो सामायिकस्थ (तिसरी सामायिक प्रतिमा धारण करणारा) होय; असें वास्तविक निरूपिलें आहे.

प्रोषधोपवासी

**मन्दीकृताक्षार्थसुखाभिलाषः ।**
**करोति यः पर्वचतुष्टयेऽपि ॥**
**सदोपवासं परकर्म मुक्त्वा ।**
**स प्रोषधी शुद्धधियामभीष्टः ॥ ७० ॥**

**अर्थ**— इंद्रियांच्या विषयांपासून होणाऱ्या सुखाची इच्छा ज्यानें कमी केली आहे असा जो श्रावक चार पर्वांच्या दिवशीं दुसरें काम सोडून नेहमीं उपवास करतो तो प्रोषध नांवाची चवथी प्रतिमा धारण करणारा होय. तो शुद्ध अंतःकरणांच्या मुनींना फार प्रिय असतो.

सचित्तविरत.

**दयार्द्रचित्तो जिनवाक्यवेदी ।**
**न वल्भते किञ्चन यः सचित्तम् ॥**
**अनन्यसाधारणधर्मपोषी ।**
**सचित्तमोची स कषायमोची ॥ ७१ ॥**

**अर्थ**— जिनेंद्राच्या उपदेशाला जाणणारा व कषायांचा ज्यानें त्याग केला आहे असा, जो असामान्य रीतीनें धर्माचें

पोषण करणारा श्रावक सचित्त वस्तूंचें भक्षण करीत नाहीं; तो सचित्तविरत–ह्मणजे सचित्तविरति नांवाची पांचवी प्रतिमा धारण करणारा–होय.

दिवाब्रह्मचारी.

निषेवते यो दिवसे न नारीं ।
मुग्धामकन्दर्पमदापहारीम् ॥
कटाक्षविक्षेपशरैरविध्दो ।
बुधैर्दिवाब्रह्मचरः स बुध्दः ॥ ७२ ॥

अर्थ— मदनविकारामुळें उत्पन्न झालेला मद हरण करण्याला अशक्य अर्थात् मद वाढविणारी अशी सुंदरी स्त्री जो श्रावक तिच्या वक्रकटाक्षरूपी बाणांनीं न ताडन केलेला असा होत्साता दिवसां उपभोगीत नाहीं, तो दिवाब्रह्मचारी होय. ह्मणजे दिवाब्रह्मचर्य नांवाची प्रतिमा धारण करणारा होय.

ब्रह्मचारी.

यो मन्यमानो गुणरत्नचोरीं ।
विरक्तचित्तस्त्रिविधेन नारीम् ॥
पवित्रचारित्रपदानुसारी ।
स ब्रह्मचारी विषयापहारी ॥ ७३ ॥

अर्थ— जो विरक्त मनाचा व पवित्र आचरण करणाऱ्या मुनींच्या चरणांचें अनुसरण करणारा आणि विषयांचा त्याग करणारा असा श्रावक, स्त्री ही सद्गुणरूपी रत्नांची चोरी करणारी (नाश करणारी) आहे असें मानून तिचा मन, वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें त्याग करतो; तो ब्रह्मचारी ह्मणजे ब्रह्मचर्य नांवाची सातवी प्रतिमा धारण करणारा होय.

आरंभविरत.

**विलोक्य षड्जीवविघातमुच्चै- ।**
**रारम्भमत्यस्यति यो विवेकी ॥**
**आरम्भमुक्तः स मतो मुनीन्द्रै- ।**
**र्वैरागिकः संयमवृक्षसेकी ॥ ७४ ॥**

अर्थ— कृष्यादिकर्मांत सहा प्रकारच्या जीवांचा वध होत असलेला अवलोकन करून जो विचारी श्रावक आरंभांचा (कृष्यादिकर्मांचा) त्याग करतो तो संयमरूपी वृक्षाला वाढविणारा असा विरक्त श्रावक आरंभविरत होय; ह्मणजे आरंभविरति नांवाच्या आठव्या प्रतिमेला धारण करणारा होय; असें मुनींद्रांनीं मानलें आहे.

परिग्रहत्यागी.

**यो रक्षणोपार्जननश्वरत्वै- ।**
**र्ददाति दुःखानि दुरुत्तराणि ॥**
**विमुच्यते येन परिग्रहोऽसौ ।**
**गीतोऽपसङ्गैरपरिग्रहोऽसौ ॥ ७५ ॥**

अर्थ— जो रक्षण, संपादन आणि नश्वरता ह्यांच्या योगानें फार मोठें दुःख देतो त्या परिग्रहाचा ज्यानें त्याग केला असेल, त्याला निर्ग्रंथमुनि परिग्रहविरत ह्मणजे परिग्रहविरति नांवाच्या नवव्या प्रतिमेला धारण करणारा असें ह्मणतात.

अनुमतित्यागी.

**आरम्भसन्दर्भविहीनचेताः ।**
**कार्येषु मारीमिव हिंस्ररूपाम् ॥**
**यो धर्मसक्तोऽनुमतिं न धत्ते ।**
**निगद्यते सोऽननुमन्तृमुख्यः ॥ ७६ ॥**

अर्थ— ज्याचें मन आरंभापासून होणाऱ्या हिंसेनें रहित झालें आहे असा जो धर्मासक्त असलेला श्रावक महामारीप्रमाणें हिंसक रूप धारण करणाऱ्या अनुमतीचा आश्रय करीत नाहीं ह्मणजे दुसऱ्याला आरंभापासून होणाऱ्या हिंसेविषयीं संमति देत नाहीं; तो अनुमतिविरत ह्मणजे अनुमतिविरति नांवाच्या दहाव्या प्रतिमेला धारण करणारा होय.

उद्दिष्टत्यागी.

यो बन्धुराबन्धुरतुल्यचित्तो ।
गृह्णाति भोज्यं नवकोटिशुद्धम् ॥
उद्दिष्टवर्जी गुणिभिः स गीतो ।
विभीलुकः संसृतियातुधान्याः ॥ ७७ ॥

अर्थ— ज्याचें मन चांगलें आणि वाईट ह्या दोहींविषयीं सारखें आहे असा जो श्रावक नऊ प्रकारानें शुद्ध अशा प्रकारचें अन्न गृहण करतो तो संसृतिरूपी राक्षसीपासून भिणारा श्रावक उद्दिष्टवर्जी ह्मणजे उद्दिष्टत्याग नांवाच्या अकराव्या प्रतिमेला धारण करणारा होय; असें सम्यग्दर्शनादि गुणांनीं युक्त असलेल्या मुनींनीं सांगितलें आहे.

क्रमेणामूँश्चित्ते निदधति मुदैकादशगुणा- ।
नलं निन्दागर्हानिहितमनसो येऽस्ततमसः ॥
भवान् द्वित्रान् भ्रान्त्वाऽमरमनुजयोर्भूरिमहसो ।
विधूतैनोबन्धाः परमपदमायान्ति सुखदम् ॥ ७८ ॥

अर्थ— जे ज्ञानी श्रावक हे वर सांगितलेले अकरा गुण आनंदानें मनांत धारण करतात ते मोठे भाग्यशाली होऊन देव आणि मनुष्य ह्यांचे दोन तीन भव फिरून पापबंध टाकून देऊन परमपद जो मोक्ष त्याला प्राप्त होतात.

इदं धत्ते भक्त्या गृहिजनहितं योऽत्र चरितं ।
मदक्रोधायासप्रमदमदनारम्भमकरम् ॥
भवाम्भोधिं तीर्त्वा जननमरणावर्तनिचितं ।
व्रजत्येषोऽध्यात्मामितगतिमतं निर्वृतिपदम् ॥ ७९

अर्थ— ह्याप्रमाणें गृहस्थाला हितकारक असा व मद, क्रोध, मनाची ग्लानि, मोह, मदनविकार आणि आरंभ ह्यांना सुसरीप्रमाणें ग्रासून टाकणारा असा मार्गें सांगितलेला श्रावकाचार ह्या जगांत जो श्रावक भक्तीनें मनांत वागवितो तो जनन-मरणरूपी अनेक भोंवऱ्यांनीं भरलेल्या ह्या संसारसमुद्राला तरून अमितगति आचार्यांना मान्य असलेल्या आणि आत्मस्वरूप अशा मोक्षपदाला जातो.

इत्यमितगत्याचार्यकृतश्रावकाचारे

सप्तमः परिच्छेदः

---

श्रीवीतरागाय नमः

# अष्टमः परिच्छेदः

जिनं प्रणम्य सार्वीयं सर्वज्ञं सर्वतोमुखम् ॥
आवश्यकं मया षोढा संक्षेपेण निगद्यते ॥ १ ॥

अर्थ— सर्वजीवांचें कल्याण करणारा, सर्वज्ञ आणि सर्वतोमुख ह्मणजे चोहीकडे ज्याला मुखें आहेत अर्थात् सर्व दिशांना असलेल्या जीवांना जो एकदम उपदेश करतो अथवा सर्वदर्शी अशा श्रीजिनाला नमस्कार करून मी सहा आवश्यकें (अवश्य करावयाचीं कर्में) संक्षेपानें सांगतों.

आगमोऽनन्तपर्यायो मतो जैनो व्यवस्थितः ॥
अभिधातुं ततः केन विस्तरेण न शक्यते ॥ २ ॥

अर्थ— जिनांनीं उपदेशिलेला आगम ज्याचे अनंत भेद आहेत असा आहे. ह्मणून कोणीही तो विस्तारानें सांगणें शक्य नाहीं.

मत्तोऽपि सन्ति ये बालाश्चित्राकारेषु जन्तुषु ॥
अस्यावबोधतस्तेषामुपकारो भविष्यति ॥ ३ ॥

अर्थ— ह्या अनेक प्रकारच्या जीवसमूहांत जे जीव माझ्यापेक्षां अज्ञान असतील; त्यांना, मीं केलेलें हें शास्त्र समजल्यानें उपयोग होईल.

आवश्यकं न कर्तव्यं नैष्फल्यादित्यसाम्प्रतम् ॥
प्रशस्ताध्यवसायस्य फलस्यात्रोपलब्धितः ॥ ४ ॥

अर्थ— आवश्यक कर्में हीं निष्फल असल्यानें करण्याचें कारण नाहीं; असें ह्मणणें अयोग्य आहे. कारण, प्रशस्त

परिणाम (आत्म्याची अहिंसा वगैरे विषयीं प्रवृत्ति) हें त्यांचें फल ह्या जगांतच आपल्याला प्राप्त होत असतें. ह्मणून तीं आवश्यककर्में निष्फल नसल्यानें केलींच पाहिजेत.

प्रशस्ताध्यवसायेन संचितं कर्म नाश्यते ॥
काष्ठं काष्ठान्तकेनेव दीप्यमानेन निश्चितम् ॥ ५ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें प्रज्वलित अग्नीनें काष्ठ जळून जातें, त्याप्रमाणें आत्म्याचा प्रशस्तपरिणाम होऊं लागल्यानें संचित झालेलें कर्म नाश पावतें. हें अगदीं निश्चयानें सांगतों.

जायते न स सर्वत्र न वाच्यमिति कोविदैः ॥
स्फुटं सम्यक्कृते तत्र तस्य सर्वत्र सम्भवात् ॥६॥

अर्थ— तो प्रशस्तपरिणाम सर्व आत्म्यांच्या ठिकाणीं होतोच असें नाहीं, असें ज्ञात्यांनीं ह्मणूं नये. कारण, आवश्यककर्में चांगल्या प्रकारें केलीं असतां त्या प्रशस्तपरिणामाची उत्पत्ति संपूर्ण आत्म्यांच्या ठिकाणीं होते हें स्पष्ट आहे.

न सम्यक्करणं तस्य जायते ज्ञानतो विना ॥
शास्त्रतो न विना ज्ञानं शास्त्रं तेनाभिधीयते ॥७॥

अर्थ— तीं आवश्यक कर्में ज्ञान असल्यावांचून चांगल्या प्रकारें करतां यावयाचीं नाहींत; आणि ज्ञान शास्त्रावांचून व्हावयाचें नाहीं; ह्मणून तें शास्त्र सांगतों.

लाभपूजायशोऽर्थित्वैस्तस्य सम्यक्कृतावपि ॥
प्रशस्ताध्यवसायस्य सम्भवो नोपलभ्यते ॥ ८ ॥

अर्थ— कांहींतरी लाभ, मोठेपणा किंवा कीर्ति ह्यांच्या इच्छेनें तीं कर्में जरी चांगल्या प्रकारें केलीं तथापि प्रशस्तपरिणाम उत्पन्न झालेला कोठेंच उपलब्ध होत नाहीं.

तद्युक्तं यतो नेदं सम्यक्करणमुच्यते ॥

अत एवात्र मृग्यन्ते सम्यक्कृत्यधिकारिणः ॥ ९ ॥

अर्थ— लाभपूजादिकाच्या इच्छेनें आवश्यकक्रिया करणें हें योग्य नाहीं. कारण, या करण्याला चांगलें ह्मटलें जात नाहीं. ह्मणून या क्रियेचे अधिकारी कोण याचा येथें शोध करूं. ह्मणजे आवश्यकक्रिया करण्यास योग्य कोण हें येथें सांगतों.

संसारदेहभोगानां योऽसारत्वमवेक्षते ॥
कषायेन्द्रिययोगानां जयनिग्रहरोधकृत् ॥ १० ॥
अनेकयोनिपाताले विचित्रगतिपत्तने ॥
जन्ममृत्युजरावर्ते भूरिकल्मषपाथसि ॥ ११ ॥
संसारसागरे भीमे दुःखकल्लोलसङ्कुले ॥
रागद्वेषमहानक्ररौद्रव्याधिझषाकुले ॥ १२ ॥
चिरं बम्भ्रम्यमाणानां जिनेन्द्रपदवन्दना ॥
दुरापा जायतेऽत्यन्तमिति यो हृदि मन्यते ॥ १३ ॥
अनर्थकारिणः कान्ताजननीजनकादयः ॥
स्वस्योपकारिणो येन बुध्यन्ते परमेष्ठिनः ॥ १४ ॥
सर्वाणि गृहकार्याणि परकार्याणि पश्यति ॥
शुद्धधीर्धर्मकार्याणि निजकार्याणि यः सदा ॥ १५ ॥
यौवनं जीवितं धिष्ण्यमैश्वर्यं जनपूजितम् ॥
नश्वरं वीक्षते सर्वं शरदभ्रमिवानिशम् ॥ १६ ॥
दर्शनज्ञानचारित्रत्रितयं भवकानने ॥
जानीते दुर्लभं भूयो भ्रष्टं रत्नमिवाम्बुधौ ॥ १७ ॥
मयूरस्येव मेघौघे वियुक्तस्येव बान्धवे ॥
तृष्णार्तस्येव पानीये विबद्धस्येव मोक्षणे ॥ १८ ॥
सव्याधेरिव कल्पत्वे विदृष्टेरिव लोचने ॥
जायते यस्य सन्तोषो जिनवक्त्रविलोकने ॥ १९ ॥

**परीषहसहः शान्तो जिनसूत्रविशारदः ॥**
**सम्यग्दृष्टिरनाविष्टो गुरुभक्तः प्रियंवदः ॥ २० ॥**
**आवश्यकमिदं धीरः सर्वकर्मविषूदनम् ॥**
**सम्यक्तुमसौ योग्यो नापरस्यास्ति योग्यता ॥ २१**

अर्थ— संसार, शरीर आणि भोग ह्यांना जो असार मानतो; जो कषायांचा जय, इंद्रियांचा निग्रह आणि योगांचा निरोध करतो; आणि अनेक योनी ह्या ज्याचा तळ आहे, अनेक गति ह्याच ज्यांत असलेलें नगर (बेट) आहे, जन्म, मृत्यु आणि वृद्धपणा हे ज्यांत भोंवरे आहेत, पुष्कळ पातक हें ज्यांत पाणी आहे, जो अनेक दुःखें ह्याच ज्या मोठमोठ्या लाटा त्यांनीं व्याप्त झाला आहे, रागद्वेष हे सुसर आणि भयंकरव्याधि हे मासे ह्यांनीं जो गजबजलेला आहे अशा ह्या भयंकर असलेल्या संसाररूपी समुद्रांत चिरकाल फिरत असलेल्या जीवांना जिनचरणाचें वंदन फारच दुष्प्राप्य आहे असें जो आपल्या मनांत समजत आहे; आणि स्त्री माता पिता वगैरे सर्व आप्त इष्ट हे अनर्थ करणारे असून भगवान परमेष्ठी हेच आपल्यावर उपकार करणारे आहेत असें जो समजतो; जो घरांतील सर्व कृत्यें दुसऱ्याचीं आहेत आणि धर्मकृत्यें तेवढीं माझीं आहेत असें शुद्धमनानें नेहमीं मानतो; तारुण्य, जीवित, गृह, ऐश्वर्य, लोकांत प्रतिष्ठा ह्या सर्व गोष्टी जो शरदृतूंतील मेघाप्रमाणें क्षणिक समजतो; दर्शन ज्ञान चारित्र हें रत्नत्रय समुद्रांत पडलेल्या रत्नाप्रमाणें ह्या संसाररूपी अरण्यांत अत्यंत दुर्लभ आहे असें जो वारंवार समजतो; ज्याप्रमाणें मोराला मेघ पाहिले असतां, विरही मनुष्याला आपले इष्टमित्र दिसले असतां, तान्हेल्याला पाणी मिळालें असतां, बंधांत पडलेल्याला सुटका झाली असतां,

रोगी मनुष्याला सामर्थ्य आलें असतां, अंधळयाला डोळे आले असतां आनंद होतो, त्याप्रमाणें श्रीजिनेंद्राचें मुखावलोकन केलें असतां ज्याला आनंद होतो; जो परीषह सोसून शांत असतो; जिनांनीं उपदेशिलेल्या सूत्रग्रंथांत प्रवीण असून जो सम्यग्दृष्टि असतो; ज्याच्या मनांत दुष्कल्पनांचा प्रवेश झालेला नाहीं; जो गुरूवर भक्ति करणारा असून मधुर बोलतो असा जो धीरमनाचा श्रावक असेल; तो सर्वकर्मांचा नाश करणारीं हीं आवश्यककर्में यथाविधि ( चांगल्या प्रकारें ) करण्याला योग्य होय. दुसऱ्या कोणालाही तीं कर्में यथाविधि करण्याची योग्यता नाहीं.

औचित्यवेदकः श्राद्धो विधानकरणोद्यतः ॥
कर्मनिर्जरणाकांक्षी स्ववशीकृतमानसः ॥ २२ ॥
भाक्तिको बुद्धिमानर्थी बहुमानपरायणः ॥
पठने श्रवणे योग्यो विनयोद्यमभूषितः ॥ २३ ॥

अर्थ— आवश्यकक्रियेला उचित काल वगैरे जाणणारा, जिनधर्मावर श्रद्धान करणारा, आवश्यक क्रिया करण्याविषयीं उद्युक्त असलेला कर्मांची निर्जरा करण्याची इच्छा करणारा, मन आपल्या ताब्यांत ठेवणारा, भक्तिमान असून बुद्धिमान् असणारा मोक्षाची इच्छा करणारा, शास्त्र गुरु ह्यांचा बहुमान करणारा, शास्त्राचें श्रवण आणि पठन करण्याला योग्य आणि विनय व उद्योग ह्यांनीं भूषित असा जो असेल; तो हीं कर्में करण्याला योग्य समजावा.

गुणाय जायते शान्ते जिनेन्द्रवचनामृतम् ॥
उपशान्तज्वरे पूतं भैषज्यमिव योजितम् ॥ २४ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें ज्वर शांत झाल्यावर योजिलेलें शुद्ध

औषध गुण देणारें ह्मणजे पुष्टि कांति वगैरे वाढविणारें होतें, त्याप्रमाणें शांति असली ह्मणजे जिनेंद्रवचनरूपी अमृत गुण देणारें ( कर्मांची निर्जरा करणारें ) होतें.

अयोग्यस्य वचो जैनं जायतेऽनर्थहेतवे ॥
यतस्ततः प्रयत्नेन मृग्यो योग्यो मनीषिभिः ॥२५॥

अर्थ— ज्या अर्थी जिनवचन हें अयोग्य मनुष्याला अनर्थकारक होतें त्या अर्थी विद्वान् लोकांनीं जिनवचन श्रवण करण्याला योग्य मनुष्य प्रयत्नानें शोधून काढला पाहिजे.

कषायाकुलिते व्यर्थं जायते जिनशासनम् ॥
सन्निपातज्वरालीढे दत्तं पथ्यमिवौषधम् ॥ २६ ॥

अर्थ— सन्निपातज्वरानें व्याप्त झालेल्या मनुष्याला चांगलें औषध जरी दिलें तथापि तें जसें व्यर्थ होतें; त्याप्रमाणें रागद्वेषादि कषायांनीं व्याप्त असलेल्या मनुष्याला सांगितलेलें जैनशास्त्र व्यर्थ होतें.

तत्कथाश्रवणानन्दो निन्दाश्रवणवर्जनम् ॥
अलुब्धत्वमनालस्यं निन्द्यकर्मव्यपोहनम् ॥ २७ ॥
कालक्रमाव्युदासित्वमुपशान्तत्वमार्जवम् ॥
विज्ञेयानीति चिन्हानि षडावश्यककारिणः ॥२८॥

अर्थ— आवश्यककर्मांच्या गोष्टी ऐकण्यांत आनंद असणें, निंदा श्रवण करण्याचें वर्ज्य करणें, लोभ नसणें, आळस नसणें, निन्द्यकर्मांचा त्याग करणें, क्रिया करण्यास योग्य असलेल्या कालाची उपेक्षा न करणें, शांति असणें, सरळपणा असणें हीं सर्व आवश्यककर्में करणाऱ्यांचीं चिन्हें जाणावींत.

आवश्यकाचे भेद.

सामायिकं स्तवः प्राज्ञैर्वन्दना सप्रतिक्रिया ॥

प्रत्याख्यानं तनूत्सर्गः षोढाऽवश्यकमीडितम् ॥२९॥

अर्थ— सामायिक, स्तुति, वंदना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान आणि कायोत्सर्ग हीं सहा आवश्यक कर्मे होत असें विद्वानांनीं प्रतिपादन केलें आहे.

द्रव्यतः क्षेत्रतः सम्यक्कालतो भावतो बुधैः ॥
नामतो न्यासतो ज्ञात्वा प्रत्येकं तन्नियुज्यते ॥३०॥

अर्थ— ह्या सहा आवश्यककर्मांपैकीं प्रत्येक कर्म द्रव्य, क्षेत्र, काल, भाव, नाम आणि न्यास ह्यांच्या योगानें समजून विद्वान् त्याचें आचरण करतात.

जीविते मरणे योगे वियोगे विप्रिये प्रिये ॥
शत्रौ मित्रे सुखे दुःखे साम्यं सामायिकं विदुः॥३१॥

अर्थ— जगणें, मरणें, संयोग, वियोग, अप्रिय, प्रिय, शत्रु आणि मित्र, सुख आणि दुःख ह्यांविषयीं समबुद्धि असणें ह्याला सामायिक असें समजतात.

जिनानां जितजेयानामनन्तगुणभागिनाम् ॥
स्तवस्तावींगुणस्तोत्रं नामनिर्वचनं तथा ॥ ३२ ॥

अर्थ— जिंकण्याला योग्य अशा कर्मांचा ज्यानें जय केला आहे आणि जे अनंतगुणांनीं युक्त आहेत अशा जिनांच्या गुणांचें स्तोत्र किंवा त्यांच्या सहस्रनामांचा उच्चार ह्याला स्तव असें ह्मणतात.

कर्मारण्यहुताशानां पञ्चानां परमेष्ठिनाम् ॥
प्रणतिर्वन्दनाऽवादि त्रिशुध्द्या त्रिविधा बुधैः ॥३३

अर्थ— कर्मरूपी अरण्याला अग्नीप्रमाणें भस्म करणाऱ्या पंचपरमेष्ठींना मन वचन काय ह्या तिहींच्या शुद्धीनें नमस्कार करणें ह्याला वन्दना ह्मणतात. ती पंचांगवंदना, अष्टांगवंदना

आणि पश्चवर्धवंदना अशी तीन प्रकारची आहे. असें पंडितांनीं सांगितलें आहे.

द्रव्यक्षेत्रादिसम्पन्नदोषजालविशोधनम् ॥
निन्दागर्हाक्रियालीढं प्रतिक्रमणमुच्यते ॥ ३४ ॥

अर्थ — द्रव्यक्षेत्रादिकांपासून झालेल्या दोषांपासून शुद्धि करणारें व आत्मनिंदा आणि गर्हा ह्या दोन क्रियांनीं युक्त अशी जी क्रिया त्याला प्रतिक्रमण ह्मणतात.

नामादीनामयोग्यानां षण्णां त्रेधा विवर्जनम् ॥
प्रत्याख्यानं समाख्यातमागाम्यागोनिषिद्धये ॥ ३५

अर्थ— अयोग्य अशा पुढें सांगितले जाणाऱ्या नाम वगैरे सहा दोषांचा पुढें होणाऱ्या दोषांपासून शुद्ध होण्याकरितां मन, वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें जो त्याग करणें त्याला प्रत्याख्यान ह्मणतात.

आ[illegible]श्यकेषु सर्वेषु यथाकालमनाकुलः ॥
कायोत्सर्गस्तनूत्सर्गः प्रशस्तध्यानवर्द्धकः ॥ ३६ ॥

अर्थ— सर्व आवश्यककर्मांत योग्यकालीं आकुलता सोडून देहाचा उत्सर्ग करणें (देहाविषयीं ममत्व सोडणें) ह्याला कायोत्सर्ग ह्मणतात. हा प्रशस्तध्यानाला वाढविणारा आहे.

ज्ञेयास्तत्रासनं स्थानं कालो मुद्रा तनूत्सृतिः ॥
नामावर्तप्रमा जोषाः षडावश्यककारिभिः ॥ ३७ ॥

अर्थ— सहाही प्रकारचीं आवश्यक कर्में करणाऱ्यांनीं त्या कर्मांमध्यें आसन, स्थान, काल, मुद्रा, कायोत्सर्ग आणि नामावर्तप्रमा हे सहा दोष असतात, असें समजावें. अर्थात् आवश्यकक्रिया करणाऱ्यांनीं ह्या दोषांचा त्याग करावा.

**अस्यते स्थीयते यत्र येन वा वन्दनोद्यतैः ॥**
**तदासनं विबोद्धव्यं देशपद्मासनादिकम् ॥ ३८ ॥**

अर्थ— वंदना नांवाचें आवश्यक करणाऱ्यांनीं ज्या ठिकाणीं बसलें जातें तो देश, किंवा ज्याच्या योगानें बसलें जातें तें पद्मासन वगैरे ह्या दोहोंसही आसन असें समजावें.

**संसक्तः प्रचुरच्छिद्रः स्थलपांस्वादिदूषितः ॥**
**विक्षोभको हृषीकाणां रूपगन्धरसादिभिः ॥ ३९ ॥**
**परीषहकरो दंशशीतवातातपादिभिः ॥**
**असम्बद्धजनालापसावद्यारम्भगर्हितः ॥ ४० ॥**
**आर्द्रीकृतो मनोनिष्ठः समाधाननिषूदकः ॥**
**योऽशिष्टजनसञ्चारः प्रदेशं तं विवर्जयेत् ॥ ४१ ॥**

अर्थ— अतिशय कठिण, फार विस्तृत, जमिनीला भेगा किंवा भोंकें पडलीं आहेत असा, धुरळ्यानें व्याप्त झालेला, रूप, गंध, रस इत्यादिकांनीं इंद्रियांना चंचल करणारा असा, माशा, थंडी, ऊन्ह इत्यादिकांच्या योगानें परीषह उत्पन्न करणारा, लोकांचीं असंबद्ध भाषणें व हिंसा घडणारे उद्योग ह्यांनीं निंद्य, पाण्यानें भिजलेला, मनाला अप्रिय असलेला, मनाच्या एकाग्रतेचा नाश करणारा आणि ज्यांतून कमीपतीचे लोक संचार करीत आहेत असा जो प्रदेश असेल त्याचा त्याग करावा. हा देशासनाचा दोष सांगितला.

**विविक्तः प्रासुकः सेव्यः समाधानविवर्धकः ॥**
**देवर्जुदृष्टिसम्पातवर्जितो देवदक्षिणः ॥ ४२ ॥**
**जनसञ्चारनिर्मुक्तो ग्राह्यो देशो निराकुलः ॥**
**आसन्नो नातिदूरस्थः सर्वोपद्रववर्जितः ॥ ४३ ॥**

अर्थ— आवश्यककर्में करण्याचा देश एकांत, निर्जंतुक,

बसण्याला योग्य, चित्ताची एकाग्रता वाढविणारा, देवाच्या मूर्तीची सरळ दृष्टि ज्याच्यावर पडत नाहीं असा आणि देवाच्या दक्षिणेकडच्या बाजूचा असा असावा. तो लोकांच्या येण्याजाण्याच्या वाटेवर नसावा. आणि जेथें लोकांचा गोंगाट नाहीं असा असून, घरापासून जवळ व फार लांब नव्हे असा असावा. आणि त्यांत कोणत्याही प्रकारचा उपद्रव नसावा.

स्थेयोऽच्छिद्रं सुखस्पर्शं विशब्दकमजन्तुकम् ॥
तृणकाष्ठादिकं ग्राह्यं विनयस्योपबृंहणम् ॥ ४४ ॥

अर्थ-- स्थिर ह्मणजे न हालणारें, ज्याला भोंकें पडलेलीं नाहींत असें, ज्याचा शब्द होत नाहीं व ज्यांत जंतु नाहींत असें गवत अथवा लांकूड हें बसण्याकरितां घ्यावें. हें आसन विनय वाढविणारें आहे.

जङ्घाया जङ्घयाऽऽश्लेषे मध्यभागे प्रकीर्तितम् ॥
पद्मासनं सुखादायि सुसाध्यं सकलैर्जनैः ॥ ४५ ॥

अर्थ-- मांडी घालून बसलें असतां पायांच्या पोटऱ्या एकमेकीला मध्यभागीं लागतात; त्याला पद्मासन असें ह्मणतात. हें सुखकर असून सर्वांना साधण्यासारखें आहे.

बुधैरुपर्यधोभागे जंघयोरुभयोरपि ॥
समस्तयोः कृते ज्ञेयं पर्यङ्कासनमासनम् ॥ ४६ ॥

अर्थ-- मांड्यांना चिकटलेल्या दोनी पायांच्या पिंडऱ्यांचे खालचे भाग वर केले असतां पर्यंकासन नांवाचें आसन होतें असें पंडितांनीं जाणावें. हें आसन करतांना उताणें निजून दोनीं पावलें दोनी कुल्यांच्या खालीं आणावींत. ह्मणजे पायांच्या पिंडऱ्यांचे जे खालचे भाग असतात ते मांड्यांना चिकटून वर केल्यासारखे होतात. असें करून दोनी हात सरळ

भूमीवर ठेवले असतां पर्यंकासन होतें.

**ऊर्वोरुपरिनिक्षेपे पादयोर्विहिते सति ॥**
**वीरासनं चिरं कर्तुं शक्यं धीरैर्न कातरैः ॥ ४७ ॥**

अर्थ— दोनी पायांचीं पावलें दोनी मांड्यांवर ह्मणजे उजवें पाऊल डाव्या मांडीवर आणि डावें पाऊल उजव्या मांडीवर ठेवलीं असतां वीरासन होतें. हें धीर पुरुषांनीं पुष्कळ काळपर्यंत करणें शक्य असतें. पण भित्र्यांनीं करणें शक्य नसतें.

**युतपार्ष्णिभवे योगे स्मृतमुत्कुटिकासनम् ॥**
**गवासनं जिनैरुक्तमार्याणां यतिवन्दने ॥ ४८ ॥**

अर्थ— पायाचे चवडे भूमीवर टेकून दोन्ही टांचावर ढुंगण ठेवून बसणें ह्याला उत्कुटिकासन ह्मणतात. आर्यांचें यतींना वंदन करण्याचे वेळीं जें आसन असतें तें गवासन होय, असें जिनांनीं सांगितलें आहे.

**विनयासक्तचित्तानां कृतिकर्मविधायिनाम् ॥**
**न कार्यव्यतिरेकेण परमासनमिष्यते ॥ ४९ ॥**

अर्थ— विनयवान् अशा आवश्यकक्रिया करणाऱ्यांनीं विशेषकार्याशिवाय दुसरीं आसनें करूं नयेत. पद्मासन व कायोत्सर्ग हीं दोनच आसनें आवश्यकक्रियेला सांगितलीं आहेत.

**स्थीयते येन तत्स्थानं द्विप्रकारमुदाहृतम् ॥**
**वन्दना क्रियते यस्मादूर्ध्वीभूयोपविश्य वा ॥ ५० ॥**

अर्थ— ज्यानें स्थिति केली जाते तें स्थान होय. तें ज्यामुळें उभें राहून वंदना केली जाते असें एक, व ज्यामुळें बसून वंदना केली जाते असें एक असें दोन प्रकारचें आहे.

**घटिकानां मतं षट्कं सन्ध्यानां त्रितयं जिनैः ॥**
**कार्यस्यापेक्षया कालः पुनरन्यो निगद्यते ॥ ५१ ॥**

अर्थ— प्रातःकाल, मध्यान्हकाल आणि सायंकाल हे तीन संधिकाल आणि ह्या प्रत्येक कालाच्या दोन दोन घटिका असा सहा घटिकांचा काल जिनांनीं सांगितला आहे. आणि करावयाच्या कर्मांच्या अपेक्षेनें दुसराही अणखी काल सांगितला आहे.

जिनेन्द्रवन्दनायोगमुक्ताशुक्तिविभेदतः ॥
चतुर्विधोदिता मुद्रा मुद्रामार्गविशारदैः ॥ ५२ ॥

अर्थ— जिनेंद्रमुद्रा, वंदनामुद्रा, योगमुद्रा आणि मुक्ताशुक्तिमुद्रा ह्या भेदानें मुद्रा चार प्रकारची आहे असें मुद्राशास्त्रांत प्रवीण असलेल्यांनीं सांगितलें आहे.

जिनमुद्राऽन्तरं कृत्वा पादयोश्चतुरंगुलम् ॥
ऊर्ध्वं जान्वोरधः स्थानं प्रलम्बितभुजद्वयम् ॥ ५३ ॥

अर्थ— दोन पायांत चार बोटांचें अंतर करून गुडघ्यांच्या वरतीं दोनी हात खाली लोंबत सोडून उभें रहाणें ह्याला जिनमुद्रा ह्मणतात.

मुकुलीभूतमाधाय जठरोपरि कूर्परम् ॥
स्थितस्य वन्दनामुद्रा करद्वन्द्वं निवेदिता ॥ ५४ ॥

अर्थ— दोनी हातांचे कोपर पोटावर येतील अशा रीतीनें दोनी हात कमलाच्या कळीप्रमाणें जोडलेले करून उभें रहाणाऱ्याची वंदनामुद्रा होते; अर्थात् हात जोडून उभे रहाणें ही वंदनामुद्रा होय; असें शास्त्रज्ञांनीं सांगितलें आहे.

जिनाः पद्मासनादीनामङ्कमध्ये निवेशनम् ॥
उत्तानकरयुग्मस्य योगमुद्रां बभाषिरे ॥ ५५ ॥

अर्थ— पद्मासन वगैरे आसनांत दोनी मांड्यावर दोनी हात उत्ताणे ठेवून बसणें ह्याला जिन योगमुद्रा ह्मणतात.

मुक्ताशुक्तिर्मता मुद्रा जठरोपरि कूर्परम् ॥

ऊर्ध्वजानोः करद्वन्द्वं संलग्नाङ्गुलि सूरिभिः ॥५६॥

अर्थ— पोटावर कोपर येतील अशा रीतीनें दोनी हात बोटें एकमेकांत गुंतवून गुडघ्याच्या वर कोठेंही धारण करून रहाणें ही विद्वानांनीं मुक्ताशुक्ति नांवाची मुद्रा मानली आहे.

त्यागो देहममत्वस्य तनूत्सृतिरुदाहृता ॥
उपविष्टोपविष्टादिविभेदेन चतुर्विधा ॥ ५७ ॥

अर्थ— ध्यानाच्या वेळीं शरीरावरील ममता सोडणें ह्याला तनूत्सर्ग ह्मणतात. तो उपविष्टोपविष्ट वगैरे भेदानें चार प्रकारचा आहे.

आर्तरौद्रद्वयं यस्यामुपविष्टेन चिन्त्यते ॥
उपविष्टोपविष्टाख्या कथ्यते सा तनूत्सृतिः ॥५८ ॥

अर्थ— ज्या तनूत्सर्गात आर्त आणि रौद्र असें दोन प्रकारचें चिंतन बसून केलें जातें, त्याला उपविष्टोपविष्ट नांवाचा तनूत्सर्ग ह्मणतात. भावार्थ—या कायोत्सर्गात जीवाचे परिणाम व देह हे दोन्ही पडते असतात ह्मणून याला उपविष्टोपविष्ट ह्मणतात.

धर्मशुक्लद्वयं यस्यामुपविष्टेन चिन्त्यते ॥
उपविष्टोत्थितां[1] सन्तस्तां वदन्ति तनूत्सृतिम् ॥ ५९

अर्थ— ज्या तनूत्सर्गात धर्मध्यान आणि शुक्लध्यान ह्या दोहींचें बसून चिन्तन केलें जातें त्या तनूत्सर्गाला सज्जन उपविष्टोत्थित नांवाचा तनूत्सर्ग ह्मणतात. यांत शरीर बसलेलें असतें व परिणाम चढते असतात.

आर्तरौद्रद्वयं यस्यामुत्थितेन विधीयते ॥
उत्थितोपविशात्सञ्ज्ञां तां भाषन्ते विपश्चितः ६०

अर्थ— ज्या तनूत्सर्गात आर्त आणि रौद्र असें दोन प्रकारचें

---

१ तामुत्थितोपविष्टाह्वां निगदन्ति महाधियः ॥ असाही पाठभेद आहे.

ध्यान उभें राहून केलें जातें त्या तनूत्सर्गाला उत्थितोपविष्ट नांवाचा तनूत्सर्ग होय, असें पंडित ह्मणतात. यांत शरीर उभें असतें आणि परिणाम पडते असतात.

**धर्मशुक्लद्वयं यस्यामुत्थितेन विचिन्त्यते ॥**
**उत्थितोत्थितनामानं तां वदन्ति मनीषिणः ॥६१॥**

अर्थ—ज्या तनूत्सर्गांत श्रावकानें धर्मध्यान आणि शुक्लध्यान ह्या दोहोंचें उभें राहून चिंतन केलें जातें, त्याला विद्वान् लोक उत्थितोत्थित नांवाचा तनूत्सर्ग ह्मणतात. यांत परिणाम व देह हे दोन्ही चढते असतात.

**एकद्वित्रिचतुःपञ्चदेहांशप्रणतेर्मतः ॥**
**प्रणामः पञ्चधा देवैः पादानतनरामरैः ॥ ६२ ॥**

अर्थ— शरीराचे एक, दोन, तीन, चार, पांच अवयव नम्र होत असल्यानें प्रणाम ( नमस्कार अथवा वंदना ) पांच प्रकारचा आहे असें ज्यांच्या चरणावर मनुष्य आणि देव नम्र झाले आहेत अशा जिनांनीं सांगितलें आहे.

**एकाङ्गः शिरसो नामे स द्व्यङ्गः करयोर्द्वयोः ॥**
**त्रयाणां मूर्द्धहस्तानां स त्र्यङ्गो नमने मतः ॥ ६३ ॥**

अर्थ— नुसतें मस्तक नम्र केलें असतां एकांग नमस्कार समजावा. दोन हातच वांकवून मस्तकाला लाविले असतां द्व्यंग नमस्कार जाणावा. दोन हात आणि मस्तक हे तीन अवयव नम्र केले असतां तो त्र्यंग नमस्कार समजावा.

**चतुर्णां करजानूनां नमने चातुरंगकः ॥**
**करमस्तकजानूनां पञ्चाङ्गः पञ्चके नते ॥ ६४ ॥**

अर्थ— दोन हात आणि दोन गुडघे हे चार अवयव नम्र केले असतां चतुरंग नमस्कार होतो. आणि दोन हात, मस्तक

आणि दोन गुडघे ह्या पांच अंगांच्या नमविण्यानें पंचाग नमस्कार होतो.

**कथिता द्वादशावर्ता वपुर्वचनचेतसाम् ॥**
**स्तवसामायिकाद्यन्तपरावर्तनलक्षणाः ॥ ६५ ॥**

अर्थ— जिनस्तव, सामायिक वगैरेंच्या शेवटीं शरीर, वचन आणि मन ह्यांच्या परावर्तनाच्या स्वरूपाचे बारा आवर्त सांगितले आहेत. तात्पर्य- जिनस्तवन वगैरे कर्मांच्या शेवटीं दोनी हात जोडून ते तीन वेळां तेथल्यातेथेंच प्रदक्षिणाकार फिरवून एकवार मस्तक नम्र करावें, असा विधि शास्त्रांत सांगितला आहे. ह्याला आवर्त ( फिरविणें ) असें ह्मणतात. एकवार मस्तक नम्र करावयाच्या अगोदर हे आवर्त तीन होत असल्यानें असें चार वेळां मस्तक नम्र करण्यांत हे आवर्त बारा होतात असें समजावें. हे बारा आवर्त प्रत्येक कर्माच्या शेवटीं करावे लागतात.

**अष्टाविंशतिसंख्यानाः कायोत्सर्गा मता जिनैः ॥**
**अहोरात्रगताः सर्वे षडावश्यककारिणाम् ॥ ६६ ॥**

अर्थ—कायोत्सर्ग अठ्ठावीस आहेत असें जिनेंद्रांचें मत आहे. ते सर्व कायोत्सर्ग सहा आवश्यक कर्में करणाऱ्या श्रावकाचे एका अहोरात्रांत होत असतात.

**स्वाध्याये द्वादश प्राज्ञैर्वन्दनायां षडीरिताः ॥**
**अष्टौ प्रतिक्रमे योगभक्तौ तौ द्वावुदाहृतौ ॥ ६७ ॥**

अर्थ— ते कायोत्सर्ग स्वाध्यायांत बारा, वंदनाकार्यांत सहा, प्रतिक्रमणांत आठ आणि योगभक्तींत दोन मिळून अठ्ठावीस होतात; असें विद्वान् लोकांचें ह्मणणें आहे.

**अष्टोत्तरशतोच्छ्वासः कायोत्सर्गः प्रतिक्रमे ॥**

**सान्ध्ये प्राभातिके चार्धमन्यस्तत्सप्तविंशतिः ६८**

अर्थ— सायंकालच्या सामायिक प्रतिक्रमणाच्या वेळीं एकशेहे आठ श्वासोच्छ्वास होई तोपर्यंत कायोत्सर्ग करावा. प्रातःकालीं ह्याच्या अर्धें ह्मणजे चोपन्न श्वासोच्छ्वास होई तोंपर्यंत आणि बाकीच्या सर्वकर्मांत सत्तावीस श्वासोच्छ्वास होईपर्यंत कायोत्सर्ग करावा.

**सप्तविंशतिरुच्छ्वासाः संसारोन्मूलनक्षमे ॥**
**सन्ति पञ्चनमस्कारे नवधा चिन्तिते सति ॥ ६९ ॥**

अर्थ— संसाराचा नाश करण्याला समर्थ असा पंच नमस्कार मंत्र नऊ वेळां जपावयाचा असतां सत्तावीस श्वासोच्छ्वास होतात. भावार्थ, एका नमस्कारमंत्राचा जप तीन उच्छ्वासांत करावा.

**प्रतिक्रमद्वयं प्राज्ञैः स्वाध्यायानां चतुष्टयम् ॥**
**वन्दनात्रितयं योगभक्तिद्वितयमिष्यते ॥ ७० ॥**

अर्थ— श्रावकानें प्रतिदिवशीं दोन वेळां प्रतिक्रमण करावें. स्वाध्याय चार वेळां करावा. वंदना तीन वेळां करावी. आणि योगभक्ति दोन वेळ करावी; असें विद्वानांचें मत आहे.

**उत्कृष्टश्रावकेणैते विधातव्याः प्रयत्नतः ॥**
**अन्यैरेते यथाशक्ति संसारान्तं यियासुभिः ॥७१॥**

अर्थ — उत्तम श्रावकांनीं हे कायोत्सर्ग मोठ्या काळजीनें यत्नपूर्वक करावेत. आणि संसारांतून पार पडण्याची इच्छा करणाऱ्या दुसऱ्या लोकांनीं आपल्या शक्तीप्रमाणें कायोत्सर्ग करावेत.

**इच्छाकारं समाचारं संयमासंयमस्थितः ॥**
**विशुद्धवृत्तिभिः सार्धं विदधाति प्रियंवदः ॥ ७२ ॥**

अर्थ— मधुरभाषण करणारा असा देशविरतगुणस्थानवर्ती श्रावक, शुद्धाचारसंपन्न अशा मुनींसह इच्छाकार नांवाचा समाचार करितो. ह्मणजे हे भगवन्! आपण सांगाल तसें ऐकण्याची मी इच्छा करितों असें ह्मणतो.

वैराग्यस्य परां भूमिं संयमस्य निकेतनम् ॥
उत्कृष्टः कारयत्येष मुण्डनं तुण्डमुण्डयोः ॥ ७३ ॥

अर्थ— उत्कृष्ट श्रावक वैराग्याची परम मर्यादा आणि संयमाचें स्थान असें मुख आणि मस्तक ह्यांचें मुंडन करतो.

केवलं वा सवस्त्रं वा कौपीनं स्वीकरोत्यसौ ॥
एकस्थानान्नपानीयो निन्दागर्हापरायणः ॥ ७४ ॥

अर्थ— एकाच ठिकाणीं अन्नपान ग्रहण करणारा व आपली निंदा गर्हा ( तुच्छ मानून घेणें ) करण्याविषयीं तत्पर असलेला हा उत्कृष्ट श्रावक नुसतेंच कौपीन धारण करतो. किंवा एक वस्त्र आणि कौपीन धारण करतो.

स धर्मलाभशब्देन प्रतिवेश्म सुधोपमाम् ॥
सपात्रो याचते भिक्षां जरामरणसूदनीम् ॥ ७५ ॥

अर्थ— तो उत्कृष्ट श्रावक पात्र घेऊन प्रत्येक घरांत धर्मलाभ शब्दाचा उच्चार करून ह्मणजे 'धर्मलाभोऽस्तु' असें ह्मणून जरा आणि मरण ह्यांचा नाश करणारी अशी अमृतासारखी भिक्षा मागतो.

वंदनेचे बत्तीस दोष.

समस्तादरनिर्मुक्तो मदाष्टकवशीकृतः ॥
प्रतीक्ष्यपीडनाकारी कूर्चमूर्द्धजकुंचकः ॥ ७६ ॥
चलयन्नखिलं कायं दोलारूढ इवाभितः ॥
अग्रतः पार्श्वतः पश्चाद्रिङ्खन् कूर्म इवाभितः ७७

करटीवांकुशारूढः कुर्वन्मूर्द्धनतोन्नतिम् ॥
क्षिप्रं मत्स्य इवोत्पत्य परेषां निपतन् पुरः ॥ ७८ ॥
कुर्वन् वक्षोभुजद्वन्द्वं विन्नसिं द्राविडीमिव ॥
पूज्यात्मासादनाकारी गुर्वादिजनभीषितः ॥ ७९ ॥
भयसप्तकविभ्रस्तः परिवारर्द्धिगर्वितः ॥
समाजतो बहिर्भूय किञ्चिल्लज्जाकुलाशयः ॥८०॥
प्रतिकूलो गुरोर्भूत्वा कुर्वाणो जल्पनादिकम् ॥
कस्यचिदुपरि क्रुध्दस्तस्याकृत्वा क्षमां त्रिधा ॥८१॥
ज्ञास्यते वन्दनां कृत्वा भ्रमयँस्तर्जनीमिति ॥
हसनोद्धट्टने कुर्वन् भ्रुकुटीकुटिलालकः ॥ ८२ ॥
निकटीभूय गुर्वादेराचार्यादिनिरीक्षितः ॥
करदानं गणैर्मत्वा हृत्वा दृष्टिपथं गुरोः ॥ ८३ ॥
असम्पूर्णविधानेन सूत्रोदितपिधायकम् ॥
लब्ध्वोपकरणादीनि तेषां लाभाशयाऽपि च ॥८४॥
कुर्वन्मूक इवात्यर्थं हुंकारादिपुरस्सरम् ॥
वन्दारूणां स्वशब्देन परेषां छादयन् ध्वनिम् ॥८५॥
गुर्वादेरग्रतो भूत्वा मूर्धोपरिकरभ्रमी ॥
द्वात्रिंशदिति मोक्तव्या दोषा वन्दनकारिणाम् ८६

अर्थ— आतां वंदना कर्मातील बत्तीस दोष सांगतात— १ सर्व आदर सोडून क्रिया करणें हा अनादर दोष होय. २ जाति वगैरे आठ प्रकारच्या मदांच्या आधीन होऊन वंदना करणें हा स्तब्धदोष होय. ३ दुसऱ्याला पाहून शरीराला दाबणें हा पीडकदोष होय. ४ वंदनेच्यावेळीं मुखावरील किंवा मस्तकावरील केश उपटणें हा कुंचकदोष होय. ५ झोंपाळ्यावर बसल्याप्रमाणें सर्वांगाला हालविणें हा दोलायितदोष होय. ६

मागें पुढें सर्व अंग हालविणें हा कच्छपरिंगितदोष ( कांसवाप्रमाणें करणें) होय. ७ ज्याच्या डोंकीवर अंकुश टोंचला आहे अशा हत्तीप्रमाणें मस्तक खालीं वर करणें हा अंकुशित दोष होय. ८ माशाप्रमाणें उडी मारून अथवा धडपड करून दुसऱ्याच्या पुढें पडणें हा मत्स्योद्वर्तन दोष होय. ९ द्रविड देशांतील पुरुष ज्याप्रमाणें दुसऱ्याला विनंति करावयाची असतांना आपले हात आपल्या उरावर ठेवितो त्याप्रमाणें वंदना करतांना हात उरावर ठेवणें हा द्राविडविज्ञप्ति नांवाचा दोष होय. यालाच वेदिकाबद्ध दोष असें दुसरें नांव आहे. १० वंदना करावच्या वेळीं गुरु वगैरे पूज्य लोकांविषयीं मनांत द्वेष आणणें हा आसादना दोष होय. ११ गुरु वगैरेच्या भीतीमुळें वंदना करणें हा विभीतदोष होय. १२ सात प्रकारच्या भयानें पीडित होऊन वंदना करणें हा भय दोष होय. १३ आपल्या परिवाराच्या मोठेपणानें गर्व करणें हा ऋद्धिगौरव दोष होय. १४ आपल्या समाजांतून बहिष्कृत होऊन किंचित् लज्जेनें व्याकुल होणें हा लज्जित दोष होय. १५ गुरु वगैरे पूज्य लोकांशीं विरुद्ध होणें हा प्रतिकूल दोष होय. १६ बडबड करीत वंदना करणें हा शब्ददोष होय. १७ एखाद्या मनुष्यावर रागावून त्याची क्षमा न मागणें हा प्रदुष्ट दोष होय. १८ आपण वंदना केली हें कोणाला तरी समजेल ह्या इच्छेनें बोट वगैरे हालविणें हा मनोदुष्ट दोष होय. १९ वंदना करतांना हांसणें व कोणाला तरी धक्का मारणें हा हसनोद्धट्टन दोष होय. २० भुवया केश हे वांकडेतिकडे करणें हा भ्रकुटीकुटिल दोष होय. २१ गुरु वगैरेच्या जवळ जाऊन वंदना करणें हा प्रविष्ट दोय. २२ गुरु वगैरे पहात असतां वंदना करणें हा दृष्टिदोष होय. २३ आपल्या

समानाला हा आपण एक कर द्यावयाचा आहे असें समजून वंदना करणें हा करदोष होय. २४ गुरूची नजर चुकवून वंदना करणें हा अदृष्टि दोष होय. २५ उपकरणादि आपल्याला मिळाले ह्मणून वंदना करणें हा आलब्ध दोष होय. २६ उपकरणादिक आपल्याला मिळतील अशी आशा करणें हा अनालब्ध दोष होय. २७ वंदनाविधि संपूर्ण न करणें हा हीन दोष होय. २८ सूत्रांत सांगितलेल्या अर्थाचें आच्छादन करणें हा पिधायक दोष होय. २९ मूक असल्याप्रमाणें नुसताच मोठ्यानें हुंकार करणें हा मूक दोष होय. ३० आपल्या शब्दानें दुसऱ्या वंदना करणाऱ्या लोकांचा शब्द आच्छादित करणें हा दर्दुरदोष होय. ३१ गुरु वगैरे पूज्य लोकांच्या पुढें सरून वंदना करणें हा अंत्रदोष होय. ३२ आणि वंदनाच्या वेळीं डोकी-वर हात फिरवीत असणें हा उत्तरचूलिका दोष होय. ह्याप्रमाणें वंदना करणाऱ्याचे हे बत्तीस दोष आहेत. त्यांचा त्याग करावा.

क्रियमाणा प्रयत्नेन क्षिप्रं कृषिरिवेप्सितम् ॥
निराकृतमला दत्ते वन्दना फलमुल्बणम् ॥ ८७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें वर सांगितलेले बत्तीस दोष लक्ष ठेवून काढून टाकून वंदना केली असतां ती कृषीप्रमाणें फार जलद उत्कृष्ट फल देते.

कायोत्सर्गाचे बत्तीस दोष.

स्तब्धीकृतैकपादस्य स्थानमश्वपतेरिव ॥
चलनं वातधूताया लताया इव सर्वतः ॥ ८८ ॥
श्रयणं स्तम्भकुड्यादेः पट्टिकाद्युपरि स्थितिः ॥
मालमालम्बनं कृत्वा शिरसाऽवस्थितिः कृता ॥८९
निगडेनेव बद्धस्य विकटाङ्घ्रेरवस्थितिः ॥

कराभ्यां जघनाच्छादः किरातयुवतेरिव ॥ ९० ॥
शिरसो नमनं कृत्वा विधायोन्नमनं स्थितिः ॥
उन्नमय्य स्थितिर्वक्षः शिशोर्धात्र्या इव स्तनम् ९१
काकस्येव चलाक्षस्य सर्वतः पार्श्ववीक्षणम् ॥
ऊर्ध्वाधःकम्पनं मूर्ध्नः खलीनार्तहरेरिव ॥ ९२ ॥
स्कन्धारूढयुगस्येव कृतग्रीवानतोन्नतेः ॥
सकपित्थकरस्येव मुष्टिबन्धनकारिणः ॥ ९३ ॥
कुर्वतः शिरसः कम्पं मूकसञ्ज्ञाविधायिनः ॥
अङ्गुलीगणनादीनि भ्रूनृत्यादिविकल्पनम् ॥ ९४ ॥
मदिराकुलितस्येव घूर्णनं दिगवेक्षणम् ॥
ग्रीवोर्ध्वनयनं भूरि ग्रीवाधोनयनादिकम् ॥ ९५ ॥
निष्ठीवनं वपुस्स्पर्शः प्रपञ्चबहुला स्थितिः ॥
सूत्रोदितविधेरूनं वयोपेक्षादिवर्जनम् ॥ ९६ ॥
कालापेक्षाव्यतिक्रान्तिर्व्यपेक्षा सक्तचित्तता ॥
लोभाकुलितचित्तत्वं पापकार्योद्यमः परः ॥ ९७ ॥
कृत्याकृत्यविमूढत्वं द्वात्रिंशदिति सर्वथा ॥
कायोत्सर्गविधेर्दोषास्त्याज्या निर्जरणार्थिभिः ९८

अर्थ— आतां कायोत्सर्गविधींतील बत्तीस दोष सांगतात— १ घोड्याप्रमाणें एक पाय थोडा शिथिल करून निश्चल ठेवून उभे रहाणें हा घोटकदोष होय. २ वाऱ्यानें हालविलेल्या वेलीप्रमाणें सर्वांग हलविणें हा लतादोष होय. ३ एखादा खांब अथवा भिंत ह्यांचा आश्रय करून ह्मणजे त्याला धरून, उभें रहाणें हा स्तंभकुड्य दोष होय. ४ पाट किंवा शिला ह्यांच्यावर उभें रहाणें हा पट्टकादिदोष होय. ५ डोकीवर असलेल्या माळ्याला डोकें टेंकून उभें रहाणें हा मालदोष होय.

६ पायांत बेडी घातल्याप्रमाणें पाय वांकडेतिकडे करून उभें रहाणें हा निगडदोष होय. ७ भिल्लाच्या स्त्रीप्रमाणें आपल्या हातांनीं कमरेचा पुढला भाग आच्छादित करणें हा किरातयुवतिदोष होय. ८ मस्तक खालीं करून उभें रहाणें हा शिरोनमन दोष होय. ९ मस्तक वर करून उभें रहाणें हा उन्नयन दोष होय. १० एखाद्या मुलाच्या दायीप्रमाणें ऊर पुढें काढून उभें रहाणें हा धात्री दोष होय. ११ कावळ्याप्रमाणें डोळे फिरवून चोहीकडे पहाणें हा काकदोष होय. १२ लगाम घालून जखडलेल्या घोड्याप्रमाणें मान खालीं वर करणें हा खलीनदोष होय. १३ खांद्यावर जूं ठेविल्याप्रमाणें मान खालीं वर करणें हा युगदोष होय. ह्यालाच गजदोष ह्मणतात. १४ हातांत कवठ धरल्याप्रमाणें मूठ वळणें हा कपित्थदोष होय. १५ मस्तक हालविणें हा शिरःकंपदोष होय. १६ मूक मनुष्याप्रमाणें खुणा करणें हा मूकदोष होय. १७ कायोत्सर्ग केल्यावर बोटें वगैरे मोजणें हा अंगुलिदोष होय. १८ भुवया हालविणें हा भ्रूदोष होय. १९ मद्यपान केलेल्या मनुष्याप्रमाणें घुरघुरणें हा मद्यपायीदोष होय. २० कायोत्सर्ग केल्यावर दहाही दिशाकडे अवलोकन करणें हा दिगवेक्षणदोष होय. २१ मान फार वरती करणें हा ग्रीवोर्ध्वनयनदोष होय. २२ मान फार खालीं करणें हा ग्रीवाधोनयनदोष होय. २३ थुंकणें हा निष्ठीवनदोष होय. २४ अंगाला स्पर्श करणें हा वपुस्स्पर्शदोष होय. २५ कपटाच्या गोष्टींचा विचार करणें हा प्रपंचबहुलदोष होय. २६ सूत्रांत सांगितलेल्या विधींत न्यूनता करणें हा विधिहीनदोष होय. २७ कायोत्सर्ग करण्याला जें वय असणें आवश्यक आहे त्या वयाची अपेक्षा न करणें हा वयोपेक्षावर्जनदोष होय. २८ योग्यकालाच्या अपेक्षेचें उल्लंघन

करणें हा कालापेक्षातिक्रांतिदोष होय. २९ अनेकप्रकारच्या मनोरथांत चित्त आसक्त ठेवणें हा व्यपेक्षासक्तचित्ततादोष होय. ३० मन लोभानें व्यग्र करणें हा लोभाकुलितदोष होय. ३१ कायोत्सर्गाच वेळीं पापकृत्याचा विचार करणें हा पापकार्योद्यम-दोष होय. ३२ आणि करण्याला योग्य कोणतें अयोग्य कोणतें ह्याचा विचार न करणें हा मूढदोष होय. ह्याप्रमाणें कायोत्सर्गाचे बत्तीस दोष आहेत. कर्मांची निर्जरा करण्याची इच्छा करणाऱ्या श्रावकांनीं ह्या दोषांचा त्याग करावा.

समाहितमनोवृत्तिः कृतद्रव्यादिशोधनः ॥
विविक्तं स्थानमासाद्य कृतेर्यापथशोधनः ॥ ९९ ॥
गुर्वादिवन्दनां कृत्वा पर्यङ्कासनमास्थितः ॥
विधाय वन्दनामुद्रां सामान्योक्तनमस्कृतिः १००
ऊर्ध्वसामायिकस्तोत्रं स मुक्ताशुक्तिमुद्रकः ॥
पठित्वाऽऽवर्तितावर्तो विदधाति तनूत्सृतिम् १०१

अर्थ— कायोत्सर्गाचा विधि सांगतात— श्रावकानें मन एकाग्र करून द्रव्यशुद्धि करावी. एकांत स्थळ पाहून ईर्यापथ-शुद्धि करून गुरु वगैरेंना वंदन करावें. मग पर्यंकासनानें बसून वंदनामुद्रा करून सामान्य प्रकारानें नमस्कार करावेत. मग मुक्ताशुक्ति नांवाची मुद्रा करून उभें राहून सामायिक स्तोत्रांचें पठन करावें. नंतर मागें सांगितल्याप्रमाणें आवर्त करून कायोत्सर्ग करावा.

कृत्वा जैनेश्वरीं मुद्रां ध्यात्वा पञ्चनमस्कृतिम् ॥
उक्त्वा तीर्थंकरस्तोत्रमुपविश्य यथोचितम् ॥१०२॥
चैत्यभक्तिं समुच्चार्य भूयः कृत्वा तनूत्सृतिम् ॥
उक्त्वा पंचगुरुस्तोत्रं कृत्वा ध्यानं यथाबलम् १०३

**विधाय वन्दनां सूरेः कृतिकर्मपुरस्सराम् ॥**
**गृहीत्वा नियमं शक्त्या विधत्ते साधुवन्दनाम्१०४**
**आवश्यकमिदं प्रोक्तं नित्यं व्रतविधायिनाम् ॥**
**नैमित्तिकं पुनः कार्यं यथागममतन्द्रितैः ॥ १०५ ॥**

अर्थ— मग जिनेश्वरमुद्रा करून पंचनमस्कार मंत्राचें ध्यान करावें. मग योग्यप्रकारें बसून चैत्यभक्ति पठन करून पुनः कायोत्सर्ग करावा. नंतर पंचपरमेष्ठींचे स्तोत्र पठन करून आपल्या शक्तीप्रमाणें ध्यान करावें. मग मागें सांगितलेले आवर्त करून सूरींना वंदन करावें. ह्याप्रमाणें केल्यावर आपल्या शक्तीप्रमाणें नियम ग्रहण करून साधुवंदना करावी. ह्या सर्व क्रिया व्रती श्रावकांनीं नेहमी अवश्य करावयाच्या सांगितल्या आहेत. आळस नसणाऱ्यांनीं नैमित्तिक क्रियाहि शास्त्रानुसार कराव्या.

**येन केन च सम्पन्नं कालुष्यं दैवयोगतः ॥**
**क्षमयित्वैव तं त्रेधा कर्तव्याऽवश्यकाक्रिया ॥ १०६**

अर्थ — कोणत्याही कारणानें अथवा दैवयोगामुळें दुसऱ्याच्या मनांत आपल्याविषयीं जो मलिनभाव उत्पन्न झालेला असेल; त्याबद्दल मन वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें क्षमा मागून नंतर वर सांगितलेली आवश्यक क्रिया श्रावकानें करावी.

**क्रियां पक्षोद्भवां मूढश्चतुर्मासभवां च यः ॥**
**विधत्तेऽक्षमयित्वाऽसौ न तस्याः फलमश्नुते १०७**

अर्थ— जो मूर्ख श्रावक पंधरा दिवसांनीं करावयाची प्रतिक्रमणादि क्रिया अथवा चार महिन्यांनीं करावयाची प्रतिक्रमणादिक्रिया हा वर सांगितलेला क्षमापनाचा विधि न करतांच करतो त्याला त्या क्रियेचें फल मिळत नाहीं.

देवनराद्यैः कृतमुपसर्गं ।
वन्दनकारी सहति समस्तम् ॥
कम्पनमुक्तो गिरिरिव धीरो ।
दुष्कृतकर्मक्षपणमवेक्ष्य ॥ १०८ ॥

अर्थ— वंदना कर्म करणारा धीर पुरुष दुष्कृतकर्मांचा क्षय होणार आहे हें मनांत आणून निश्चल अशा पर्वताप्रमाणें देव मनुष्यें इत्यादिकांनीं केलेला सर्व उपसर्ग सहन करतो.

इत्थमदोषं सततमनूनं ।
निर्मलचित्तो रचयति नूनम् ॥
यः कृतिकर्मामितगतिदृष्टं ।
याति स नित्यं पदमनदृष्टम् ॥ १०९ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें सर्वज्ञमुनींना ज्ञात असलेलें हें आवश्यक कर्म निर्मलांतःकरण असा जो श्रावक दोष न होऊं देतां नेहमी निश्चयानें करतो, तो नित्य आणि न पाहिलेलें जें पद (मोक्षस्थान) त्याला प्राप्त होतो. ह्मणजे तो जीव संसारापासून मुक्त होतो.

॥ इत्यमितगत्याचार्यप्रणीते श्रावकाचारे अष्टमः परिच्छेदः ॥

आठवा परिच्छेद समाप्त.

---

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

## परिच्छेद नववा.

दानं पूजा जिनैः शीलमुपवासश्चतुर्विधः ॥
श्रावकाणां मतो धर्मः संसारारण्यपावकः ॥ १ ॥

अर्थ— श्रावकांचा धर्म; दान, पूजा, शील आणि उपवास असा चार प्रकारचा आहे; असें श्रीजिनांनीं सांगितलें आहे. हा धर्म संसाररूपी अरण्याला जाळणारा अग्नीच आहे.

दानं वितरता दात्रा देयं पात्रं विधिर्मतिः ॥
फलैषिणाऽवबोध्यानि धीमता पञ्च तत्त्वतः ॥ २ ॥

अर्थ— फलाची इच्छा करणाऱ्या बुद्धिमान अशा दात्यानें दान, द्यावयाचें द्रव्य, देण्याचें पात्र, विधि आणि दानकालीं पाहिजे असलेली बुद्धि ह्या पांच गोष्टी वास्तविक कशा आहेत हें नीट समजून घ्यावें.

भाक्तिकं तौष्टिकं श्राद्धं सविज्ञानमलोलुपम् ॥
सात्विकं क्षमकं सन्तो दातारं सप्तधा विदुः ॥ ३ ॥

अर्थ— प्रथम दान करणारा जो दाता त्याचे भेद सांगतात- १ भाक्तिक, २ तौष्टिक, ३ श्राद्ध, ४ सविज्ञान, ५ अलोलुप, ६ सात्विक आणि ७ क्षमक असे सात प्रकार दात्याचे आहेत, असें समजातात.

यो धर्मधारिणं दत्ते स्वयं सेवापरायणः ॥
निरालस्योऽशठः शान्तो भाक्तिकः स मतो बुधैः ४

अर्थ— जो शांत आणि कपट न करणारा श्रावक धार्मिक (रत्नत्रय धारण करणाऱ्या) अशा यतीची स्वतः सेवा करण्यास

तत्पर राहून त्याला दान करतो त्याला विद्वान् लोकांनीं भाक्तिक दाता मानिलें आहे. अर्थात् तो श्रावक भाक्तिक दाता होय.

**तुष्टिर्दत्तवतो यस्य ददतश्च प्रवर्तते ॥**
**देयासक्तमतेः शुद्धास्तमाहुस्तौष्टिकं जिनाः ॥ ५ ॥**

अर्थ— द्यावयाच्या वस्तूवर ज्याची आसक्ति नाहीं असा जो श्रावक दान करीत असतां व दान केल्यानंतर संतुष्ट होतो त्याला वीतराग असे जिन तौष्टिक दाता समजतात.

**साधुभ्यो ददता दानं लभ्यते फलमीप्सितम् ॥**
**यस्यैषा जायते श्रद्धा नित्यं श्राद्धं वदन्ति तम् ६**

अर्थ— साधूला दान देणाऱ्याला इच्छित फल प्राप्त होतें अशी निरंतर श्रद्धा ज्याला असते त्याला श्राद्ध दाता ह्मणतात.

**द्रव्यं क्षेत्रं सुधीः कालं भावं सम्यग्विचिन्त्य यः ॥**
**साधुभ्यो ददते दानं सविज्ञानमिमं विदुः ॥ ७ ॥**

अर्थ— जो बुद्धिमान् श्रावक द्रव्य, क्षेत्र, काल आणि भाव ह्यांचा चांगला विचार करून साधूंना दान करतो, त्याला सविज्ञान दाता समजतात.

**त्रिधाऽपि याचते किंचिद्यो न सांसारिकं फलम् ॥**
**ददानो योगिनां दानं भाषन्ते तमलोलुपम् ॥ ८ ॥**

अर्थ— जो दान करीत असतां संसारांत प्राप्त होणाऱ्या स्वल्प फलाची सुध्दां मन, वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानेंहि इच्छा करीत नाहीं; तो अलोलुप दाता होय; असें ह्मणतात.

**स्वल्पवित्तोऽपि यो दत्ते भक्तिभारवशीकृतः ॥**
**स्वाढ्याश्चर्यकरं दानं सात्विकं तं प्रचक्षते ॥ ९ ॥**

अर्थ— आपल्या जवळ द्रव्य थोडें असूनही जो अतिशय

भक्तीनें वश केलेला असा होत्साता मधुर आणि आश्चर्यकारक असे पदार्थ दान करतो त्याला सात्विक दाता ह्मणतात.

कालुष्यकारणे जाते दुर्निवारे महीयसि ॥
यो न कुप्यति केभ्योऽपि क्षमकं कथयन्ति तम् १०

अर्थ— निवारण करण्याला कठिण व फार मोठें असें मन बिघडण्याचें कारण उत्पन्न झालें असतांही जो कोणांवरही रागवत नाहीं त्याला क्षमक दाता ह्मणतात.

सर्वैरलंकृतो वर्यो जघन्यो वर्जितो गुणैः ॥
मध्यमोऽनेकधाऽवाचि दाता दानविक्षणैः ॥ ११ ॥

अर्थ— वर सांगितलेल्या सर्वगुणांनीं युक्त असा जो असेल तो उत्तम दाता होय. आणि वरील गुण ज्याच्यामध्यें मुळींच नाहींत तो कनिष्ठ दाता होय. मध्यमप्रतीचा दाता हा अनेक प्रकारचा आहे असें विद्वानांनीं सांगितलें आहे.

विनीतो धार्मिकः सेव्यस्तत्कालक्रमवेदकः ॥
जिनेशशासनाभिज्ञो भोगनिःस्पृहमानसः ॥ १२ ॥
दयालुः सर्वजीवानां रागद्वेषादिवर्जितः ॥
संसारासारतावेदी समदर्शी महोद्यमः ॥ १३ ॥
परीषहसहो धीरो निर्जिताक्षो विमत्सरः ॥
परात्मसमयाभिज्ञः प्रियवादी निरुत्सुकः ॥ १४ ॥
वासितो व्रतिनां पूतैः परासाधारणैर्गुणैः ॥
लोकलोकोत्तराचारविचारी सङ्घवत्सलः ॥ १५ ॥
आस्तिक्यो निरहङ्कारो वैयावृत्त्यपरायणः ॥
सम्यक्त्वालङ्कृतो दाता जायते भुवनोत्तमः १६

अर्थ— नम्र, धार्मिक, सेवा करण्याला योग्य, दान करावयाच्या वेळचा क्रम जाणणारा, जिनेंद्रानें केलेलें शास्त्र जाणणारा,

भोगाविषयीं मन निरिच्छ ठेवणारा, सर्वजीवांची दया करणारा, कोणावरही राग किंवा द्वेष न करणारा, संसाराची निःसारता जाणणारा, सर्वांवर समदृष्टि ठेवणारा, उद्योगी, परीषह सोसणारा, धीर, जितेंद्रिय, मत्सर न करणारा, श्रेष्ठ असें अध्यात्म जाणणारा, मधुर बोलणारा, विषयोपभोगाविषयीं उत्कंठित न होणारा, दुसऱ्याच्या ठिकाणीं नाहींत अशा-व्रतिकांच्या-पवित्र गुणांनीं युक्त असलेला, लौकिक व अलौकिक ( पारलौकिक ) आचारांचा विचार करणारा, संघावर प्रेम करणारा, आस्तिक, निरभिमानी, वैयावृत्य, ( साधुसेवा ) करण्यांत आसक्त आणि सम्यक्त्वानें युक्त असा जो दाता तो सर्वजगांत उत्तम होय.

**आत्मीयं मन्यते द्रव्यं यो दत्तं व्रतवर्तिनाम् ॥**
**शेषं पुत्रकलत्राद्यैस्तस्करैरिव लुण्ठितम् ॥ १७ ॥**

अर्थ— जो व्रती अशा लोकांना दिलेलें द्रव्य आपलें आहे आणि बाकीचें द्रव्य पुत्र स्त्री वगैरे चोरांनीं लुटलेलें आहे, असें मानतो, तो उत्तम दाता होय.

**यो लोकद्वितये सौख्यं कुर्वते मम साधवः ॥**
**बान्धवा दारुणं दुःखमिति पश्यंति चेतसा ॥ १८ ॥**

अर्थ— साधु हे हा लोक आणि परलोक ह्या दोन्ही ठिकाणीं मला सौख्य देणारे आहेत आणि माझे आप्त इष्ट हे मला भयंकर दुःख देणारे आहेत असें मनांत समजतो; तो उत्तम दाता होय.

**योऽत्रैव स्थावरं वेत्ति गृहकार्ये नियोजितम् ॥**
**सहगामि परं वित्तं धर्मकार्ये यथोचितम् ॥ १९ ॥**

अर्थ— गृहकृत्यांत योजिलेलें ह्मणजे संसारांत खर्च केलेलें ह्या लोकांतच स्थिर रहाणारें आहे आणि धर्मकृत्यांत योग्यप्रकारें

खर्चिलेलें द्रव्य मात्र माझ्याबरोबर यावयाचें आहे असें समजतो तो उत्तम दाता होय.

**शरदभ्रसमाकारं जीवितं यौवनं धनम् ॥**
**यो जानाति विचारज्ञो दत्ते दानं स सर्वदा ॥२०॥**

अर्थ— जो विचारी श्रावक जीवित, तारुण्य आणि द्रव्य हीं सर्व शरदृतूंतील मेघासारखीं आहेत असें समजतो, तो सर्वदा दान करतो.

**यो न दत्ते तपस्विभ्यः प्रासुकं दानमञ्जसा ॥**
**न तस्यात्मम्भरेः कोऽपि विशेषो विद्यते पशोः २१**

अर्थ— जो श्रावक तपस्व्यांना तत्काल दान करीत नाहीं त्या आपल्याच पोटाची खळगी भरणाऱ्याला पशूपेक्षां कोणताही निराळेपणा नाहीं— तो पशूच होय.

**गृहं तदुच्यते तुङ्गं तर्प्यन्ते यत्र योगिनः ॥**
**निगद्यते परं प्राज्ञैः शारदं घनमण्डलम् ॥ २२ ॥**

अर्थ— ज्या ठिकाणीं योगिजन तृप्त केले जातात त्या घराला विचारी लोक मोठें घर ह्मणतात. आणि दुसऱ्या प्रकारचें ह्मणजे ज्यांत योगिजनांची तृप्ति केली जात नाहीं, तें घर विचारी लोक शरदृतूंतील ढगाप्रमाणें समजतात.

**यौतपादाम्भसा सिक्तं साधूनां सौधमुच्यते ॥**
**अपरं कर्दमालिप्तं मर्त्यचातकबन्धनम् ॥ २३ ॥**

अर्थ— साधूंच्या चरणप्रक्षालनाच्या उदकानें भिजलेल्या घरासच सौध ( वाडा ) ह्मणतात. आणि ह्याच्या विरुद्ध असलेलें घर हें मनुष्यरूपी चातकपक्ष्याला कोंडून ठेवण्याचें घरटें होय.

**स गृही भण्यते भव्यो यो दत्ते दानमञ्जसा ॥**
**न परो गेहयुक्तोऽपि पतत्रीव कदाचन ॥ २४ ॥**

अर्थ— जो भव्य श्रावक खरोखर दान करतो त्यालाच गृही ( गृहस्थ ) ह्मणतात. आणि दुसऱ्या प्रकारचा श्रावक पक्ष्याप्रमाणें जरी घर करून रहात असला तथापि त्याला गृही ह्मणत नाहींत.

**किं द्रव्येण कुबेरस्य किं समुद्रस्य वारिणा ॥**
**किमन्धसा गृहस्थस्य भक्तिर्यत्र न योगिनाम् २५**

अर्थ— कुबेराचें द्रव्य आणि समुद्राचें पाणी ह्यांचा काय उपयोग आहे? कांहीं नाहीं. त्याप्रमाणेंच ज्या ठिकाणीं योगिजनांची भक्ति नाहीं त्या गृहस्थाच्या अन्नाचा तरी काय उपयोग आहे? कांहीं नाहीं.

**ध्यानेन शोभते योगी संयमेन तपोधनः ॥**
**सत्येन वचसा राजा गृही दानेन चारुणा ॥ २६ ॥**

अर्थ— योगी हा ध्यानानें शोभतो, तपस्वी संयमानें शोभतो, राजा सत्य भाषणानें शोभतो, आणि उत्तम अशा दानानें गृहस्थ शोभतो.

**तपोधनं गृहायातं यो न गृण्हाति भाक्तिकः ॥**
**चिन्तामणिं करं प्राप्तं स कुधीस्त्यजति स्फुटम् २७**

अर्थ—जो श्रावक गृहांत आलेल्या तपोधनाचा आदर करीत नाहीं तो दुर्बुद्धि हातांत आलेल्या चिंतामणीचा त्याग करतो हें स्पष्ट आहे.

**म्रियमाणं धनं धिष्ण्ये साधुभ्यो यो न यच्छति ॥**
**स वञ्चयति मूढात्मा स्वयमात्मानमात्मना ॥ २८ ॥**

अर्थ— जो मूर्ख श्रावक घरांत असलेलें द्रव्य साधूंना देत नाहीं, तो आपणच आपल्याला फसतो.

**स भण्यते गृहस्वामी यो भोजयति योगिनः ॥**

**कुर्वाणो गृहकर्माणि परं कर्मकरं विदुः ॥ २९ ॥**

अर्थ— घरांतील सर्व कृत्यें करणारा असा जो श्रावक योग्यांना अन्नदान करतो तोच घरचा मालक होय असें ह्मणतात. आणि जो तसा नसेल त्याला नुसता कामकरी समजतात.

**यः सर्वदा क्षुधां धृत्वा साधुवेलां प्रतीक्षते ॥**
**स साधूनामलाभेऽपि दानपुण्येन युज्यते ॥ ३० ॥**

अर्थ— जो आपली क्षुधा आवरून साधूच्या येण्याच्या कालाची वाट पहात बसतो, तो साधूचा लाभ जरी झाला नाहीं तथापि दानाच्या पुण्यानें युक्त होतो. ह्मणजे साधू जरी त्याच्या घरीं आला नाहीं तथापि त्याला दान केल्याचें पुण्य प्राप्त होतें.

**भवने नगरे ग्रामे कानने दिवसे निशि ॥**
**यो धत्ते योगिनश्चित्ते दत्तं तेभ्योऽमुना ध्रुवम् ३१**

अर्थ— घर, नगर, गांव, अरण्य ह्यांपैकीं कोठेंही असतां दिवसा किंवा रात्रीं जो मनांत योग्यांचें चिंतन करतो, त्यानें त्यांना दान केलेंच असें होतें.

**यः सामान्येन साधूनां दानं दातुं प्रवर्तते ॥**
**त्रिकालगोचरास्तेन भोजिताः पूजिताः स्तुताः ३२**

अर्थ— जो श्रावक सामान्यपणें साधूंना दान करण्याविषयीं प्रवृत्त होतो त्यानें तिन्हीं कालीं साधूंची पूजा, स्तुति आणि दान हीं केलीं असें समजावें.

**दत्ते दूरेऽपि यो गत्वा विमृश्य व्रतपालिनः ॥**
**स स्वयं गृहमायाते कथं दत्ते न योगिनि ॥ ३३ ॥**

अर्थ— जो श्रावक दूर जाऊन व्रती अशा साधूला शोधून देखील काढून दान करतो तो आपण होऊन घरीं आलेल्या योग्याला कसें दान करणार नाहीं?

**सद्रव्याद्रव्ययोर्मध्ये यः पात्रं प्राप्य भक्तितः ॥**
**ददानः कथ्यते दाता न दाता भक्तिवर्जितः ३४**

अर्थ— धनिक आणि दरिद्री ह्या दोघांत जो योग्य पात्र प्राप्त झालें असतां भक्तीनें दान करतो त्याला दाता ह्मणतात. आणि जो भक्ति नसतां दान करतो त्याला दाता ह्मणत नाहींत.

**पात्रे ददाति योऽकाले तस्य दानं निरर्थकम् ॥**
**क्षेत्रेऽप्युप्तं विना कालं कुत्र बीजं प्ररोहति ॥३५॥**

अर्थ— जो योग्य पात्रालाही अकालीं दान करतो त्याचें दान निरर्थक होय. कारण, चांगल्या शेतांतही जर अकालीं बीज पेरलें तर तें कोठें उगवतें?

**काले ददाति योऽपात्रे वितीर्णं तस्य नश्यति ॥**
**निक्षिप्तमूषरे बीजं किं कदाचिदवाप्यते ॥ ३६ ॥**

अर्थ— जो योग्य कालीं अपात्राला दान करतो, त्याचें दान नाश पावतें. कारण, उकिरड्यांत पेरलेलें बीं केंव्हांतरी उगवतें काय? नाहीं.

**प्रक्रमेण विना वन्ध्यं वितीर्णं पात्रकालयोः ॥**
**फलाय किमसंस्कारं विक्षिप्तं क्षेत्रकालयोः ॥ ३७ ॥**

अर्थ— योग्यपात्रीं आणि योग्याकालीं दिलेलें दान जर सांगितलेल्या विधीवांचून दिलें तर तेंही निष्फलच होतें. योग्य कालीं भूमीला करावयाचा संस्कार ( मशागत ) केल्यावांचून चांगल्या शेतांत जरी बीं पेरलें; तरी त्याच्यापासून फल उत्पन्न होईल काय? होणार नाहीं.

**कालं पात्रं विधिं ज्ञात्वा दत्तं स्वल्पमपि स्फुटम् ॥**
**उप्तं बीजमिव प्राज्ञैर्विधत्ते विपुलं फलम् ॥ ३८ ॥**

अर्थ— ह्मणून काल पात्र आणि विधि ह्यांना समजून जरी

थोडेंही दान केलें तथापि तें शहाण्यानें पेरलेल्या बीजाप्रमाणें विपुल फल देतें.

देयं स्तोकादपि स्तोकं व्यपेक्षो न महोदयः ॥
इच्छानुसारिणी शक्तिः कदा कस्य प्रजायते ३९

अर्थ— आपल्या जवळ असलेल्या थोड्याशा द्रव्यांतूनही थोडेसेंच द्रव्य दान करावें. त्याकरितां कांहीं मोठ्या संपत्तीची आवश्यकता नाहीं. कारण, आपल्या इच्छेप्रमाणें शक्ति केव्हां तरी व कोणाला तरी प्राप्त होते काय? मुळींच होत नाहीं. ह्मणून आपल्याजवळ जरी थोडें द्रव्य असलें तथापि त्यांतून थोडेंच द्रव्य दानाकडे लावावें.

श्रुत्वा दानमतिर्वर्यो भण्यते वीक्ष्य मध्यमः ॥
श्रुत्वा दृष्ट्वा च यो दत्ते दानं स च जघन्यकः ४०

अर्थ— दान करण्याविषयीं शास्त्रांत सांगितलें आहे असें ऐकून ज्याला दान करण्याची बुद्धि होते तो उत्तम होय. दुसऱ्यानें दान केलेलें पाहून ज्याला दान करण्याची बुद्धि होते तो मध्यम होय. आणि ऐकून व पाहून जो दान करतो तो कनिष्ठ दाता होय. असें ह्मणतात.

ताडनं पीडनं स्तेयं रोषणं दूषणं भयम् ॥
कृत्वा ददाति यो दानं स दाता न मतो जिनैः ४१

अर्थ— मारून, पीडा करून, चोरी करून, रागावून, दोष देऊन आणि भय दाखवून जो दान करितो त्याला जिनेंद्र दाता मानीत नाहींत.

पटीयसा सदा दानं प्रदेयं प्रियवादिना ॥
प्रियेण रहितं दत्तं परमं वैरकारणम् ॥ ४२ ॥

अर्थ— ह्मणून शहाण्या मनुष्यानें गोड बोलून नेहमीं दान

करावें. कारण, मधुर भाषण न करितां केलेलें दान मोठ्या द्वेषाला कारण होतें.

य: समापाकृतं वित्तं विश्राणयति दुर्मतिः ॥
कलिं गृह्णाति मूल्येन दुर्निवारमसौ ध्रुवम् ॥ ४३ ॥

अर्थ— जो दुर्बुध्दि श्रावक समबुध्दीचा त्याग करून द्रव्य दान करतो; तो त्या द्रव्यरूपी मूल्यानें दुर्वार असा कलह आपल्या घरीं आणतो हें निश्चित होय.

जीवा येन निहन्यन्ते येन पात्रं विनाश्यते ॥
रागो विवर्धते येन यस्मात्सम्पद्यते भयम् ॥ ४४ ॥
आरम्भा येन जन्यन्ते दुःखितं यच्च जायते ॥
धर्मकामैर्न तद्देयं कदाचन निगद्यते ॥ ४५ ॥

अर्थ— ज्याच्या योगानें जीवांची प्राणहानि केली जाते असे भूमी वगैरे पदार्थ दान करूं नयेत. ज्यानें पात्राचा ह्मणजे दान घेणाऱ्याचा नाश होतो, ज्याच्यायोगानें राग वृद्धि पावतो, ज्याच्यापासून भय उत्पन्न होतें असे पदार्थ ( सुवर्ण वगैरे पदार्थ; ) ज्याच्या योगानें कृषि वगैरे आरंभ केले जातात अशा घर, बैल, नांगर वगैरे वस्तु, आणि जी वस्तु दान करावयाच्या वेळी दुःखित होते; हे सर्व पदार्थ धर्माची इच्छा करणाऱ्यांनीं केव्हांही दान करूं नयेत; असें शास्त्रकार सांगतात.

हलैर्विदार्यमाणायां गर्भिण्यामिव योषिति ॥
म्रियन्ते प्राणिनो यस्यां सा भूः किं ददतः फलम्

अर्थ— ज्याप्रमाणें गर्भवती स्त्रीला फाडली असतां तिच्या ठिकाणीं जीवनाश होतो त्याप्रमाणें जिला नांगराच्या योगानें फाडली असतां ( नांगरली असतां ) अनेक जीव मरतात अशी ही भूमि आहे; ह्मणून ती देणाऱ्याला फल काय मिळणार आहे?

मुळींच मिळणार नाहीं. तात्पर्य–भूमिदान केल्यानें जीववध होत असल्यामुळें तें करूं नये.

**सर्वत्र भ्रमता येन कृतान्तेनेव देहिनः ॥**
**विपाट्यन्ते न तल्लोहं दत्तं कस्यापि शान्तये ॥ ४७ ॥**

अर्थ— जें चोहींकडे फिरूं लागलें असतां यमाप्रमाणें प्राण्यांचीं शरीरें फाडतें तें लोखंड दिल्यानें कोणाची शांति होणार आहे बरें? कोणाचीच होणार नाहीं. ह्मणून तें देऊं नये.

**यदर्थं हिंस्यते पात्रं यत्सदा भयकारणम् ॥**
**संयमा येन हीयन्ते दुष्कालेनेव मानवाः ॥ ४८ ॥**
**रागद्वेषमदक्रोधलोभमोहमनोभवाः ॥**
**जन्यन्ते तापका येन काष्ठेनेव हुताशनाः ॥ ४९ ॥**
**तद्येनाष्टापदं यस्य दीयते हितकाम्यया ॥**
**स तस्याष्टापदं मन्ये दत्ते जीवितशान्तये ॥ ५० ॥**

अर्थ— ज्याच्या करितां लोक एखाद्या सत्पात्राची सुद्धां हिंसा करितात, जें नेहमीं भय उत्पन्न करणारें असतें, ज्याप्रमाणें दुष्काळामुळें मनुष्यें मरतात त्याप्रमाणें ज्याच्यामुळें संयमांचा नाश होतो, काष्ठापासून जसा अग्नि उत्पन्न होतो त्याप्रमाणें ज्यापासून अतिशय ताप देणारे असे राग, द्वेष, मद, क्रोध, लोभ, मोह आणि मदन हे विकार उत्पन्न होतात; तें अष्टापद ( सुवर्ण ) जो श्रावक कल्याण होण्याच्या इच्छेनें देतो; त्यानें त्या दान घेणाऱ्याच्या जीविताची शांति होण्याकरितां ( नाश होण्याकरितां ) अष्टापद ( शरभ नांवाचा आठ पायाचा क्रूर पशु ) दिला असेंच समजावें. तात्पर्य— जर शरभ नांवाचा क्रूर पशु एखाद्यानें एखाद्याला दिला तर तो घेणाराला प्राणनाशच करतो त्याप्रमाणें सुवर्ण हेंही घेणाऱ्याच्या जीवाला

अपायच करणारें असल्यामुळें त्याचें दान केव्हांही करूं नये.

संसजन्त्यङ्गिनो येषु भूरिशस्त्रसकायिकाः॥
फलं विश्राणने तेषां तिलानां कल्मषं परम्॥५१॥

अर्थ— तिळांमध्यें त्रसकायिक जीव पुष्कळ उत्पन्न होतात. ह्मणून ते दान देणें हें मोठें पातक आहे.

प्रारम्भा यत्र जायन्ते चित्राः संसारहेतवः॥
तत्सद्म ददतो घोरं केवलं कलिलं फलम्॥५२॥

अर्थ— ज्या ठिकाणीं संसार वाढविणारे असे अनेक प्रकारचे आरंभ (पापकृत्यें) उत्पन्न होतात असें घर दान करणाऱ्यास फक्त भयंकर पाप हेंच फल आहे.

पीडा सम्पद्यते यस्या वियोगे गोनिकायतः॥
यया जीवा निहन्यन्ते पुच्छशृङ्गखुरादिभिः॥५३॥
यस्यां प्रदुह्यमानायां तर्णकः पीड्यते तराम्॥
तां गां वितरतो श्रेयो लभ्यते न मनागपि॥५४॥

अर्थ— जिला कळपांतून काढला असतां मोठी पीडा होते, जी शेंपूट शिंगें खुर इत्यादिकांनीं अनेक जीवांचा नाश करिते, जिची धार काढली असतां वासराला अतिशय पीडा होते ती गाय दान करणाऱ्याला थोडें सुद्धां पुण्य प्राप्त होत नाहीं.

या सर्वतीर्थदेवानां निवासीभूतविग्रहा॥
दीयते गृह्यते सा गौः कथं दुर्गतिगामिभिः॥५५॥

अर्थ— जिचा देह सर्व तीर्थ आणि सर्व देव ह्यांचें निवासस्थान होय असें ह्मणतात (मिथ्यावादी लोक ह्मणतात) ती गाय दुर्गतीला जाणारे लोक देतात तरी कशी? आणि घेतात तरी कशी? अर्थात् त्या गायीवर मिथ्यावादी लोकांच्या मताप्रमाणें विचार केला असतां देवादिकांचें स्वामित्व असल्यानें तिचें

अर्थ— ह्या लोकीं गंगानदींत हाडें टाकिल्यानें जर मृत झालेला जीव चिरकाल सुखी होतो, तर मग जळून राख झालेला वृक्ष पाण्यानें सेंचन केला असतां पालवी फुटलेला होतो असें मानिलें पाहिजे.

उपयाचन्ते देवान्नष्टधियो ये धनादि ददमानाः ॥
ते सर्वस्वं दत्वा नूनं क्रीणन्ति दुःखानि ॥ ६५ ॥

अर्थ— जे मूर्ख लोक द्रव्य वगैरे देऊन देवांना नवस करतात, ते आपली सर्वसंपत्ति देऊन दुःखें विकत घेतात असें ह्मणावें लागतें.

पूर्णे काले देवैर्न रक्ष्यते कोऽपि नूनमुपयातैः ॥
चित्रमिदं प्रतिबिम्बैरचेतनै रक्ष्यते तेषाम् ॥ ६६ ॥

अर्थ— आयुष्याचा काल पूर्ण झाला असतां साक्षात् देव जरी जवळ आले तथापि ते सुद्धां रक्षण करण्याला समर्थ नसतात हें खचित आहे. असें असून त्या देवांचींच अचेतन अशीं प्रतिबिंबें रक्षण करतात ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे!

मांसं यच्छन्ति ये मूढा ये च गृह्णन्ति लोलुपाः ॥
द्वये वसन्ति ते श्वभ्रे हिंसामार्गप्रवर्तिनः ॥ ६७ ॥

अर्थ— मूर्ख लोक मांसाचें दान करतात; आणि जे लोभी तें घेतात, ते दोघेही हिंसामार्गाची प्रवृत्ति करणारे असल्यामुळें नरकांत रहातात.

धर्मार्थं ददते मांसं ये नूनं मूढबुद्धयः ॥
जिजीविषन्ति ते दीर्घं कालकूटविषाशिनः ॥ ६८ ॥

अर्थ— जे मूढबुद्धि लोक धर्म ह्मणून मांस देतात ते कालकूट नांवाचें विष भक्षण करून दीर्घकाल जगण्याची इच्छा करतात.

तादृशं यच्छतां नास्ति पापं दोषमजानताम् ॥
यादृशं गृह्णतां मांसं जानतां दोषमूर्जितम् ६९ ॥

अर्थ— मांसदानानें मोठा दोष होतो असें जाणणाऱ्याला मांसदान घेतल्यामुळें ज्या प्रकारचें पाप लागतें त्या प्रकारचें पाप दोष माहीत नसलेल्या लोकांनीं तें दिलें असतां लागत नाहीं.

दाता दोषमजानानो दत्ते धर्मधियाऽखिलम् ॥
यः स्वीकरोति तद्दानं पात्रं तेषां तु सर्वथा ॥ ७० ॥

अर्थ— दानांतील दोष न समजणारा दाता धर्मबुद्धीनें पाहिजे तें देतो. परंतु, तीं दानें स्वीकारतो तो त्या सर्व दोषांचें पात्र होतो.

बहूनि तानि दानानि विधिरेषा न शेमुषी ॥
विपद्येत तरां प्राणी भूरिभिर्भक्षितैर्विषैः ॥ ७१ ॥

अर्थ— तीं पुष्कळ दानें करणें हा विधि आहे अशी बुद्धि चांगली नाहीं. कारण, पुष्कळ प्रकारचीं विषें भक्षण केल्यानें प्राणी खचित मरणारच!

अल्पं जिनमतं दानं ददन्तिदं न कोविदाः ॥
पीयूषेणोपभुक्तेन किं नाल्पेनापि जीव्यते ॥ ७२ ॥

अर्थ— जिनांना मान्य असलेलें अल्प अशा प्रकारचें हें अन्नदान विद्वान लोक देत नाहींत काय? अवश्य देतात. कारण, अमृत हें जरी थोडेंच प्राशन केलें तथापि त्याच्या योगानें मनुष्य जगत नाहीं काय? अवश्य जगतो.

गृहीतुः कुरुते सौख्यं दानैस्तैरखिलैर्यतः ॥
पुण्यभागी ततो दाता नेदं वचनमञ्चितम् ॥ ७३ ॥

अर्थ- आतां जर कोणी "तीं जीं कुदानें आहेत तीं सर्व दिलीं असतां ज्या अर्थी दाता हा दान घेणाऱ्याला सौख्य

उत्पन्न करतो त्या अर्थी तीं दानें देणारा दाता पुण्यवान् होतो" असें म्हणेल, तर तें म्हणणें योग्य नाहीं.

आपाते लभते सौख्यं विपाके दुःखमुल्बणम् ॥
अपथ्यैरिव तैर्दानैर्दुर्ज्जरैर्जननिन्दितैः ॥ ७४ ॥

अर्थ— कारण, न जिरण्यासारखीं लोकांनीं अगदीं वाईट ठरविलेलीं अशीं अपथ्यें ज्याप्रमाणें आरंभीं सुख व परिणामीं तीव्र दुःख देतात; त्याप्रमाणें ह्या कुदानांच्या योगानें प्रथम सुख व परिणामी तीव्र दुःख होतें.

आपातसुखदैः पुण्यमन्ते दुःखवितारिभिः ॥
भूमिदानादिभिर्दत्तैर्न किम्पाकफलैरिव ॥ ७५ ॥

अर्थ— ज्यांचा परिणाम वाईट होतो अशीं फळें दिल्यानें ज्याप्रमाणें पुण्य नाहीं, त्याप्रमाणें प्रथम सुख देणारीं व शेवटीं दुःख देणारीं अशीं भूमिदानादिक दानें दिल्यानें मुळींच पुण्य नाहीं

प्रचुरापात्रसंघातं मर्दयित्वाऽपि पोषिते ॥
पात्रे सम्पद्यते धर्मो नैषा भाषा प्रशस्यते ॥ ७६ ॥

अर्थ— पुष्कळ अशा अपात्र जीवांच्या (दान करण्याला अयोग्य अशा जीवांच्या ] समुदायाला पीडा करूनही एकाच पात्राचें पोषण केलें असतां धर्म होतो, हें बोलणेंही प्रशस्त नाहीं.

निहत्य भेकसन्दर्भं यः प्रीणाति भुजङ्गमम् ॥
सोऽश्नुते यादृशं पुण्यं नूनमन्योऽपि तादृशम् ॥७७॥

अर्थ— अनेक बेडूक मारून जो सर्पाचा संतोष करतो तो ज्याप्रकारचें पुण्य मिळवितो; तसलेंच पुण्य अनेक अपात्रांना पीडा करून एका पात्राचें पोषण करणारा मिळवितो.

आत्मीकरोति यो दानं जीवमर्दनसम्भवम् ॥
आकांक्षन्नात्मनः सौख्यं पात्रता तस्य कीदृशी ७८

अर्थ— अनेकजीवांना पीडा केल्यापासून उत्पन्न होणाऱ्या वस्तूचें दान आपल्याला सौख्य व्हावें अशी इच्छा करणारा जो मनुष्य स्वीकारतो, त्याची पात्रता कसली?

न सुवर्णादिकं देयं न दाता तस्य दायकः ॥
न च पात्रं गृहीताऽस्य जिनानामिति शासनम् ॥

अर्थ— सुवर्णादिक वस्तु दान देऊं नयेत; त्या वस्तु देणारा दाता होत नाहीं; आणि त्या वस्तु दान घेणारा पात्रही होत नाहीं; असें जिनांचें शास्त्र आहे.

पात्रं विनाशितं तेन तेनाधर्मः प्रवर्तितः ॥
येन स्वर्णादिकं दत्तं सर्वानर्थविधायकम् ॥ ८० ॥

अर्थ— ज्यानें सर्व अनर्थाला उत्पन्न करणाऱ्या सुवर्णादिक वस्तु दान केल्या; त्यानें पात्राच्या योग्यतेचा नाश करून अधर्माची प्रवृत्ति केली.

रागो निषूद्यते येन येन धर्मो विवर्द्धते ॥
संयमः पोष्यते येन विवेको येन जन्यते ॥ ८१ ॥
आत्मोपशम्यते येन येनोपाक्रियते परः ॥
न येन नाश्यते पात्रं तद्दातव्यं प्रशस्यते ॥ ८२ ॥

अर्थ— ज्याच्या योगानें रागादि दोषांचा नाश होतो, ज्यानें धर्माची वृद्धि होते, ज्यानें संयमाचें पोषण होतें, ज्यानें विचार उत्पन्न होतो, ज्यानें आत्म्याची शांति होते, ज्यानें दुसऱ्यावर उपकार होतो आणि ज्यानें पात्राची ह्मणजे दान घेणाऱ्याची योग्यता जात नाहीं तें दान प्रशस्त होय.

अभयान्नौषधज्ञानभेदतस्तच्चतुर्विधम् ॥
दानं निगद्यते सद्भिः प्राणिनामुपकारकम् ॥ ८३ ॥

अर्थ— तें प्रशंसनीय दान अभयदान, अन्नदान, औषधदान आणि ज्ञानदान असें चार प्रकारचें असून तें सर्वप्राण्यावर उपकार करणारें आहे असें सज्जन सांगतात.

धर्मार्थकाममोक्षाणां जीवितव्ये यतः स्थितिः ॥
तद्दानतस्ततो दत्तास्ते सर्वे सन्ति देहिनाम् ॥८४॥

अर्थ— वर सांगितलेल्या त्या पदार्थांच्या दानापासून ज्या अर्थी धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या चार प्रकारच्या पुरुषार्थांमध्यें जीवांची आपल्या आयुष्यांत स्थिति होते, ह्मणजे ज्या दानामुळें सर्व जीव आपल्या आयुष्याच्या काळांत धर्मादि पुरुषार्थांच्या साधनांतच असतात, त्या अर्थी तें दान केल्यानें त्या जीवांना धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे पुरुषार्थच दिले असें होतें.

देवैरुक्तो वृणीष्वैकं त्रैलोक्यप्राणितव्ययोः ॥
त्रैलोक्यं वृणुते कोऽपि न परित्यज्य जीवितम् ८५

अर्थ— जर देवांनीं एखाद्याला " त्रैलोक्य आणि जीवित ह्यापैकीं एक कोणतेंही माग " असें सांगितलें तर जीविताचा त्याग करून त्रैलोक्य कोणीही मागणार नाहीं.

त्रैलोक्यं न यतो मूल्यं जीवितव्यस्य जायते ॥
तद्रक्षता ततो दत्तं प्राणिनां किं न कांक्षितम् ८७

अर्थ— कारण, त्रैलोक्य हें देखील जीवीताची किंमत होत नाहीं. ह्मणून त्या जीवीताचें ज्यानें रक्षण केलें त्यानें जीवांचें कोणतें अभीष्ट दिलें नाहीं बरें? सर्व इच्छित पूर्ण केलें ह्यांत संशय नाहीं.

नाभीतिदानतो दानं समस्ताधारकारणम् ॥
महीयो निर्मलं नित्यं गगनादिव विद्यते ॥ ८८ ॥

अर्थ— अभयदानापेक्षां दुसरें कोणतेंही दान सर्वजीवांना आश्रय देणारें नाहीं. हें दान निर्मल असून नित्य ह्मणजे अविनाशी आहे. आणि आकाशापेक्षांही हें फार मोठें आहे.

**आहारेण विना पुंसां जीवितव्यं न तिष्ठति ॥**
**आहारं यच्छता दत्तं ततो भवति जीवितम् ॥ ९०**

अर्थ— आहारावांचून मनुष्यांचें जीवित रहात नाहीं, ह्मणून आहारदान करणाऱ्यानें जीवदान केल्यासारखें होतें.

**नेत्रानन्दकरं सेव्यं सर्वचेष्टाप्रवर्तनम् ॥**
**अन्धसा धार्यते गात्रं जीवितेनेव जन्मिनाम् ॥९१**

अर्थ— नेत्राला आनंद देणारें, सेवन करण्यास योग्य आणि सर्वप्रकारच्या क्रिया करणारें असें शरीर हें जीवानें जसें आयुष्यानें धारण केलेलें असतें; तसेंच अन्नानें धारण केलें आहे.

**कान्तिः कीर्तिर्मतिः क्षान्तिः शान्तिर्नीतिर्गती रतिः**
**उक्तिः शक्तिर्द्युतिः प्रीतिः प्रतीतिः श्रीर्व्यवस्थितिः**
**आहारवर्जितं देहं सर्वा मुञ्चन्ति तत्त्वतः ॥**
**द्रविणापाकृतं मर्त्यं वेश्या इव मनोरमाः ॥ ९३ ॥**

अर्थ— सुंदर अशा वेश्या ज्याप्रमाणें द्रव्यरहित झालेल्या मनुष्याला सोडून देतात, त्याप्रमाणें कांति, कीर्ति, बुद्धि, क्षमा, शांति, नीति, गति, रति, उक्ति ( भाषण ) शक्ति, द्युति, ( तेजस्विता ), प्रीति, प्रतीति [ ज्ञान ], लक्ष्मी आणि व्यवस्थिति ( व्यवस्थितपणा ) ह्या सर्व, आहार सोडलेल्या देहाला खरोखर सोडून जातात.

**शमो दमो दया धर्मः संयमो विनयो नयः ॥**
**तपो यशो वचोदाक्ष्यं दीयतेऽन्नप्रदायिना ॥ ९४ ॥**

अर्थ— शम [ कषायांची मंदता ], ( दम इंद्रियदमन ), दया,

धर्म, संयम, विनय, तप, यश आणि भाषणचातुर्य हे गुण अन्नदान करणाऱ्यानें दिले जातात.

क्षुद्रोगेण समो व्याधिराहारेण समौषधिः ॥
नासीन्नास्ति न वा भावि सर्वव्यापारकारिणी ९५

अर्थ— क्षुधा ह्या रोगासारखा दुसरा रोग; आणि सर्व व्यवहार योग्यप्रकारें चालविणारें अन्नासारखें दुसरें औषध पूर्वी नव्हतें, आतां नाहीं आणि पुढेंही होणार नाहीं.

दुर्गन्धं क्वथितं शीर्णं विवर्णं नष्टचेष्टितम् ॥
भोजनेन विना गात्रं जायते मृतकोपमम् ॥ ९६ ॥

अर्थ— भोजनावांचून हें शरीर दुर्गंधी, उकडल्यासारखें, गळलेलें, कलाविहीन आणि निष्क्रिय असें मृतशरीरासारखें होतें.

न पश्यति न जानाति न शृणोति न जिघ्रति ॥
न स्पृशति न वा वक्ति भोजनेन विना जनः ९७

अर्थ— भोजन नसलें तर मनुष्य पहात नाहीं, जाणत नाहीं, ऐकत नाहीं, वास घेत नाहीं, स्पर्श करीत नाहीं आणि बोलतही नाहीं. ह्मणून अन्न अवश्य पाहिजे.

प्रविक्रीयान्नकृच्छ्रेषु कान्ताकन्यातनूभुवः ॥
आहारं गृह्णते लोका वल्लभानपि निश्चितम् ॥९८॥

अर्थ— अन्नाचें संकट पडलें असतां आपल्याला प्रिय असलेल्या स्त्री कन्या पुत्र ह्यांनादेखील विकून लोक अन्न घेतात हें खरें आहे.

यया खादन्त्यभक्ष्याणि क्षुधया क्षपिता जनाः ॥
सा हन्यतेऽशनेनैव राक्षसीव भयंकरी ॥ ९९ ॥

अर्थ— ज्या क्षुधेमुळें व्याकूळ झालेले लोक अभक्ष्य पदार्थही भक्षण करतात, ती राक्षसीप्रमाणें भयंकर अशी क्षुधा अन्नानें मारली जाते.

**यथैवाहारमात्रेण शरीरं रक्ष्यते नृणाम् ॥**
**चामीकरस्य कोटीभिर्बह्वीभिरपि नो तथा ॥१००॥**

अर्थ— ज्याप्रमाणें नुसत्या भोजनानें मनुष्यांच्या शरीराचें रक्षण होतें त्याप्रमाणें सुवर्णाच्या अनेक कोटी जरी असल्या तथापि होत नाहीं.

**क्षिप्रं प्रकाश्यते सर्वमाहारेण कलेवरम् ॥**
**नभो दिवाकरेणेव तमोजालावगुण्ठितम् ॥ १०१ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें अंधकाराच्या जाळ्यानें व्यापलेलें आकाश सूर्याच्या योगानें प्रकाशित होतें, त्याप्रमाणें हें सर्व शरीर आहाराच्या योगानें त्वरित प्रकाशित होतें. ह्मणजे टवटवीत दिसूं लागतें.

**न शक्नोति तपः कर्तुं सरोगः संयतो यतः ॥**
**ततो रोगापहारार्थं देयं प्रासुकमौषधम् ॥ १०२ ॥**

अर्थ — रोगानें युक्त असलेला संयमी ज्या अर्थी तप करण्याला समर्थ होत नाहीं, त्या अर्थी त्याला त्याच्या रोगाच्या नाशाकरितां प्रासुक ( निर्जंतुक ) असें औषध अवश्य दान करावें.

**न देहेन विना धर्मो न धर्मेण विना सुखम् ॥**
**यतोऽतो देहरक्षार्थं भैषज्यं दीयते यतेः ॥ १०३ ॥**

अर्थ— ज्याकरितां शरीरावांचून धर्म होत नाहीं व धर्मावांचून सुख होत नाहीं, त्याकरितां यतीला देहाच्या रक्षणास्तव औषध दिलें जातें.

**शरीरं संयमाधारं रक्षणीयं तपस्विनाम् ॥**
**प्रासुकैरौषधैः पुंसा यत्नतो मुक्तिकांक्षिणा ।१०४।**

अर्थ— तपश्चर्या करणाऱ्याचें शरीर हें संयमाला आधारभूत असें असल्यामुळें तें मोठ्या प्रयत्नाच्या योगानें मुक्तीची इच्छा

करणाऱ्या मनुष्यानें प्रासुक औषधांनीं रक्षण करण्याला योग्य आहे. ह्मणजे औषध देऊन त्याचें रक्षण अवश्य केलें पाहिजे.

**विवेको जन्यते येन संयमो येन पाल्यते ॥**
**धर्मः प्रकाश्यते येन मोहो येन निहन्यते ॥ १०५॥**
**मनो नियम्यते येन रागो येन निकृत्यते ॥**
**तद्देयं भव्यजीवानां शास्त्रं निर्धूतकल्मषम् १०६**
**विवेको न विना शास्त्रं तद्दते न तपो यतः ॥**
**ततस्तपोविधानार्थं देयं शास्त्रमनिन्दितम् ॥१०७॥**

अर्थ— ज्यानें विवेक उत्पन्न होतो, ज्यानें संयमाचें रक्षण होतें, ज्यानें धर्माचें स्पष्ट ज्ञान होतें, ज्यानें मोहाचा नाश केला जातो, ज्यानें मन ताब्यांत ठेविलें जातें, ज्यानें राग घालविला जातो तें पातकाचा नाश करणारें शास्त्र भव्यजीवांना अवश्य दान करावें. शास्त्रज्ञान असल्यावांचून विवेक होत नाहीं, आणि विवेकावांचून तप होत नाहीं; असें असल्यामुळें तपश्चर्या होण्याकरितां निर्दोष अशा शास्त्राचें दान अवश्य करावें.

**वस्त्रपात्राश्रयादीनि पराण्यपि यथोचितम् ॥**
**दातव्यानि विधानेन रत्नत्रितयवृद्धये ॥ १०८ ॥**

अर्थ— वस्त्र, पात्र, घर, आणि दुसरेही योग्य पदार्थ योग्यप्रकारें योग्यविधीनें दान करावेत. ते रत्नत्रयाच्या वृद्धीकरितां दान करावेत.

**वर्यमध्यजघन्यानां पात्राणामुपकारकम् ॥**
**दानं यथायथं देयं वैयावृत्यविधायिना ॥ १०९ ॥**

अर्थ— वैयावृत्य करणाऱ्या श्रावकानें उत्तम मध्यम आणि कनिष्ठ अशा तिन्हीं प्रकारच्या पात्रांना त्यांच्या उपयोगीं पडतील असे पदार्थ योग्य प्रकारानें दान करावेत.

पोष्यन्ते येन चित्राः सकलसुखफलस्तोमरोपप्रवीणाः ।
सम्यक्त्वज्ञानचर्या यमनियमतपोवृक्षजातिप्रबन्धाः ॥
भव्यक्षोणीषु तथ्यः क्षतनिखिलमलं मुञ्चते दानतोयं ।
तुल्यस्तस्योपकारी मधुररवकृतो भव्यमेघस्य नान्यः११०

अर्थ— सर्वप्रकारच्या सुखरूपी फलांचा समुदाय उत्पन्न करण्याला समर्थ असें सम्यक्त्व, ज्ञान, चारित्र, यम, नियम तपरूपी अनेक जातीचे वृक्ष ज्याच्या योगेंकरून पोषण केले जातात, तें सर्वपातकांचा नाश करणारें दानरूपी उदक जो श्रावक भव्यजीवरूपी भूमीवर सोडतो; त्या मधुर शब्द करणाऱ्या भव्यमेघाच्या बरोबरीचा दुसरा कोणीच उपकारी मनुष्य नाहीं.

वात्सल्यासक्तचित्तो नयविनयपरो दर्शनालङ्कृतात्मा ।
देयादेये विदित्वा वितरति विधिना यो यतिभ्योऽत्र दानम्
कीर्तिं कुन्दावदातामामितगतिमतां पूरयन्तीं त्रिलोकीं ।
लब्ध्वा क्षिप्रं स याति क्षपितभवभयं मोक्षमक्षीणसौख्यम्

अर्थ— वात्सल्यांत ज्याचें मन गढून राहिलें आहे, जो नय आणि विनय ह्यांच्या विषयीं तत्पर आहे, ज्याचा आत्मा सम्यग्दर्शनानें अलंकृत आहे असा जो श्रावक दान करण्याला योग्य कोणतें आणि अयोग्य कोणतें हें जाणून ह्या लोकीं यतींना यथाविधि दान करतो, तो कुंदपुष्पाप्रमाणें शुभ्र अमितज्ञानवान् अशा सिद्धांना मान्य आणि त्रैलोक्यांत पसरणारी अशा कीर्तीला मिळवून संसाराचें भय ज्यानें घालविलें आहे अशा व ज्यांतील सुख कमी होत नाहीं अशा मोक्षाला लवकरच जातो.

इत्युपासकाचारे नवमः परिच्छेदः समाप्तः

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

# परिच्छेद दहावा.

पात्रकुपात्रापात्राण्यवबुध्य फलार्थिना सदा देयम् ॥
क्षेत्रमनवबुध्योप्तं बीजं न हि फलति फलमिष्टम् ॥१॥

अर्थ— दानाच्या फलाची इच्छा करणाऱ्यानें पात्र, कुपात्र आणि अपात्र ह्यांचा विचार करूनच नेहमीं दान करावें. कारण, शेत कसल्या प्रकारचें आहे हें समजल्यावांचून जर बीं पेरलें तर त्याच्यापासून इष्ट फल मिळत नाहीं.

पात्रं तत्र पटिष्ठैरुत्तममध्यमजघन्यभेदेन ॥
त्रेधा क्षेत्रमिवोक्तं त्रिविधफलनिमित्ततां ज्ञात्वा २

अर्थ— त्यांत शेत जसें उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ असें तीन प्रकारचें फल देणारें असल्यामुळें तीन प्रकारचें आहे; त्याप्रमाणें पात्रही उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ ह्या तीन भेदांनीं तीन प्रकारचें आहे असें शास्त्रज्ञ लोकांनीं प्रतिपादन केलें आहे.

उत्तममुत्तमगुणतो मध्यमगुणतोऽत्र मध्यमं पात्रम् ॥
विज्ञेयं बुद्धिमता जघन्यगुणतो जघन्यं च ॥ ३ ॥

अर्थ— उत्तमगुणांच्या योगानें पात्र उत्तम होतें; मध्यम गुणांच्या योगानें मध्यम आणि कनिष्ठ गुणांच्या योगानें पात्र कनिष्ठ होतें; असें बुद्धिमानानें समजावें.

तत्रोत्तमं तपस्वी विरताविरतश्च मध्यमं ज्ञेयम् ॥
सम्यग्दर्शनभूषः प्राणी पात्रं जघन्यं स्यात् ॥ ४ ॥

अर्थ— त्यांत तपस्वी हें उत्तम पात्र होय, विरताविरत हें मध्यम पात्र आणि फक्त सम्यग्दर्शनी हें जघन्य पात्र होय.

जीवगुणमार्गणाविधिं विधानतो यो विबुध्य निश्शेषम्

रक्षति जीवनिकायं सवितेव परोपकारपरः ॥ ५ ॥
पथ्यं तथ्यं श्रव्य वचनं हृदयङ्गमं गुणगरिष्ठम् ॥
यो ब्रूते हितकारी परमानसतापतो भीतः ॥ ६ ॥
निर्माल्यकमिव मत्वा परवित्तं यस्त्रिधाऽपि नादत्ते ॥
दन्तान्तरशोधनमपि पतितं दृष्ट्वाऽपि भीतमतिः ॥७॥
तिर्यङ्मानुषदेवाचेतनभेदां चतुर्विधां योषाम् ॥
परिहरति यः स्थिरात्मा मारीमिव सर्वथा घोराम् ८॥
विविधं चेतनजातं सङ्गं चेतनमचेतनं त्यक्त्वा ॥
यो नादत्ते भूयो वान्तमिवान्नं त्रिधा धीरः ॥ ९ ॥
त्रिविधालम्बनशुद्धिः प्रासुकमार्गेण यो दयाधारः ॥
युगमात्रान्तरदृष्टिः परिहरमाणोऽङ्गिनो याति ॥ १० ॥
हृदयं विभूषयन्तीं वाणीं तापापहारिणीं विमलाम् ॥
मुक्तानामिव मालां यो ब्रूते सूत्रसम्बद्धाम् ॥ ११ ॥
षट्चत्वारिंशद्दोषापोढां यो विशुद्धिनवकोटीम् ॥
मृष्टामृष्टसमानो भुक्तिं विदधाति विजिताक्षः ॥१२॥
द्रव्यं विकृतिपुरःसरमङ्गिग्रामप्रपालनासक्तः ॥
गृह्णाति यो विमुञ्चति यत्नेन दयाङ्गनाश्लिष्टः ॥ १३ ॥
निर्जन्तुकेऽविरोधे दूरे गूढे विसङ्कटे क्षिपति ॥
उच्चारप्रस्रवणश्लेष्माद्यं यः शरीरमलम् ॥ १४ ॥
जिनवचनपञ्जरस्थं विहाय बहुदुःखकारणं क्षिप्रम् ॥
विदधाति यः स्ववश्यं मर्कटमिव सञ्चलं चित्तम् १५
यो वचनौषधमनघं जन्मजरामरणरोगहरणपरम् ॥
बहुशो मौनविधायी ददाति भव्याङ्गिनां महितम् १६
कायोत्सर्गविधायी कर्मक्षयकारणाय भवभीतः ॥
कृत्याकृत्यपरो यः कार्यं वितनोति सूत्रमतम् ॥ १७ ॥

**यस्येत्थं स्थेयस्यः सम्यग्व्रतसमितिगुप्तयः सन्ति ॥**
**प्रोक्तः स पात्रमुत्तममुत्तमगुणभाजनं जैनैः ॥ १८ ॥**

अर्थ— जो जीवस्थान, गुणस्थान, मार्गणास्थान यांचे भेद शास्त्रोक्तविधीनें समग्र जाणून सर्व जीवांचें रक्षण करतो; जो सूर्याप्रमाणें ( निरपेक्ष ) उपकार करितो; जो दुसऱ्याच्या मनाला पीडा होईल ह्मणून भ्यालेला असा होत्साता कल्याणप्रद, खरें, श्रवण करण्याला योग्य, मनोहर, वाणीच्या सद्गुणांनीं श्रेष्ठ आणि तत्काल हित करणारें असें भाषण बोलतो; दुसऱ्याच्या मनाला ताप देण्यापासून ज्याचें मन भ्यालें आहे असा, जो दुसऱ्याचें द्रव्य निर्माल्याप्रमाणें मानून त्यांतून दांत कोरण्याला काडी सुद्धां मन, वचन आणि शरीर ह्या तिहींच्या योगानें ग्रहण करीत नाहीं; जो स्थिरबुद्धि असा होत्साता तिर्यंचिणी, मानुषी, देव आणि अचेतन ( पुतळी ) ह्या च्यारी प्रकारच्या स्त्रियांना भयंकर अशा महामारी नांवाच्या व्याधीप्रमाणें वर्ज करतो; चेतन अशा स्त्रीपुत्रादिकांपासून उत्पन्न झालेला चेतनसङ्ग ( चेतनपरिग्रह ) आणि धनधान्यादिक अचेतनपरिग्रह असा अनेकप्रकारचा परिग्रह त्याग करून जो धीर वांतीप्रमाणें पुनः त्याचें ग्रहण करीत नाहीं; मन वचन काय ह्या तीहीच्या आश्रयानें ज्याला शुद्धि प्राप्त झाली आहे आणि जो जीवदयेला आधारभूत आहे असा जो महात्मा चार हातापर्यंतच आपल्या दृष्टीची मर्यादा ठेवून प्रासुक अशा मार्गानें जीववधाला चुकवून गमन करतो; हृदयाला सुशोभित करणारी, ताप हरण करणारी निर्दोष आणि सूत्राशीं संबद्ध असलेली अशी वाणी मौक्तिक मालेप्रमाणें जो बोलतो; शेचाळीस प्रकारच्या दोषांनीं रहित व नऊ प्रकारच्या शुद्धीनें युक्त असें अन्न जो जितेंद्रिय असा

होत्साता चांगलें वाईट सारखेंच मानून भक्षण करतो; विक्तिपुरःसर ह्मणजे हातपाय धुणें वगैरे क्रिया ज्याच्यापासून प्रथम होती आहे असें द्रव्य म्हणजे कमंडलु पिंछी वगैरे वस्तु-जो जीवरक्षणाविषयीं आसक्त व दयारूपी अंगनेनें आलिंगित अर्थात् दयायुक्त असा असल्यामुळें नीट पाहून-घेतो व पाहून ठेवितो; निर्जंतुक, अविरुद्ध आणि प्रशस्त अशा गुप्त जागीं जो आपला मल, मूत्र, कफ वगैरे शारीरमल टाकतो; जिनवचनरूपी पिंजऱ्यांत असणारें व माकडाप्रमाणें चंचल असें आपलें मन जो अनेक दुःखकारणांचा त्याग करून त्वरेनें आपल्या ताब्यांत ठेवतो; जो मौन धारण करणारा असा होत्साताही जरा मरण ह्या रोगांचें हरण करण्यास समर्थ निष्पाप व पूज्य असें भाषणरूपी औषध भव्य जीवांना पुष्कळ दान करतो; जो संसारापासून भ्यालेला व कार्य कोणतें व अकार्य कोणते ह्यांचा विचार करण्यांत तत्पर असलेला असा होत्साता कायोत्सर्ग करून सूत्रग्रंथाला मान्य असलेला आचार कर्मक्षयाकरितां करतो अर्थात् हे वरील गुण ह्मणजे व्रत समिति आणि गुप्ति ह्या ज्याच्या स्थिर आहेत असा जो असतो तो उत्तम गुणांचें स्थान असल्यानें उत्तम पात्र होय; असें जैन साधूंनीं प्रतिपादन केलें आहे. भावार्थ, तेरा प्रकारचें चारित्र पाळणारा मुनि उत्कृष्ट पात्र होय.

रागो द्वेषो मोहो क्रोधो लोभो मदः स्मरो माया ॥
यं परिहरन्ति दूरं दिवाकरमिवान्धकारचयः ॥ १९ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें अंधकाराचा समुदाय सूर्याचा संसर्ग आपल्याला होऊं देत नाहीं त्याप्रमाणें राग, द्वेष, मोह, क्रोध, लोभ, मद, स्मर आणि माया हे दोष ज्याचा संसर्ग दूर निवारण करतात ह्मणजे ज्याचा संसर्ग करीत नाहींत तें उत्तम पात्र होय.

दर्शनबोधचरित्रत्रितयं यस्यास्ति निर्मलं हृदये ॥
आनन्दितभव्यजनं विमुक्तिलक्ष्मीवशीकरणम् ॥ २० ॥

अर्थ— मोक्षलक्ष्मीचें वशीकरण आणि भव्यजीवांना आनंद देणारें निर्मल असें सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्र हें रत्नत्रय ज्याच्या अंतःकरणांत वास करतें तें उत्तम पात्र होय.

यस्यानवद्यवृत्तेर्जङ्गममिव मंदिरं तपोलक्ष्म्याः ॥
कायक्लेशैरुग्रैः कृशीकृतं राजते गात्रम् ॥ २१ ॥

अर्थ— निर्दोष आचार करणाऱ्या अशा ज्या पुरुषाचें क्यार भयंकर अशा कायक्लेशामुळें कृश झालें असल्यानें तपोलक्ष्मीचें संचार करणारें मंदिरच कीं काय असें शोभत आहे तो पर-पात्र होय.

यैर्विजिता जगदीशा विविधा विपदः सदा प्रपद्यन्ते ।
तानीन्द्रियाणि सद्यो महीयसा येन जीयन्ते ॥ २२ ॥

अर्थ— ज्यांनीं जिंकलेले जगांचे अधिपति नाना प्रकारचीं दुःखें सर्वदा भोगतात तीं इंद्रियें ज्या महात्म्यानें तत्काल जिंकलीं आहेत तो उत्तम पात्र होय.

पूजायामवमाने सौख्ये दुःखे समागमे विगमे ॥
क्षुभ्यति यस्य न चेतः पात्रमसावुत्तमं साधुः ॥२३॥

अर्थ— सत्कार आणि अवमान, सुख आणि दुःख, संयोग आणि वियोग ह्यांच्या निमित्तानें ज्याचें मन विकृत होत नाहीं, तो साधु उत्तम पात्र होय.

यस्य स्वपरविभागो न विद्यते निर्ममत्वचित्तस्य ॥
निर्बाधबोधदीपप्रकाशिताशेषतत्त्वस्य ॥ २४ ॥

अर्थ— नाशरहित अशा ज्ञानरूपी दीपानें ज्याला सर्व तत्त्वें प्रकाशित झालीं आहेत अशा ज्या ममतारहित सत्पुरुषाला

हें माझें आणि हें दुसऱ्याचें असा भेद वाटत नाहीं [ ह्या जगांतील सर्ववस्तु ज्ञेय आहेत, ह्यांत आपलेपणा किंवा परकीयपणा मुळींच नाहीं असें ज्याला वाटत आहे ) तो उत्तम पात्र होय.

संसारवनकुठारं दातुं कल्पद्रुमं फलमभीष्टम् ॥
यो धत्ते निरवद्यं क्षमादिगुणसाधनं धर्मम् ॥ २५ ॥

अर्थ— संसाररूपी वनाचा नाशकरणारी कुऱ्हाड, इच्छितफल देण्याविषयीं कल्पवृक्ष आणि क्षमादिगुण प्राप्त होण्याला साधन असा निर्दोष धर्माचें जो आचरण करीत आहे तो उत्तम पात्र होय.

लोकाचारानिवृत्तः कर्ममहाशत्रुमर्दनोद्युक्तः ॥
यो जातरूपधारी स यतिः पात्रं मतं वर्यम् ॥२६॥

अर्थ—लौकिक आचाराचा ज्यानें त्याग केला आहे आणि कर्मरूपी महाशत्रूंच्या नाशाविषयीं जो तयार झाला आहे असा जातरूप (नग्नता) धारण करणारा जो यति तें दानाला श्रेष्ठ पात्र मानिलें आहे.

राकाशशाङ्कोज्वलदृष्टिभूषः ।
प्रवर्धमानव्रतशीललक्ष्मीः ॥
सामायिकारोपितचित्तवृत्ति- ।
र्निरन्तरोपोषितशोषिताङ्गः ॥२७ ॥
सचेतनाहारनिवृत्तचित्तो ।
वैरागिको मुक्तदिनव्यवायः ॥
निरस्तशश्वद्वनितोपभोगो ।
निराकृतासँयमकारिकर्मा ॥२८ ॥
निवारिताशेषपरिग्रहेच्छः ।
सावद्यकर्मानुमतेरकर्ता ॥
औद्देशिकाहारनिवृत्तबुध्दि- ।

दुरन्तसंसारनिपातभीतः ॥ २९ ॥
उपासकाचारविधिप्रवीणो ।
मन्दीकृताशेषकषायवृत्तिः
उत्तिष्ठते यो जननव्यपाये
तं मध्यमं पात्रमुदाहरन्ति ॥ ३० ॥

अर्थ— पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें निर्दोष अशा दर्शनविशुद्धीनें भूषित, ज्याच्या व्रताचें आणि शीलाचें तेज वृद्धि पावत आहे, सामायिकाच्या ठिकाणीं (समतेच्या ठिकाणीं) ज्यानें आपली चित्तवृत्ति ठेविलेली आहे, आणि निरंतर उपोषणें करून जो आपलें शरीर शोषण करीत आहे तो मध्यम पात्र होय. सचित्त आहारावरून ज्याचें मन परतलें आहे असा, विरक्त, दिवामैथुनाचा त्याग करणारा अथवा नेहमीं स्त्रीसमागमाचा त्याग करणारा आणि ज्यानें असंयम उत्पन्न करणारें असें सर्व कर्म टाकून दिलें आहे असा, तसेंच ज्यानें संपूर्ण परिग्रहाची इच्छा टाकून दिली आहे, जो सावद्यकर्माविषयीं अनुमति देत नाहीं, औद्देशिक आहारापासून-ह्म० अमुक पाहिजे असें सांगून करविलेल्या अन्नापासून-ज्याची बुद्धि निवृत्त झाली आहे, आणि जो ह्या दुरन्त अशा संसारांत आपलें पतन होईल ह्मणून भीत आहे, तसेंच उपासकाचारांत सांगितलेला विधि करण्याविषयीं जो प्रवीण आहे, ज्यानें सर्व कषायांचा व्यापार मंद केला आहे, आणि जो आपल्याला प्राप्त होणाऱ्या अनेक जन्मांचा नाश करण्याचा उद्योग करीत आहे त्याला मध्यम पात्र ह्मणतात.

कुमुद्बान्धवदीधितिदर्शनो ।
भवजरामरणार्तिविभीलुकः ॥

कृतचतुर्विधसङ्घहितेहितो।
जननभोगशरीरविरक्तधीः ॥ ३१ ॥
भवति यो जिनशासनभासकः।
सततनिन्दनगर्हणचञ्चुरः ॥
स्वपरतत्त्वविचारणकोविदो।
व्रतविधाननिरुत्सुकमानसः ॥ ३२ ॥
जिनपतीडिततत्त्वविचक्षणो।
विपुलधर्मफलेक्षणतोषितः ॥
सकलजन्तुदयार्द्रितचेतन-।
स्तमिह पात्रमुशन्ति जघन्यकम् ॥ ३३ ॥

अर्थ— ज्याचें सम्यग्दर्शन चंद्रकिरणाप्रमाणें स्वच्छ आहे, जो संसार जरा आणि मरण ह्यांना भीत आहे, चतुर्विध संघाच्या हिताची इच्छा ज्यानें केली आहे, जन्म भोग आणि शरीर ह्यांच्याविषयीं ज्याची बुद्धि विरक्त झाली आहे, जो जिनशासनाची प्रभावना करीत आहे, जो सर्वदा आपली निंदा आणि तुच्छता दाखवीत आहे; स्वतत्त्व ( जीवाचें स्वरूप ) आणि परतत्त्व ( अजीववस्तूंचें स्वरूप ) ह्यांचा विचार करण्यांत जो पंडित आहे, व्रतें करण्याविषयीं ज्याचें मन उत्सुक नाहीं; जिनेंद्रांनीं प्रतिपादन केलेल्या तत्त्वाचें ज्याला चांगलें ज्ञान आहे, धर्माचें मोठें फल पाहून जो संतुष्ट झाला आहे, आणि सर्वजीवाविषयीं ज्याची दयार्द्र बुद्धि आहे त्याला जघन्यपात्र ( कनिष्ठ पात्र ) म्हणतात.

चरति यश्चरणं परदुश्चरं।
विकटघोरकुदर्शनवासितः ॥
निखिलसत्त्वहितोद्यतचेतनो।

वितथकर्कशवाक्यपराङ्मुखः ॥ ३४ ॥
धनकलत्रपरिग्रहनिःस्पृहो ।
नियमसँयमशीलविभूषितः ॥
कृतकषायहृषीकविनिर्जयः ।
प्रणिगदन्ति कुपात्रमिमं बुधाः ॥ ३५ ॥

अर्थ— जो बिकट आणि भयंकर अशा कुदर्शनाचा संस्कार झाला असूनहि दुसऱ्याला आचरण्याला कठिण अशा चारित्राचें आचरण करतो, सर्व प्राण्यांच्या कल्याणाविषयीं ज्याची बुद्धि तत्पर आहे, जो खोटें आणि कठोर भाषण करीत नाहीं, द्रव्य स्त्री वगैरे परिग्रहाविषयीं जो निस्पृह आहे, यम नियम आणि शील ह्यांनीं जो भूषित आहे आणि कषाय व इंद्रियें ह्यांचा ज्यानें जय केलेला आहे अशाला पंडित लोक कुपात्र ह्मणत. भावार्थ, सदाचारी पण मिथ्यादृष्टि जीव कुपात्र होय.

गतकृपः प्रणिहन्ति शरीरिणो ।
वदति यो वितथं परुषं वचः ॥
हरति वित्तमदत्तमनेकधा ।
मदनबाणहतो भजतेऽङ्गनाम् ॥ ३६ ॥
विविधदोषविधायिपरिग्रहः ।
पिबति मद्यमयन्त्रितमानसः ॥
कृमिकुलाकुलितं ग्रसते फलं ।
कलिलकर्मविधानविशारदः ॥ ३७ ॥
दृढकुटुम्बपरिग्रहपञ्जरः ।
प्रशमशीलगुणव्रतवर्जितः ॥
गुरुकषायभुजङ्गमसेवितो ।
विषयलोलमपात्रमुशन्ति तम् ॥ ३८ ॥

अर्थ— जो निर्दय होऊन प्राण्यांचा वध करतो, जो खोटें आणि कठोर असें भाषण करतो, दुसऱ्याचें द्रव्य त्यानें न दिलें तरी जो अनेक प्रकारांनीं हरण करतो, मदनशरांनीं पीडित होऊन जो स्त्रीचा उपभोग करतो, ज्याचा परिग्रह अनेक प्रकारचे दोष करणारा आहे, जो मन ताब्यांत न ठेवतां मद्य पितो, अनेक जंतूंनीं भरलेलें फल जो भक्षण करतो, पापकर्म करण्याविषयीं जो तरबेत आहे, ज्याचा कुटुंबरूपी पिंजरा बळकट आहे, प्रशम शील गुण आणि व्रतें ह्यांनीं जो रहित आहे, फार मोठ्या अशा कषायरूपी सर्पानें ज्याला धरलें आहे आणि जो विषयसेवनाविषयीं लुब्ध आहे अशाला अपात्र ह्मणतात.

विबुध्य पात्रं बहुधेति पण्डितै- ।
विशुध्य बुध्या गुणदोषभाजनम् ॥
विहाय गर्ह्यं परिगृह्य पावनं ।
शिवाय दानं विधिना विधीयते ॥ ३९ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें विचारी लोकांनीं अनेक प्रकारांनीं पात्र कोणाला ह्मणावें ह्याचें ज्ञान करून घेऊन, भिक्षेकरितां येणारा भिक्षु गुणांचें स्थान आहे कीं दोषांचें स्थान आहे ह्याचा नीट विचार करून, निंद्य पात्र टाकून देऊन पवित्र पात्र ग्रहण करून आपल्या कल्याणाकरितां यथाविधि दान करावें.

कृतोत्तरासङ्गपवित्रविग्रहो ।
निजालयद्वारगतो निराकुलः ॥
ससम्भ्रमः स्वीकुरुते तपोधनं ।
नमोऽस्तु तिष्ठेति कृतध्वनिर्नतः ॥ ४० ॥

अर्थ— आतां अन्नदानाचा विधि सांगतात— श्रावकानें पांघरण्याचें वस्त्र आंगावर घेऊन देह पवित्र करावा; मग आपल्या

घराच्या दारांत स्वस्थ मनानें उभें राहून तपोधन अशा मुनीचा "नमोऽस्तु तिष्ठ" असे शब्द उच्चारून त्वरेनें स्वीकार करावा.

**सुसंस्कृते पूज्यतमे गृहान्तरे ।**
**तपस्विनं स्थापयते विधानतः ॥**
**मनीषितानेकफलप्रदायकं ।**
**सुदुर्लभं रत्नमिवास्तदूषणम् ॥ ४१ ॥**

अर्थ—मग आपल्याला अनेक इष्ट फलें प्राप्त करून देणाऱ्या त्या यतीला चांगल्या प्रकारें स्वच्छ केलेल्या घरांतील उत्तम जाग्यांत अत्यंत दुर्लभ अशा रत्नाप्रमाणें यथाविधि स्थापन करावें.

**अनेकजन्मार्जितकर्मकर्तिन- ।**
**स्तपोनिधेस्तत्र पवित्रवारिणा ॥**
**स सादरं क्षालयते पदद्वयं ।**
**विमुक्तये मुक्तिसुखाभिलाषिणः ॥ ४२ ॥**

अर्थ—अनेक जन्मापासून प्राप्त झालेल्या कर्मांचा नाश करणाऱ्या व मुक्तिसुखाची इच्छा करणाऱ्या त्या यतीचे दोनी चरण त्या ठिकाणीं श्रावकानें आपल्यास मोक्षप्राप्ति व्हावी ह्याकरितां पवित्र जलानें आदरानें क्षालन करावेत.

**प्रसूनगन्धाक्षतदीपिकादिभिः ।**
**प्रपूज्य मर्त्यामरवर्गपूजितम् ॥**
**मुदा मुमुक्षोः पदपङ्कजद्वयं ।**
**स वन्दते मस्तकपाणिकुड्मलः ॥ ४३ ॥**

अर्थ— मग मनुष्यें आणि देव ह्यांच्या समूहानें पूजिलेल्या मुमुक्षूच्या चरणकमलाची पुष्प गंध अक्षता दीप इत्यादिकांच्या योगानें पूजा करून आनंदानें आपले दोनी हात जोडून मस्तकावर ठेऊन वंदन करावें.

**मनोवचःकायविशुद्धिमञ्जसा ।**
**विधाय विध्वस्तमनोभवद्विषे ॥**
**चतुर्विधाहारमहार्यनिश्चयो ।**
**ददाति स प्रासुकमात्मकल्पितम् ॥ ४४ ॥**

अर्थ— नंतर ज्याचा निश्चय केव्हांच ढळत नाहीं अशा त्या श्रावकानें मन वचन काय ह्यांची तत्काल शुद्धि करून मदनशत्रूचा ज्यानें नाश केला आहे अशा त्या यतीला आपल्याकरितां तयार केलेलें चार प्रकारचें प्रासुक अन्न दान करावें.

**अनेन दत्तं विधिना तपस्विनां ।**
**महाफलं स्तोकमपि प्रजायते ॥**
**वसुन्धरायां वटपादपस्य**
**न बीजमुप्तं परमेति विस्तरम् ॥ ४५ ॥**

अर्थ— ह्या विधीनें तपस्वी जनांना स्वल्प अन्न जरी दिलें, तथापि तें महाफल देणारें होतें, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण, वटाचें बीं जमिनींत पेरलें असतां वृक्षरूपानें मोठ्या विस्ताराला प्राप्त होत नाहीं काय ?

**निवेशितं बीजमिलातलेऽनघे ।**
**विना विधानं न फलावहं यथा ॥**
**तथा न पात्राय वितीर्णमञ्जसा ।**
**ददाति दानं विधिना विनाफलम् ॥ ४६ ॥**

अर्थ— ज्या प्रमाणें उत्तम अशा जमिनींत पेरलेलें बीं पेरण्याच्या पद्धतीप्रमाणें पेरल्यावांचून तें फल देणारें होत नाहीं, त्याप्रमाणें सत्पात्राला वर सांगितलेल्या विधीवांचून दिलेलें अन्न वास्तविक फल देत नाहीं.

**सदाऽतिथिभ्यो विनयं वितन्वता ।**

निजं प्रदेयं प्रियजल्पिना धनम् ॥
प्रजायते कर्कशभाषिणः स्फुटं ।
धनं वितीर्णं गुरुवैरकारणम् ॥ ४७ ॥

अर्थ— अतिथीला आपली वस्तु (अन्न वगैरे) देणाऱ्यानें पुष्कळ विनयानें व मधुर भाषण करून द्यावें. कारण, कर्कश बोलणाऱ्यानें दिलेलें द्रव्य मोठ्या द्वेषाला कारण होतें.

निगद्य यः कर्कशमस्तचेतनो।
निजं प्रदत्ते द्रविणं शठत्वतः ॥
सुखाय दुःखोदयकारणं परं ।
मूल्येन गृह्णाति स दुर्मनाः कलिम् ॥ ४८ ॥

अर्थ— जो अविचारी श्रावक कठोर बोलून आपलें द्रव्य लुच्चेगिरीनें देतो, तो दुष्ट, सुखाकारितां त्या द्रव्याच्या किमतीनें दुःख उत्पन्न करण्याचें मोठें साधन असें भांडण विकत घेतो.

सम्यग्भक्तिं कुर्वतः संयतेभ्यो ।
द्रव्यं भावं कालमालोक्य दत्तम् ॥
दातुर्दानं भूरि पुण्यं विधत्ते ।
सामग्रीतः सर्वकार्यप्रसिद्धिः ॥ ४९ ॥

अर्थ— उत्तम भक्ति करणाऱ्या श्रावकाचें द्रव्य भाव आणि काल ह्यांचा विचार करून जें दान होतें तें दात्याला फार पुण्य देतें. योग्यच आहे. कारण, सामग्री असली म्हणजे तिच्यापासून सर्व कार्यांची सिद्धि होते.

बलाहकादेकरसं विनिर्गतं ।
यथा पयो भूरिरसं निसर्गतः ॥
विचित्रमाधारमवाप्य जायते ।
तथा स्फुटं दानमपि प्रदातृतः ॥ ५० ॥

अर्थ— मेघापासून पडलेलें उदक स्वभावतः जरी एकाच प्रकारच्या रुचीचें असतें, तथापि तें अनेक तऱ्हेच्या जाग्यांत गेल्यानें अनेक प्रकारच्या रुचीनें युक्त असें होतें. त्याप्रमाणें दात्यानें दिलेलें दानही अनेक प्रकारच्या पात्राकडे गेल्यानें अनेक प्रकारचें फल देतें. तात्पर्य, जसें पाणी वाईट जमिनीवर पडल्यानें खारट, मचूळ वगैरे प्रकारचें होतें; त्याप्रमाणें अनेक प्रकारच्या पात्रांना दिलेलें दान चांगलें वाईट असें अनेक प्रकारचें फल देतें. असें जाणावें.

घटे यथाऽऽमे सलिलं निवेशितं।
पलायते क्षिप्रमसौ च भिद्यते॥
तथा वितीर्णं विगुणाय निष्फलं।
प्रजायते दानमसौ च नश्यते॥५१॥

अर्थ— ज्याप्रमाणें मातीच्या कच्च्या घागरींत ठेविलेलें पाणी झिरपून निघून जातें, आणि ती घागरही फुटते; त्याप्रमाणें गुणहीन अशा पात्राला दिलेलें दान निष्फल होतें आणि त्या पात्राचाही नाश होतो. ह्मणून कुपात्रीं दान करूं नये.

विना विवेकेन यथा तपस्विता।
यथा पटुत्वेन विना सरस्वती॥
तथा विधानेन विना वदान्यता।
न जायते कर्मकरी कदाचन॥५२॥

अर्थ— ज्याप्रमाणें विचार असल्यावांचून तपस्वीपणा, शहाणपणावांचून विद्या कार्य करण्याला समर्थ होत नाहीं, त्याप्रमाणें विधीवांचून केलेलें दान कार्य करण्याला समर्थ होत नाहीं.

यथा वितीर्णं भुजगाय पावनं।
प्रजायते प्राणहरं विषं पयः॥

भवत्यपात्राय धनं गुणोज्वलं ।
तथा प्रदत्तं बहुदोषकारणम् ॥ ५३ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें पवित्र असें दूध सर्पाला दिलें असतां प्राणहरण करणारें विष होतें, त्याप्रमाणें शुद्ध द्रव्य अपात्राला दिलें असतां अनेक दोष उत्पन्न करणारें होतें.

वितीर्य यो दानमसंयतात्मने ।
जनः फलं कांक्षति पुण्यलक्षणम् ॥
वितीर्य बीजं ज्वलिते स पावके ।
समीहते सस्यमपास्तदूषणम् ॥ ५४ ॥

अर्थ— जो श्रावक असंयत अशा पात्राला दान करून पुण्यरूपी इष्ट प्राप्त होण्याची इच्छा करतो, तो प्रज्वलित अग्नींत उत्तम धान्य मिळण्याची इच्छा करतो असें जाणावें.

विमुच्य यः पात्रमवद्यविच्छिदे ।
कुधीरपात्राय ददाति भोजनम् ॥
स कर्षितं क्षेत्रमपोह्य सुन्दरं ।
फलाय बीजं क्षिपते बतोपले ॥ ५५ ॥

अर्थ— जो दुर्बुद्धि श्रावक उत्तम पात्राचा त्याग करून पापक्षयाकरितां ह्मणून अपात्राला अन्नदान करितो, तो नांगरलेलें चांगलें शेत सोडून धान्य उत्पन्न होण्याकरितां दगडावर बीं पेरतो !

यथा रजोधारिणि पुष्टिकारणं ।
विनश्यति क्षीरमलाबुनि स्थितम् ॥
प्ररूढमिथ्यात्वमलाय देहिने ।
तथा प्रदत्तं द्रविणं विनश्यति ॥ ५६ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें पुष्टीला कारणीभूत असलेलें दूध धुर-

ळ्यानें भरलेल्या कडू भोपळ्यांत ठेविलें असतां नासतें त्याप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं मिथ्यात्व रूपी मल उत्पन्न झाला आहे अशा जीवाला दान केलेलें द्रव्य नाश पावतें. ह्मणजे त्याच्यापासून वाईट फल उत्पन्न होतें.

नो दाताऽसौ मन्मथाक्रान्तचित्तः ।
संसारार्तेर्याति पापावलीढः ॥
अम्भोराशेर्दुस्तराल्लोहमय्या ।
नावा लोहं तार्यमाणं न दृष्टम् ॥ ५७ ॥

अर्थ— ज्याचें मन मदनानें ताब्यांत घेतलें आहे आणि जो पातकानें व्याप्त झालेला आहे असा दाता ह्या संसारयातनांतून तरून जात नाहीं. कारण, लोखंडाच्या नौकेनें लोखंड दुस्तर अशा समुद्रांतून तरून नेलेलें कोठेंच पाहिलें नाहीं.

ग्रन्थारम्भक्रोधलोभादिपुष्टो ।
ग्रन्थारम्भक्रोधलोभादिपुष्टम् ॥
जन्माराते रक्षितु तुल्यदोषो ।
नूनं शक्तो नो गृहस्थं गृहस्थः ॥ ५८ ॥

अर्थ— परिग्रह, आरंभ, क्रोध आणि लोभ हे ज्याच्या ठिकाणीं वाढले आहेत असा गृहस्थ (गृही श्रावकरूपी पात्र) परिग्रह, आरंभ, क्रोध आणि लोभ हे ज्याच्यामध्यें वृद्धि पावले आहेत अशा गृहस्थ दात्याला ह्या संसाररूपी शत्रूपासून रक्षण करण्याला समर्थ होत नाहीं. कारण, गृहस्थ दाता आणि गृहस्थच दानाचें पात्र असें असल्यानें पात्राचे दोष दात्याच्या दोषासारखेच असतात. ह्मणून गृहस्थाला दान करूं नये.

लोभमोहमदमत्सरहीनो ।
लोभमोहमदमत्सरगेहम् ॥

पाति जन्मजलधेरपारगो ।
रागवन्तमपहस्तितपापः ॥ ५९ ॥

अर्थ— लोभ, मोह, मद आणि मत्सर हे दोष ज्याच्या-मध्यें नाहींत आणि ज्यानें पातकाचा नाश केलेला आहे असा यति, लोभ, मोह, मद आणि मत्सर ह्यांचें घरच कीं काय अशा व रागी अशा दान करणाऱ्या श्रावकाला संसारसमुद्रा-पासून रक्षण करतो.

भूरिदोषनिचिताय फलार्थी ।
यो ददाति धनमस्तविचारः ॥
तद्ददाति मलिम्लुचहस्ते ।
कानने पुनरपि ग्रहणाय ॥ ६० ॥

अर्थ— जो अविचारी मनुष्य फलप्राप्तीच्या इच्छेनें पुष्कळ दोषानें भरलेल्या अशा कुपात्राला दान करतो, तो अरण्यांत पुनः आपल्याला परत मिळण्याकरितां चोराच्या हातांत तें द्रव्य देतो, असें समजावें.

दानं यतिभ्यो ददता विधानतो ।
मतिर्विधेया भवदुःखशान्तये ॥
दुरन्तसंसारपयोधिपातिनी ।
न भोगबुद्धिर्मनसाऽपि धीमता ॥ ६१ ॥

अर्थ— यतीला यथाविधि दान करणाऱ्यानें संसारदुःखाच्या नाशाची बुद्धि धारण करावी. त्या बुद्धिमान् मनुष्यानें अनंत अशा संसारसमुद्रांत पाडणारी अशी भोगबुद्धि मनांत सुद्धां आणूं नये.

प्रदाय दानं यतिनां महात्मनां ।
यो याचते भोगमनर्थकारणम् ॥

मनीषितानेकसुखप्रदं मणिं ।
प्रदाय गृह्णाति स दुर्जरं विषम् ॥ ६२ ॥

अर्थ—महात्मे अशा यतींना दान देऊन जो अनर्थाला कारणीभूत असलेल्या भोगाची इच्छा करतो, तो मनुष्य अनेक इष्ट सुखें देणारें रत्न देऊन न पचणारें असें विष घेतो असें समजावें.

पन्नगानामिव प्राणिवित्रासिना- ।
मर्जने रक्षणे पोषणे सेवने ॥
यान्ति घोराणि दुःखानि येषां जनः ।
सन्ति भोगाः कथं ते मता धीमताम् ॥ ६३ ॥

अर्थ— सर्पाप्रमाणें प्राण्याला त्रास देणाऱ्या ज्या भोगांच्या संपादनांत, रक्षण करण्यांत, वाढविण्यांत आणि उपभोग घेण्यांत मनुष्य अनेक भयंकर दुःखें भोगतो, ते भोग बुद्धिमान् मनुष्यांना कसे बरें प्रिय होतील?

श्रद्धीयमाना अपि वञ्चयन्ते ।
निषेव्यमाणा अपि मारयन्ते ॥
ये पोष्यमाणा अपि पीडयन्ते ।
ते सन्ति भोगाः कथमर्थनीयाः ॥ ६४ ॥

अर्थ—ज्यांच्यावर विश्वास ठेवला तथापि फसवितात, उपभोग केला तरी जे मारतात, आणि वाढविले असतांही पीडा करतात त्या भोगांची इच्छा करावी? मुळींच करूं नये.

उत्पद्यमाना निलयं स्वकीयं ।
ये हव्यवाहा इव धार्यमाणाः ॥
प्रप्लोषयन्ते हृदयं ज्वलन्त- ।
स्ते याचनीयाः कथमिन्द्रियार्थाः ॥ ६५ ॥

अर्थ— काष्ठापासून उत्पन्न झालेला अग्नि ज्याप्रमाणें आपलें स्थान जें काष्ठ, त्याला जाळून टाकितात; त्याप्रमाणें हे इंद्रियांचे विषय पेटून अंतःकरण जाळून टाकतात! मग त्यांची इच्छा कशी बरें करावी.

दत्तप्रलापभ्रमशोकमूर्च्छाः ।
सन्तापयन्तः सकलं शरीरम् ॥
ये दुर्निवारां जनयन्ति तृष्णां ।
ज्वरा इवैते न सुखाय सन्ति ॥ ६६ ॥

अर्थ— हे भोग बडबड करावयास लावतात. भ्रम उत्पन्न करून शोक व मूर्छा हीं उत्पन्न करतात. सर्व शरीराला संताप करून दुर्निवार अशी तृष्णा उत्पन्न करतात. म्हणून ज्वराप्रमाणें ते केव्हांही सुख देणारे नव्हत. म्हणून दान करणाऱ्यानें भोगांचीं इच्छा कधींही करूं नये.

विश्राणय दानं कुधियो यतिभ्यो ।
ये प्रार्थयन्ते विषयोपभोगम् ॥
ते लाङ्गलैर्गां खलु काञ्चनीयै- ।
र्विलिख्य किम्पाकवनं वपन्ति ॥ ६७ ॥

अर्थ— जे दुर्बुद्धि लोक यतींना दान करून विषयोपभोगाची इच्छा करतात, ते सोन्याच्या नांगरांनीं जमीन नांगरून, तींत किंपाकाचें वन पेरितात. किंपाकाचें फळ दिसण्यांत व खाण्यांत गोड असतें, पण परिणाम भयंकर असतो.

भिदन्ति सूत्राय मणिं महार्घं ।
काष्ठाय ते कल्पतरुं लुनन्ति ॥
नावं च लोहाय विपाटयन्ते ।
भोगाय दानं ननु ये ददन्ते ॥ ६८ ॥

अर्थ— जे लोक भोगांच्या प्राप्तीकरितां दान देतात ते माळेंतील सूत काढण्याकरितां मोठ्या किंमतीचें रत्न फोडतात, किंवा लांकडाकरितां कल्पवृक्ष तोडतात, अथवा थोड्याशा लोखंडाकरितां जहाज फोडतात, असें समजावें.

परैरशक्यं दमितेन्द्रियाश्वा-।
श्चरन्ति धर्मं विषयार्थिनो ये ॥
पाषाणमादाय गले महान्तं।
विशन्ति ते नीरमलभ्यपारम् ॥ ६९ ॥

अर्थ— ज्यांनीं इंद्रियरूपी अश्व ताब्यांत ठेविले आहेत असे जे लोक विषयेच्छु होऊन ह्मणजे पुढें चांगले भोग प्राप्त व्हावेत अशी इच्छा करून, दुसऱ्याला न करतां येण्यासारखें धर्माचरण करतात, ते लोक गळ्यांत धोंडा बांधून ज्याचें परतीर मिळत नाहीं अशा पाण्यांत प्रवेश करतात.

दिने दिने ये परिचर्यमाणा।
विवर्धमानाः परिपीडयन्ति ॥
ते कस्य रोगा इव सन्ति भोगा।
विनिन्दनीया विदुषोऽर्थनीयाः ॥ ७० ॥

अर्थ— जे भोग प्रतिदिवशीं सेवन केले असतां व वाढविले असतां पीडाच करतात, ते रोगाप्रमाणें निंद्य असे भोग कोणत्या विद्वान् मनुष्याला आवडतील बरें? कोणांसही आवडणार नाहींत.

प्रयच्छन्ति सौख्यं सुराधीश्वरेभ्यो।
न ये जातु भोगाः कथं ते परेभ्यः॥
निशुम्भन्ति ये मत्तमत्ताद्विपेन्द्रं।
न कण्ठीरवास्ते कुरङ्गं त्यजन्ति ॥ ७१ ॥

अर्थ— जे भोग देवेंद्रांना देखील केव्हांही सौख्य देत नाहींत

ते भोग दुसऱ्याला कसें बरें सौख्य देतील? कारण, जे सिंह मदोन्मत्त झालेल्या हत्तींना मारतात, ते एखाद्या हरणाला कसें बरें सोडतील?

न याचनीया विदुषेति दोषं ।
विज्ञाय रोगा इव जातु भोगाः ॥
किं प्राणहारित्वमवेक्ष्यमाणो ।
जिजीविषुः खादति कालकूटम् ॥ ७२ ॥

अर्थ— विद्वान् मनुष्यानें ह्याप्रमाणें दोष जाणून रोगासारखे असलेल्या ह्या भोगांची केंव्हांच इच्छा करूं नये. कारण, जगण्याची इच्छा करणारा मनुष्य कालकूटांत प्राणहरण करण्याचा धर्म आहे हें जाणून देखील तें कधीं भक्षण करतो काय?

भोगाः सम्पद्यमानाः सुरमनुजभुवश्चिन्तितप्राप्यसौख्या
याच्यन्ते लब्धुकामैः कथमपविपदं धर्मतो मुक्तिकान्ताम्
सस्यं स्वीकर्तुकामाः क्षुदुरुतरतरोः काण्डविच्छेददक्षं ।
स्वीकर्तुं किं पलालं फलममलधियः कुर्वते कर्षणं हि ॥७३

अर्थ— जीच्यापासून कधींहि विपत्ति प्राप्त होणार नाहीं अशा मुक्तिरूपी कांतेला धर्माचरणाच्या योगानें प्राप्त करूं इच्छिणाऱ्या लोकांनां, देव व मनुष्य या भवांत इच्छित सुख प्राप्त करून देणारे भोग अगदीं सहज प्राप्त आहेत. ह्मणून मुक्तीची इच्छा करणारे लोक, विषयभोगांची कधींही इच्छा धरून असत नाहींत. कारण, क्षुधारूपी प्रचंड वृक्षाला तेंव्हांच छेदून टाकणारें धान्य हें एक साधन आहे व त्याच्याबरोबर कोंडा हा नियमेंकरून असावयाचा; तेंव्हां त्या धान्याची इच्छा करणारे लोक, केवल कोंडाच मिळावा अशा हेतूनें जमीनीला कधींतरी नांगरूं इच्छितील काय? तात्पर्य, मोक्षसुख हें धान्य

आहे व संसारांतील विषयसुख हा कोंडा आहे.

त्यक्त्वा भोगाभिलाषं भवमरणजरारण्यनिर्मूलनार्थं ।
दत्ते दानं मुदा यो नयविनयपरः संयतेभ्यो यतिभ्यः ॥
भुक्त्वा भोगानरोगानमरवरवधूलोचनाम्भोजभानु- ।
र्नित्यां निर्वाणलक्ष्मीममितगतियतिप्रार्थनीयां स याति

अर्थ— जन्म, मरण आणि जरा ह्यांचें अरण्यच कीं काय असा जो संसार त्याच्या निर्मूलनाकरितां जो नीति आणि नम्रता ह्या दोहोंनीं युक्त असलेला श्रावक भोगांची इच्छा सोडून संयमी अशा यतींना आनंदानें दान करतो; तो पुण्यवान् जीव ( श्रावक ) रोगरहित अशा भोगांचा उपभोग करून देवांगनांच्या नेत्रकमलांना विकसित करणारा सूर्यच कीं काय! असा होत्साता, महाज्ञानी अशा यतींना अथवा अमितगति आचार्यांना इष्ट असलेल्या अविनाशी अशा मोक्षलक्ष्मीला प्राप्त होतो.

॥ इत्युपासकाचारे दशमः परिच्छेदः ॥

श्रीवीतरागाय नमः ॥

# परिच्छेद अकरावा.

**फलं नाभयदानस्य वक्तुं केनापि पार्यते ॥**
**यस्याकल्पं मुखे जिव्हा व्याप्रियन्ते सहस्रशः ॥१॥**

अर्थ— ज्याच्या मुखांत हजारों जिव्हा कल्पकालपर्यंत हालत आहेत अशा कोणालाही अभयदानाचें फल वर्णन करणें शक्य नाहीं.

**धर्मार्थकाममोक्षाणां जीवितं मूलमिष्यते ॥**
**तद्रक्षता न किं दत्तं हरता तन्न किं हृतम् ॥ २ ॥**

अर्थ— जीवित हेंच धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या पुरुषार्थांचें मूल आहे. ह्मणून त्या जीवितांचें रक्षण करणाऱ्यानें कोणतें दान केलें नाहीं बरें? आणि त्या जीविताचें हरण करणाऱ्यानें काय बरें हरण केलें नाहीं?

**गोपालब्राह्मणस्त्रीतः पुण्यभागी यदीष्यते ॥**
**सर्वप्राणिगणत्रायी नितरां न तदा कथम् ॥ ३ ॥**

अर्थ—गुराखी, ब्राह्मण आणि स्त्रिया ह्यांचें रक्षण करणारा जर पुण्यवान् असणें इष्ट आहे, तर मग सर्वप्राण्यांच्या समुदायाचें रक्षण करणारा अधिक पुण्यवान् कसा बरें होणार नाहीं?

**यदेकमेकदा जीवं त्रायमाणः प्रपूज्यते ॥**
**न तथा सर्वदा सर्वं त्रायमाणः कथं बुधैः ॥ ४ ॥**

अर्थ — एकदा एका जीवाला रक्षण करणारा मनुष्य जर लोकांनीं पूज्य मानिला जातो, तर मग सर्वदा सर्व जीवांचें रक्षण करणारा मनुष्य विद्वान् लोकांनीं कसा बरें पूज्य मानिला

जाणार नाहीं ?

**चामीकरमयीमुर्वी ददानः पर्वतैः सह ॥**

**एकजीवाभयं नूनं ददानस्य समः कुतः ॥ ५ ॥**

अर्थ— सुवर्णमय भूमी पर्वतासह दान करणारा मनुष्य एक जीवाला अभयदान करणाऱ्याची बरोबरी कशी करील ! मुळींच करणार नाहीं.

**गुणानां दुरवापाणामर्थितानां महात्मभिः ॥**

**दयालुर्जायते स्थानं मणीनामिव सागरः ॥ ६ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें रत्नांचें स्थान समुद्र होतो त्याप्रमाणें दयाळु मनुष्य हा महात्म्यांनीं इच्छा केलेल्या आणि दुष्प्राप्य अशा सर्वगुणांचें स्थान होतो.

**संयमा नियमाः सर्वे दयालोः सन्ति देहिनः ॥**

**जायमाना न दृश्यन्ते भूरुहा धरणीमृते ॥ ७ ॥**

अर्थ—संयम नियम हे सर्व दयाळू जीवाच्या ठिकाणीं असतात, कारण, भूमीवांचून कोठेंहि वृक्ष उत्पन्न झालेले दृष्टीं पडत नाहींत.

**कारणं सर्ववैराणां प्राणिनां विनिपातनम् ॥**

**तत्सदा त्यज्यते त्रेधा कुतो वैरं प्रजायते ॥ ८ ॥**

अर्थ— जीवांची हिंसा करणें हें सर्वप्रकारच्या वैराचें कारण आहे. त्या हिंसेचा त्याग जर मन वचन काय ह्या तिहींच्या योगानें केला, तर मग वैर कसें उत्पन्न होणार? मुळींच होणार नाहीं.

**मनोभूरिव कान्ताङ्गः सुवर्णाद्रिरिव स्थिरः ॥**

**सरस्वानिव गम्भीरो भास्वानिव हि भासुरः ॥ ९ ॥**

**आदेयः सुभगः सौम्यस्त्यागी भोगी यशोनिधिः ॥**

**भवत्यभयदानेन चिरंजीवी निरामयः ॥ १० ॥**

अर्थ— अभयदानानें मनुष्य मदनाप्रमाणें सुंदर, मेरुपर्वताप्रमाणें स्थिर, समुद्राप्रमाणें गंभीर आणि सूर्याप्रमाणें तेजस्वी होतो. तो सर्वांनीं आश्रय करण्याला योग्य, मोठा भाग्यवान्, सौम्य, उदार, भोग भोगणारा, कीर्तीचा समुद्र, दीर्घायु आणि रोगरहित होतो.

**तीर्थकृच्चक्रदेवानां सम्पदो बुधवन्दिताः ॥**
**क्षणेनाभयदानेन दीयन्ते दलितापदः ॥ ११ ॥**

अर्थ— तीर्थंकर आणि चक्रवर्ती ह्यांच्या, पंडितांना वंद्य व विपत्तींचा नाश करणाऱ्या सर्व संपत्ति अभयदानानें एका क्षणांत प्राप्त करून दिल्या जातात.

**तदस्ति न सुखं लोके न भूतं न भविष्यति ॥**
**यन्न सम्पद्यते सद्यो जन्तोरभयदानतः ॥ १२ ॥**

अर्थ— जें अभयदानानें मनुष्याला तत्काल प्राप्त होणार नाहीं तें सुख जगांत आतां नाहीं, मागें नव्हतें व पुढेंही होणार नाहीं.

**शरीरं ध्रियते येन शमेनेव महाव्रतम् ॥**
**कस्तस्याहारदानस्य फलं शक्नोति भाषितुम् ।१३।**

अर्थ— ज्याप्रमाणें शमानें महाव्रतांचें धारण होतें त्याप्रमाणें ज्याच्या योगानें शरीराचें धारण होतें त्या आहारदानाचें फल सांगण्याला कोण बरें समर्थ आहे ?

**आहारेण विना कायो न तिष्ठति कदाचन ॥**
**भास्करेण विना कुत्र वासरो व्यवतिष्ठते ॥ १४ ॥**

अर्थ— आहारावांचून शरीराचें केव्हांही रक्षण होत नाहीं. योग्यच आहे. कारण, सूर्यावांचून दिवस कोठें बरें राहील ?

**शमस्तपो दया धर्मः संयमो नियमो दमः ॥**

**सर्वे तेन वितीर्यन्ते येनाहारो वितीर्यते ॥ १५ ॥**

अर्थ-- ज्यानें आहारदान केलें; त्यानें शम, तप, दया, धर्म, संयम, नियम, दम ह्या सर्वांचें दान केलें असें जाणावें.

**चिन्तितं पूजितं भोज्यं क्षीयते तस्य नालये ॥**
**आहारो भक्तितो येन दीयते व्रतवर्तिनाम् ॥१६॥**

अर्थ— जो व्रती मुनींना भक्तीनें आहार दान करतो, त्याच्या घरांत इच्छित आणि पूज्य ( पवित्र ) असें अन्न केव्हांही कमी पडत नाहीं.

**कल्याणानामशेषाणां भाजनं स प्रजायते ॥**
**सलिलानामिवाम्भोधिर्येनाहारो वितीर्यते ॥१७॥**

अर्थ— ज्याप्रमाणें सर्व उदकांचें स्थान समुद्र आहे त्याप्रमाणें जो आहारदान करतो तो सर्व कल्याणांचें स्थान होतो.

**स्वयमेव श्रियोऽन्विष्य धनं दातारमन्धसः ॥**
**आयान्ति तरसा श्रेष्ठाः सुभगं वनिता इव ॥१८॥**

अर्थ— स्त्रिया ज्याप्रमाणें सुंदर पुरुषाला हुडकत येतात, त्याप्रमाणें श्रेष्ठ अशा संपत्ति अन्नदान करणाऱ्याला हुडकून काढून आपणच त्याच्याकडे त्वरेनें येतात.

**सम्पदस्तीर्थकर्तॄणां चक्रिणामर्धचक्रिणाम् ॥**
**भजन्त्यशनदं सर्वाः पयोधिमिव निम्नगाः ॥ १९ ॥**

अर्थ— तीर्थंकर, चक्रवर्ती आणि अर्धचक्री ( त्रिखंडाधिपति ) ह्या सर्व संपत्ति ज्याप्रमाणें नद्या समुद्रास मिळतात; त्याप्रमाणें अन्नदान करणाऱ्यास प्राप्त होतात.

**प्रक्षीयन्ते न तस्यार्था ददानस्यापि भूरिशः ॥**
**ददाना जनतानन्दं चन्द्रस्येव मरीचयः ॥ २० ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें सर्व लोकांना आनंद देणाऱ्या चंद्राचे

किरण कमी होत नाहींत, त्याप्रमाणें लोकांना विपुल अन्न देणाऱ्यांच्या संपत्ति मुळींच कमी होत नाहींत.

**यत्फलं ददतः पृथ्वीं प्रासुकं यच्च भोजनम् ॥**
**अनयोरन्तरं मन्ये तृणाऽब्धिजलयोरिव ॥ २१ ॥**

अर्थ— पृथ्वीदान करणाऱ्याचें फल आणि प्रासुक असें अन्नदान करणाऱ्याचें फल, ह्या दोहोंत गवताला लागलेलें उदक आणि समुद्रांतील सर्व उदक ह्यासारखें अंतर आहे असें मला वाटतें.

**अन्नदानप्रसादेन यत्र यत्र प्रजायते ॥**
**तत्र तत्रास्यते भोगैर्न भास्वानिव रश्मिभिः । २२।**

अर्थ— जेथें जेथें सूर्य जाईल तेथें तेथें किरणहि त्याच्याबरोबरच असतात; त्याप्रमाणें अन्नदानाच्या प्रसादानें, हा जीव जेथें जेथें जन्म घेतो, तेथें तेथें सुखोपभोग त्याला सोडीत नाहींत.

**ददानोऽशनमात्रं यत्फलमाप्नोति मानवः ॥**
**दाता सुवर्णकोटीनां न कदाचन तत् ध्रुवम् ॥२३॥**

अर्थ— फक्त अन्नदान करणारा मनुष्य जें फल मिळवितो, तें फल कोट्यवधि सुवर्णाचीं नाणीं देणारा केव्हांही मिळवीत नाहीं, हें निश्चित आहे.

**विना भोगोपभोगेभ्यश्चिरं जीवति मानवः ॥**
**न विनाऽऽहारमात्रेण तुष्टिपुष्टिप्रदायिना ॥ २४ ॥**

अर्थ— भोगोपभोगावांचून मनुष्य पुष्कळ दिवस जगतो; परंतु, संतोष आणि पुष्टि देणारें असें नुसतें अन्न जर नसेल तर मात्र जगत नाहीं.

**केवलज्ञानतो ज्ञानं निर्वाणसुखतः सुखम् ॥**
**आहारदानतो दानं नोत्तमं विद्यते परम् ॥ २५ ॥**

अर्थ— जगांत केवलज्ञानाहून दुसरें उत्तम ज्ञान नाहीं, मोक्षसुखाहून दुसरें उत्तम सुख नाहीं आणि आहारदानाहून दुसरें उत्तम दान नाहीं.

अन्धसा क्रियते यावानुपकारः शरीरिणः ॥
न तावान्रत्नकोटीभिः पुञ्जिताभिरिति स्फुटम् ॥२६

अर्थ— अन्नानें मनुष्याला जितका उपयोग होतो तितका उपयोग कोट्यवधि रत्नांचा ढीग केल्यानेंही होत नाहीं, हें स्पष्ट आहे.

हीयन्ते निखिलाश्चेष्टा विना भोजनमात्रया ॥
गुप्तयो व्यवतिष्ठन्ते विना कुत्र तितिक्षया ॥ २७ ॥

अर्थ— भोजनरूपी मात्रेवांचून सर्व व्यवहार नाहींसे होतात. बरोबरच आहे. कारण, सहनशीलता असल्यावांचून गुप्ति कोठें बरें रहातील.

शीर्यते तरसा गात्रं जन्तोर्वर्जितमन्धसा ॥
विना नीरं क सस्यस्य कोमलस्य व्यवस्थितिः॥२८

अर्थ— अन्नानें रहित असें जीवाचें शरीर वेगानें कृश होऊं लागतें. योग्यच आहे. कारण, पाण्यावांचून कोंवळ्या धान्याचें कोठें जीवन व्हावें?

यथाऽऽहारः प्रियः पुंसां न तथा किञ्चनापरम् ॥
विक्रीयन्ते प्रियाः पुत्रास्तदर्थं कथमन्यथा ॥ २९ ॥

अर्थ— मनुष्याला ज्याप्रमाणें आहार प्रिय असतो त्याप्रमाणें दुसरें कांहींही प्रिय असत नाहीं. असें जर नसतें, तर, त्या अन्नाकरितां लोकांनीं आपल्याला प्रिय असलेले पुत्र कां बरें विकले असते?

यत्किञ्चित्सुन्दरं वस्तु दृश्यते भुवनत्रये ॥

तदन्नदायिना क्षिप्रं लभ्यते लीलयाऽखिलम् ॥३०॥

अर्थ— ह्या त्रिभुवनांत ज्या ज्या कांहीं सुंदर वस्तु दिसतात, त्या सर्व वस्तु अन्नदान करणाऱ्याला सहज आणि लवकर प्राप्त होतात.

बहुनाऽत्र किमुक्तेन विना सकलवेदिना ॥
फलं नाहारदानस्य परः शक्नोति भाषितुम् ॥३१॥

अर्थ— ह्या विषयीं पुष्कळ सांगून काय करावयाचें आहे? सर्वज्ञावांचून आहारदानाचें फल सांगण्यास दुसरा कोणी समर्थ नाहीं, येवढें पुरें आहे.

रक्ष्यते व्रतिनां येन शरीरं धर्मसाधनम् ॥
पार्यते न फलं वक्तुं तस्य भैषज्यदायिनः ॥ ३२ ॥

अर्थ— ज्यानें व्रती अशा लोकांचें धर्माला साधनीभूत असलेलें शरीर रक्षण केलें जातें, त्या औषध देणाऱ्याचें पुण्य सांगण्याला कोणीच समर्थ नाहीं.

येनौषधप्रदस्येह वचनैः कथ्यते फलम् ॥
चुलकैर्मीयते तेन पयो नूनं पयोनिधेः ॥ ३३ ॥

अर्थ— औषध देणाऱ्याला मिळणारें फल जो शब्दांनीं सांगतो, तो चुलकानें ( एका हाताच्या पसानें ) समुद्राचें पाणी मोजतो; इतका मूर्ख होय असें समजावें.

वातपित्तकफोत्थानै रोगैरेष न पीड्यते ॥
दावैरिव जलस्थायी भेषजं येन दीयते ॥ ३४ ॥

अर्थ—जो औषध दान करतो तो ज्याप्रमाणें पाण्यांत असलेला जीव रानांतील वणव्यानें पीडिला जात नाहीं; त्याप्रमाणें वात, पित्त, कफ ह्यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या रोगानें पीडिला जात नाहीं.

**रोगैर्निपीडितो योगी न शक्तो व्रतरक्षणे ॥**
**नास्वस्थैः शक्यते कर्तुं स्वस्वकर्म कदाचन ॥ ३५ ॥**

अर्थ— रोगांनीं पीडित झालेला योगी आपल्या व्रतांचें रक्षण करण्याला समर्थ होत नाहीं. कारण, अस्वस्थ मनुष्यांनीं आपापलें कर्म करणें केव्हांही शक्य असत नाहीं.

**न जायते सरोगत्वं जन्तोरौषधदायिनः ॥**
**पावकं सेवमानस्य तुषारं हि पलायते ॥ ३६ ॥**

अर्थ—औषधदान करणाऱ्याला केव्हांही रोग येत नाहीं. कारण, अग्नीचा सहवास करणाऱ्याची थंडी पळून जाते.

**आजन्म जायते यस्य न व्याधिस्तनुतापकः ॥**
**किं सुखं कथ्यते तस्य सिद्धस्येव महात्मनः ॥ ३७ ॥**

अर्थ— ज्याला शरीराला पीडा करणारा असा रोग जन्मभर होत नाहीं त्या महात्म्याचें सिद्धाप्रमाणें असलेलें सुख आह्मीं काय वरें वर्णन करावें ?

**निधानमेष कान्तीनां कीर्तीनां कुलमन्दिरम् ॥**
**लावण्यानां नदीनाथो भैषज्यं येन दीयते ॥ ३८ ॥**

अर्थ— जो औषधदान करतो तो कांतीचा साठा, कीर्तीचें वंशपरंपरागत मंदिर आणि सौंदर्याचा समुद्र होतो.

**ध्वान्तं दिवाकरस्येव शीतं चित्ररुचेरिव ॥**
**भैषज्यदायिनस्तद्वद्रोगित्वं प्रपलायते ॥ ३९ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें सूर्याच्या शरीरापासून अंधार पळून जातो, अग्नीच्या देहापासून थंडी पळून जाते, त्याप्रमाणें औषधदान करणाऱ्याच्या शरीरापासून रोगीपणा दूर पळून जातो.

**आरोग्यं क्रियते येन योगिनां रोगमुक्तये ॥**
**तदीयस्य न धर्मस्य समर्थः कोऽपि वर्णने ॥ ४० ॥**

अर्थ— योग्यांची रोगापासून मुक्तता होण्याकरितां जो त्यांना औषध देऊन निरोगी करितो, त्याच्या धर्माचें वर्णन करण्यास कोणीही समर्थ नाहीं.

चारित्रं दर्शनं ज्ञानं स्वाध्यायो विनयो नयः ॥
सर्वेऽपि विहितास्तेन दत्तं येनौषधं सताम् ॥ ४१ ॥

अर्थ— ज्यानें साधूंना औषधदान केलें, त्यानें चारित्र, दर्शन, ज्ञान, स्वाध्याय, विनय आणि नय हे सर्व केले, असें समजावें.

संसृतिश्छिद्यते येन निर्वृतिर्येन दीयते ॥
मोहो विधूयते येन विवेको येन जन्यते ॥ ४२ ॥
कषायो मर्द्यते येन मानसं येन शम्यते ॥
अकृत्यं त्याज्यते येन कृत्यं येन प्रवर्त्यते ॥ ४३ ॥
तत्त्वं प्रकाश्यते येन येनातत्त्वं निषिध्यते ॥
संयमः क्रियते येन सम्यक्त्वं येन पोष्यते ॥ ४४ ॥
देहिभ्यो दीयते येन तच्छास्त्रं सिद्धिलब्धये ॥
कस्तेन सदृशो धन्यो विद्यते भुवनत्रये ॥ ४५ ॥

अर्थ— ज्यानें संसाराचा नाश केला जातो, ज्यानें मोक्षसुख प्राप्त करून दिलें जातें, ज्यानें मोह घालविला जातो, ज्यानें विचार उत्पन्न केला जातो, ज्यानें कषायाचा नाश केला जातो, ज्यानें मन शांत केलें जातें, ज्यानें अकृत्याचा त्याग करवून कृत्य करविलें जातें, ज्यानें तत्त्व ( पदार्थांचें खरें स्वरूप ) प्रकाशित केलें जातें, जें अतत्त्वाचा ( पदार्थांच्या खोट्या स्वरूपाचा ) निषेध करतें, ज्यानें संयम करविला जातो आणि ज्यानें सम्यक्त्वाची वृद्धि केली जाते, तें शास्त्र मोक्षप्राप्तीकरितां मनुष्यांना जो गृहस्थ दान करतो आणि पढवितो, त्याच्या सारखा धन्य

ह्या त्रिभुवनांत दुसरा कोण बरें आहे?

मुक्तिः प्रदीयते येन शास्त्रदानेन पावनी ॥
लक्ष्मीं सांसारिकीं तस्य प्रददानस्य कः श्रमः ४६

अर्थ— जें शास्त्रदान पवित्र अशी मुक्ति दात्याला प्राप्त करून देतें, त्याला सांसारिक संपत्ति प्राप्त करून देण्याला काय श्रम पडणार आहे?

लभ्यते केवलज्ञानं यतो विश्वावभासकम् ॥
अपरज्ञानलाभेषु कीदृशी तस्य वर्णना ॥ ४७ ॥

अर्थ— ज्याच्यापासून विश्वाचें प्रत्यक्ष करून देणारें केवलज्ञान प्राप्त होतें, त्याच्यापासून दुसऱ्या प्रकारच्या ज्ञानांचा लाभ झाला असतां त्यांत त्याची ( शास्त्रदानाची ) कसली प्रशंसा करावयाची आहे?

मर्त्यामरश्रियं भुक्त्वा भुवनोत्तमपूजिताम् ॥
ज्ञानदानप्रसादेन जीवो गच्छति निर्वृतिम् ॥ ४८ ॥

अर्थ— ह्या ज्ञानदानाच्या प्रसादानें त्रिभुवनांत श्रेष्ठ असलेल्यांनीं पूज्य अशी मनुष्य व देव ह्यांची संपत्ति भोगून जीव मोक्षाला जातो.

चतुरङ्गं फलं येन दीयते शास्त्रदायिना ॥
चतुरङ्गफलं तेन लभ्यते न कथं स्वयम् ॥ ४९ ॥

अर्थ— ज्या शास्त्रदान करणाऱ्यानें धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असें चारही प्रकारचें फल दान केलें जातें, त्यानें तें फल स्वतः मिळविलें जात नाहीं असें कसें होईल?

शास्त्रदायी सतां पूज्यः सेवनीयो मनीषिणां ॥
वादी वाग्मी कविर्मान्यः ख्यातशिष्यः प्रजायते ५०

अर्थ— शास्त्रदान करणारा मनुष्य साधूंना पूज्य होतो,

विद्वानांना सेव्य होतो, मोठा वादी, वक्ता, कवि, सर्वांना मान्य, ज्याचे शिष्य प्रसिद्ध झाले आहेत असा होतो. ह्याप्रमाणें शास्त्र-दानाचें फल सांगितलें.

विचित्ररत्ननिर्माणः प्रोत्तुङ्गो बहुभूमिकः ॥
लभ्यते वासदानेन वासश्चन्द्रकरोज्वलः ॥ ५१ ॥

अर्थ— आतां वसतिकादानाचें फल सांगतात– वसतिका दान करणाऱ्याला अनेकप्रकारच्या रत्नांनीं बांधलेलें, उंच असून अनेक मजले ज्याला आहेत असें आणि चंद्राच्या किरणाप्रमाणें प्रज्वल असें गृह मिळते.

कोमलानि महार्घाणि विशालानि घनानि च ॥
वासोदानेन वासांसि सम्पद्यन्ते सहस्रशः ॥५२॥

अर्थ— आतां वस्त्रदानाचें फल सांगतात– वस्त्रदान करणाऱ्याला मृदु, मोठ्या किमतीचीं, विस्तृत आणि दाट अशीं हजारों वस्त्रें मिळतात.

ददाति जनतानन्दं चन्द्रकान्तिरिवामला ॥
जायते पानदानेन वाणी तापापनोदिनी ॥ ५३ ॥

अर्थ— पान (पिण्याचे पदार्थ पाणी, दूध वगैरे) दान केल्यानें दाता चंद्राच्या स्वच्छ किरणाप्रमाणें जगाला आनंद देतो, आणि त्या दानाच्या योगानें त्याची वाणी दुसऱ्याची पीडा घालविणारी होते.

ददानः प्रासुकं द्रव्यं रत्नत्रितयबृंहकम् ॥
काङ्क्षितं सकलं द्रव्यं लभते परदुर्लभम् ॥ ५४ ॥

अर्थ— रत्नत्रयाची वृद्धि करणारें असें प्रासुक द्रव्य दान करणाऱ्याला इतरांना दुर्लभ असें इच्छित द्रव्य सर्व प्राप्त होतें.

विश्राणयति यो दानं सेवमानस्तपस्विनः ॥

सेव्यते भुवनाधीशैः स तदादेशकांक्षिभिः ॥५५॥

अर्थ— तपस्वी लोकांची सेवा करणारा असा जो मनुष्य त्यांना दान करतो, तो त्याच्या आज्ञेची इच्छा करणाऱ्या जगत्पतींनीं सेविला जातो. ह्मणजे मोठमोठे राजे त्याचे आज्ञाधारक होऊन त्याची सेवा करतात.

यः प्रशंसापरो भूत्वा दानं यच्छति योगिनाम् ॥
प्रशस्यः स सदा सद्भिर्जिनेन्द्र इव नम्यते ॥५६॥

अर्थ— जो योग्यांची स्तुती करीत त्यांना दान करतो, तो सज्जनांनीं स्तुत्य असा होतो; आणि जिनेंद्राप्रमाणें त्याला सर्व लोक नमस्कार करतात.

दत्ते शुश्रूषयित्वा यो दानं संयमशालिनाम् ॥
शुश्रूष्यते बुधैरेष भक्त्या गुरुरिवानिशम् ॥५७॥

अर्थ— संयमी जनांची सेवा करून जो त्यांना दान करतो, त्याची पंडित लोक गुरूप्रमाणें नेहमी सेवा करतात.

आदृत्य दीयते दानं साधुभ्यो येन सर्वदा ॥
आदरेणैष लोकेन निधानमिव गृह्यते ॥५८॥

अर्थ— ज्यानें साधूंना त्यांचा सत्कार करून सर्वदा दान दिलें जातें, त्याला लोक एखाद्या निधानाप्रमाणें (जमिनींत पुरून ठेविलेल्या द्रव्याप्रमाणें) मोठ्या आदरानें जपतात.

पूजापरायणः स्तुत्वा यो यच्छति महात्मनाम् ॥
त्रिदशैस्तीर्थकारीव स्तावं स्तावं स पूज्यते ॥५९॥

अर्थ— जो श्रावक महात्म्यांची पूजा आणि स्तुति करून त्यांना दान करतो तो तीर्थंकराप्रमाणें देवांनीं वारंवार स्तुति करून पूजिला जातो.

यद्यद्दानं सतामिष्टं तपस्संयमपोषकम् ॥

तत्तद्वितरता भक्त्या प्राप्यते फलमीप्सितम् ६०

अर्थ— साधूंना इष्ट असलेलें व त्यांच्या तपाची आणि संयमाची वृद्धि करणारें असें जें जें दान असेल, तें तें दान भक्तीनें देणाऱ्या श्रावकाला इच्छित फल मिळतें.

दानानीमानि यच्छन्ति स्तोकान्यपि महाफलम् ॥
बीजानीव वटादीनां निहितानि विधानतः ॥ ६१

अर्थ— ज्याप्रमाणें वड वगैरेचीं बीजें योग्य प्रकारें रुजत घातलीं असतां तीं मोठे वृक्ष उत्पन्न करतात, त्याप्रमाणें हीं वर सांगितलेलीं दानें थोडीं जरी दिलीं तथापि तीं मोठें फल देतात.

पात्रेभ्यो यः प्रकृष्टेभ्यो मिथ्यादृष्टिः प्रयच्छति ॥
स याति भोगभूमीषु प्रकृष्टासु महोदयः ॥ ६२ ॥
क्रोशत्रयवपुस्तत्र त्रिपल्योपमजीवितः ॥
चिन्ताकल्पितसान्निध्यं सम्भोगसुखमश्नुते ॥६३॥

अर्थ— जो मिथ्यादृष्टि मनुष्य उत्तम पात्राला दान करतो, तो देखील उत्कर्ष पावून उत्तम अशा भोगभूमींत जन्म पावतो. त्या ठिकाणीं त्याचें शरीर तीन कोस लांबीचें होतें, आणि त्याचें आयुष्य तीन पल्योपम कालपर्यंत असतें. तो तेथें मनांत आणल्याबरोबर प्राप्त होणाऱ्या भोगांचें सुख भोगतो.

सदा मनोऽनुकूलाभिः सेव्यमाना दिवानिशम् ॥
नारीभिर्न गतं कालं जानते भोगभूभुवः ॥ ६४ ॥

अर्थ— त्या भोगभूमींत उत्पन्न झालेले जीव आपल्या मनाप्रमाणें वागणाऱ्या स्त्रियांकडून रात्रंदिवस सेविले जात असल्यानें गेलेला काल त्यांना मुळींच कळत नाहीं.

मध्यमानां तु पात्राणां दानतो याति मध्यमाम् ॥
कारणस्यानुरूपं हि कार्यं जगति जायते ॥ ६५ ॥

अर्थ— मध्यम पात्रांना दान करणारा मिथ्यादृष्टि मध्यम अशा भोगभूमींत उत्पन्न होतो. कारण, जगांत जें कार्य उत्पन्न होत असतें तें कारणाला अनुसरूनच ह्मणजे त्याच्या योग्यतेचेंच उत्पन्न होतें.

**द्विक्रोशोच्छ्रयदेहोऽसौ द्विपल्यायुर्निरामयः ॥**
**स तत्रास्ते महावासः कान्तास्याम्भोजषट्पदः ॥६६**

अर्थ— तो त्या ठिकाणीं दोन कोस उंचीचा ज्याचा देह आहे आणि दोन पल्य ज्याचें आयुष्य आहे असा निरोगी, मोठ्या गृहांत रहाणारा आणि आपल्या सुंदर स्त्रीच्या मुखकमलावरील भ्रमरच कीं काय असा होऊन रहातो.

**जघन्येभ्यः स पात्रेभ्यो जघन्यां याति दानतः ॥**
**एकक्रोशोच्छ्रयो भूमिमेकपल्योपमस्थितिः ॥ ६७ ॥**

अर्थ— तोच दाता जर जघन्यपात्राला ( कनिष्ठ पात्राला ) दान करील, तर, त्या दानाच्या योगानें जघन्य भोगभूमींत जन्म पावतो. त्याचें शरीर एक कोस उंच असून त्याचें आयुष्य एक पल्योपम कालपर्यंत असतें.

**बदरामलकबिभीतकमात्रं त्रिद्व्येकवासरैः क्रमशः ॥**
**आहारं कल्याणं दिव्यरसं भुञ्जते धन्याः ॥ ६८ ॥**

अर्थ— ते वर सांगितलेले उत्तम, मध्यम, कनिष्ठ पात्राला दान करणारे पुण्यवान जीव जे असतात, ते क्रमानें बोरा येवढा आंवळ्या येवढा आणि बेहड्या येवढा दिव्य रुचीनें युक्त व कल्याण कारक असा आहार क्रमानें तीन दोन व एक अशा दिवसांनीं करतात ह्मणजे जे उत्तमभोगभूमींत जन्मतात ते बोरा येवढा आहार तीन दिवसांनीं एकदा करतात जे मध्यमभोगभूमींत जन्मतात, ते आंवळ्या येवढा आहार दोन दिवसांनीं ग्रहण

करतात; आणि जे कनिष्ठ भोगभूमींत जन्मास येतात ते बेहड्या येवढा आहार एक दिवसानें ग्रहण करतात

**विश्राणयन्यतीनामुत्तममध्यमजघन्यपरिणामैः ॥**
**दानं गच्छति भूमीरुत्तममध्यमजघन्या वा ॥६९॥**

अर्थ— जो पुरुष उत्तम, मध्यम अथवा जघन्य अशा आत्मपरिणामानें युक्त असा होत्साता यतींना दान करतो तो क्रमानें उत्तम, मध्यम, जघन्य ह्या भोगभूमींत जातो. अर्थात् उत्तम परिणामानें युक्त होऊन जो यतींना दान करतो तो उत्तमभोगभूमींत जन्मतो. मध्यम परिणामानें युक्त होऊन जो दान करतो तो मध्यम भोगभूतींत उत्पन्न होतो. आणि कनिष्ठ परिणामानें युक्त होऊन जो दान करतो तो कनिष्ठ भोगभूमींत उत्पन्न होतो, असें जाणावें.

**सर्वे द्वन्द्वपरित्यक्ताः सर्वे क्लेशविवर्जिताः ॥**
**सर्वे यौवनसम्पन्नाः सर्वे सन्ति प्रियंवदाः ॥७०॥**

अर्थ— त्या तीन्ही प्रकारच्या भोगभूमींत जन्माला आलेले सर्व जीव द्वंद्वरहित (स्वपरभावशून्य) असतात, त्यांना कोणत्याहि प्रकारचे क्लेश नसतात, ते सर्वच तरुण असतात, आणि ते सर्व एकमेकांशीं मधुर बोलणारे असतात.

**मददैन्यश्रमायासक्रोधलोभभयक्लमाः ॥**
**मुक्तानामिव नो तेषां नाप्यन्यत्र गमागमाः ॥७१॥**

अर्थ— गर्व, दीनता, शारीर श्रम, मानस श्रम, क्रोध, लोभ, भय आणि ग्लानि हे विकार जसे मुक्तजीवांना नसतात, तसेच त्या भोगभूमींत उत्पन्न झालेल्या जीवांनाही नसतात, तसेंच दुसरीकडे जाणें येणें हेंही त्यांना नसतें.

**अयमेव विशेषोऽस्ति देवेभ्यो भोगभागिनाम् ॥**

**यत्ते यान्ति मृता नाकं देवास्तिर्यङ्नरत्वयोः ॥ ७२**

अर्थ— भोगभूमींत उत्पन्न झालेल्या जीवांमध्यें देवांपेक्षां एक जास्त आहे, तें हें कीं, देव मृत झाल्यावर ( ह्मणजे स्वर्गांतील देहाचा त्याग केल्यावर ) तिर्यग्योनि अथवा मनुष्ययोनि ह्यांमध्यें उत्पन्न होतात; आणि भोगभूमींतील जीव मृत झाल्यावर स्वर्गाला जातात ह्मणजे देव होतात.

**यतो मन्दकषायास्ते ततो यान्ति त्रिविष्टपम् ॥**
**उक्तं तीव्रकषायत्वं दुर्गतेः कारणं परम् ॥ ७३ ॥**

अर्थ— ज्या अर्थी भोगभूमींतील जीव मंदकषायी असतात, त्या अर्थी ते स्वर्गालाच जातात. कारण, कषायांची तीव्रता हेंच दुर्गतीचें मोठें कारण आहे; असें शास्त्रांत सांगितलें आहे.

**दीयन्ते चिन्तिता भोगा येषां कल्पमहीरुहैः ॥**
**दशाङ्गैः कः सुखं तेषां शक्तो वर्णयितुं गिरा ७४**

अर्थ— ज्या भोगभूमींतील जीवांना चिंतित असे भोग दहा अंगांनीं युक्त अशा कल्पवृक्षानीं दिले जातात, त्यांच्या सुखाचें वाणीनें वर्णन करण्यास कोण समर्थ आहे?

**न वियोगः प्रियैः सार्धं न संयोगोऽप्रियैः सह ॥**
**न व्रतं न तपस्तेषां न वैरं न पराभवः ॥ ७५ ॥**

अर्थ— त्यांना प्रिय वस्तूंचा वियोग आणि अप्रिय वस्तूंचा संयोग होत नाहीं. त्यांना व्रत नाहीं, तप नाहीं, कोणाशीं त्यांचें वैर नाहीं, आणि कोणांपासून पराभवही होत नाहीं.

**यतः स्वस्वामिसम्बन्धस्तेषां नास्ति कदाचन ॥**
**परच्छन्दानुवर्तित्वं ततस्तेषां कुतस्तनम् ॥ ७६ ॥**

अर्थ— ज्या अर्थी भोगभूमींत जन्मलेल्या जीवांमध्यें सेव्यसेवकभाव केव्हांही नाहीं, त्या अर्थी दुसऱ्याच्या मर्जीप्रमाणें

वागण्याचा प्रसंग तरी त्यांना कशानें असणार?

नापूर्णे समये सर्वे ते म्रियन्ते कदाचन ॥
रचयन्ति न पैशून्यं सुखसागरमध्यगाः ॥ ७७ ॥

अर्थ— ते सर्व जीव आपापल्या आयुष्याचा काल पूर्ण झाल्यावांचून केव्हांही मरत नाहींत. आणि नेहमीं सुखाच्या समुद्रांत असल्यानें कोणाचेंही उणें करूं पहात नाहींत.

आयासेन विना भोगी नीरोगीभूतविग्रहः ॥
क्षुतेन पुरुषस्तत्र म्रियते जृम्भयाऽङ्गना ॥ ७८ ॥

अर्थ—त्या भोगभूमींत ज्याचा देह रोगरहित झालेला आहे असा पुरुष खटपटीवांचून भोग भोगतो. पुरुष शिंक येऊन मरण पावतो आणि स्त्री जांभईनें मरण पावते.

ते जायन्ते कलालापा मकरध्वजसन्निभाः ॥
सर्वे भोगक्षमा रम्या दिनानां सप्तसप्तकैः ॥ ७९ ॥

अर्थ— ते भोगभूमींत जन्माला आलेले सर्व जीव सात सप्तकांनीं ( जन्मल्यापासून एकोनपन्नास दिवसांनीं ) मधुर बोलणारे, मदनाप्रमाणें सुंदर, भोगांचा उपभोग घेण्याला समर्थ आणि रमणीय असे होतात.

कोमलालापया कान्तः कान्तयाऽऽर्यो निगद्यते ॥
कान्तेनार्या पुनः कान्ता चित्रचाटुविधायिना ॥ ८०

अर्थ— त्या ठिकाणीं मधुर भाषण करणाऱ्या स्त्रीनें युक्त असलेल्या पुरुषाला आर्य म्हणतात. आणि स्त्रीचें अनेक प्रकारचें प्रिय करणाऱ्या पतीनें युक्त असलेल्या स्त्रीला आर्या असें म्हणतात.

आदेयाः सुभगाः सौम्याः सुन्दराङ्गा वशंवदाः ॥
रमन्ते सह रामाभिः स्वसमाभिर्मिथो मुदा ॥ ८१ ॥

अर्थ— स्त्रियांनीं स्वीकार करण्याला योग्य, भाग्यशाली, सौम्य, सुंदराकृति आणि स्त्रियांना अनुकूल वागणारे असे पुरुष आपल्या सारख्या अशा स्त्रियांशीं आनंदानें एकांतीं क्रीडा करतात.

**युग्ममुत्पद्यते सार्धं युग्मं यत्र विपद्यते ॥**
**शोकाक्रन्दादयो दोषास्तत्र सन्ति कुतस्तना:॥८२॥**

अर्थ— ज्या ठिकाणीं स्त्रीपुरुषांचें युग्म एकदम उत्पन्न होतें आणि एकदमच मृत्यु पावतें; तेथें शोक, आक्रंद वगैरे दोष कोठून असणार?

**करिकेसरिणौ यत्र तिष्ठन्तौ बान्धवाविव ॥**
**एकत्र सर्वदा प्रीत्या सख्यं तत्र किमुच्यते ॥८३॥**

अर्थ— ज्या ठिकाणीं हत्ती आणि सिंह एका ठिकाणीं बंधू-प्रमाणें सर्वदा प्रेमानें रहातात, तेथें एकमेकांचें प्रेम काय सांगावें?

**कुपात्रदानतो याति कुत्सितां भोगमेदिनीम् ॥**
**उप्ते क: कुत्सिते क्षेत्रे सुक्षेत्रफलमश्नुते ॥ ८४ ॥**

अर्थ— कुपात्राला दान केल्यानें दान करणारा जीव वाईट अशा भूमींत गमन करतो. योग्यच आहे. कारण वाईट शेतांत धान्य पेरलें तर चांगल्या शेतांत उत्पन्न होणारें फल त्याला कसें मिळेल?

**येऽन्तरद्वीपजा: सन्ति ये नरा म्लेच्छखण्डजा: ॥**
**कुपात्रदानत: सर्वे ते भवन्ति यथायथम् ॥८५॥**

अर्थ— अंतरद्वीपामध्यें जे जीव उत्पन्न झालेले आहेत व म्लेच्छखंडांत जे जीव उत्पन्न झालेले आहेत ते सर्व जीव कुपात्राला दान केल्यामुळें आपापल्या योग्यतेप्रमाणें उत्पन्न झाले आहेत.

**वर्यमध्यजघन्यासु तिर्यञ्चः सन्ति भूषु ये ॥**
**कुपात्रदानवृक्षोत्थं भुञ्जन्ते तेऽखिलाः फलम् ॥८६॥**

अर्थ— उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ ह्या भोगभूमीमध्यें जे तिर्यंच जीव आहेत ते सर्व कुपात्रदानरूपी वृक्षापासून उत्पन्न झालेलें फल भोगीत आहेत.

**दासीदासद्विपम्लेच्छसारमेयादयोऽत्र ये ॥**
**कुपात्रदानतो भोगस्तेषां भोगवतां स्फुटम् ॥८७॥**

अर्थ— ह्या पृथ्वीवर जे जीव दासी, दास, हत्ती, म्लेच्छ, कुत्रीं वगैरे झाले आहेत त्या भोगी जीवांना हा अशा प्रकारचा भोग कुपात्रीं दान केल्यामुळेंच प्राप्त झालेला आहे, हें स्पष्ट आहे.

**दृश्यन्ते नीचजातीनां ये भोगा भोगिनामिह ॥**
**सर्वे कुपात्रदानेन ते दीयन्ते महोदयाः ॥ ८८ ॥**

अर्थ— नीचजातींत जन्मलेल्या जीवांचे जे भोग ह्या जगांत दृष्टीं पडतात ते मोठ्या प्रमाणानें उदय पावलेले असे सर्व भोग कुपात्रदानानें उत्पन्न केलेले असतात, तें कुपात्रदानाचें फल होय.

**अपात्राय धनं दत्तं व्यर्थं सम्पद्यतेऽखिलम् ॥**
**ज्वलिते पावके क्षिप्तं बीजं कुत्राङ्कुरीयते ॥८९॥**

अर्थ— अपात्राला दिलेलें सर्व द्रव्य व्यर्थ होतें. कारण, पेटलेल्या अग्नींत टाकलेलें बीज कोठें तरी उगवत असतें काय?

**अपात्रदानतः किञ्चिन्न फलं पापतः परम् ॥**
**लभ्यते हि फलं खेदो वालुकापुञ्जपीडने ॥ ९० ॥**

अर्थ— अपात्राला केलेल्या दानाचें फल पापावांचून दुसरें कांहींच मिळत नाहीं. वाळूचा ढीग कुटण्यांत श्रम हेंच फल मिळतें.

**विश्राणितमपात्राय विधत्तेऽनर्थमूर्जितम् ॥**
**अपथ्यं भोजनं दत्ते व्याधिं किं न दुरुद्धरम् ॥९१॥**

अर्थ—अपात्राला दिलेलें दान मोठा अनर्थ उत्पन्न करतें. योग्यच आहे. कारण अपथ्य पदार्थ भक्षणें हें दुर्जय अशा रोगाला उत्पन्न करीत नाहीं काय ?

**संस्कृत्य सुन्दरं भोज्यं येनापात्राय दीयते ॥**
**उत्पाद्य प्रबलं धान्यं दह्यते तेन दुर्धिया ॥९२॥**

अर्थ—उत्तम असे भक्ष्य पदार्थ तयार करून जो दुर्बुद्धि मनुष्य ते अपात्राला देतो तो चांगलें धान्य उत्पन्न करून जाळून टाकितो.

**शीघ्रं पात्रेण संसारादेकेनापि महीयसा ॥**
**तार्यन्ते बहवो लोकाः पोतेनेव पयोनिधेः ॥ ९३ ॥**

अर्थ—ज्याप्रमाणें एका लहान नौकेनेंही समुद्रांतून पुष्कळ लोक तरून नेले जातात, त्याप्रमाणें एकाच सत्पात्रानेंही पुष्कळ लोक ह्या संसारापासून त्वरित तरून नेले जातात.

**जगदुद्योतते सर्वमेकेनापि विवस्वता ॥**
**नक्षत्रनिवहैः सर्वैरुदितैरपि नो पुनः ॥ ९४ ॥**

अर्थ—हें सर्व जग एका सूर्याच्या योगानेंच प्रकाशित होतें. पण सर्व नक्षत्रें एकदम जरी उगवतात तथापि त्यांच्या योगानें प्रकाशित होत नाहीं.

**एकेनापि सुपात्रेण तार्यते भवनीरधेः ॥**
**सहस्रैरप्यपात्राणां पुञ्जितैर्न पुनर्जनः ॥ ९५ ॥**

अर्थ—म्हणून एका सुपात्रानेंही पुष्कळ लोक ह्या संसार-समुद्रापासून तरून नेले जातात. परंतु, हजारो अपात्र लोक जरी एके ठिकाणीं गोळा केले, तथापि ही गोष्ट होत नाहीं.

**अपात्रदानदोषेभ्यो बिभ्यता पुण्यशालिना ॥**
**विबुध्य यत्नतः पात्रं देयं दानं विधानतः ॥ ९६ ॥**

अर्थ— ह्मा करितां अपात्रीं दान केल्यापासून होणाऱ्या दोषांना भिणाऱ्या पुण्यवान् मनुष्यानें प्रयत्नानें पात्र हुडकून काढून, त्याला यथाविधि दान द्यावें.

अपात्राय धनं दत्ते यो हित्वा पात्रमुत्तमम् ॥
साधुं विहाय चोराय धनमर्पयति स्फुटम् ॥ ९७ ॥

अर्थ— जो श्रावक उत्तम पात्राचा त्याग करून अपात्राला द्रव्य देतो, तो सज्जनाला टाकून चोराला द्रव्य देतो ही गोष्ट स्पष्ट आहे.

अपात्रमिति यः पात्रं विबुद्धिरवलोकते ।
चिन्तामणिमसौ मन्ये मन्यते लोष्टसन्निभम् ॥ ९८

अर्थ — जो बुद्धिहीन मनुष्य पात्राला अपात्र असें समजतो, तो चिंतामणि रत्नाला ढेंकूळाप्रमाणें समजतो, असें मला वाटतें.

त्यक्त्वा शर्मप्रदं पात्रमपात्रं स्वीकरोति यः ॥
स कालकूटमादत्ते मुक्त्वा पीयूषमस्तधीः ॥ ९९ ॥

अर्थ— सुखप्रद अशा प्रकारचें पात्र टाकून जो अपात्राचा स्वीकार करतो, तो मूर्ख अमृत टाकून कालकूट विष ग्रहण करतो.

पात्रापात्रविभागेन मिथ्यादृष्टेरिदं फलम् ॥
उदितं दानजं प्राज्यं सम्यग्दृष्टेर्वदाम्यतः ॥ १०० ॥

अर्थ— हें जें वर सांगितलेलें दानाचें फल तें सर्व पात्र आणि अपात्र ह्यांची निवड करून मिथ्यादृष्टीला प्राप्त होणारें फल सांगितलें. आतां दानापासून सम्यग्दृष्टीला जें पुष्कळ पुण्य उत्पन्न होतें, तें सांगतों.

दानं त्रिविधपात्राय सम्यग्दृष्टिर्यथागमम् ॥
ददानो लभते याच्यां कल्याणानां परम्पराम् १०१

अर्थ— उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ अशा तीनही प्रकारच्या

पात्राला यथाशास्त्र दान करणारा सम्यग्दृष्टि मनुष्य दुसऱ्यानें इच्छा करण्यास योग्य अशा कल्याणपरंपरेला प्राप्त होतो.

पात्राय विधिना दत्वा दानं मृत्वा समाधिना ॥
अच्युतान्तेषु कल्पेषु जायन्ते शुद्धदृष्टयः ॥ १०२ ॥

अर्थ— सम्यग्दृष्टि श्रावक पात्राला यथाविधि दान करून व समाधीनें मरण पावून अच्युतकल्पापर्यंतच्या कल्पांत उत्पन्न होतात.

उत्पद्योत्पादशय्यायां देहोद्योतितपुष्कराः ॥
सुप्तोत्थिता इव क्षिप्रमुत्तिष्ठन्ति दिवौकसः १०३

अर्थ— हे अच्युतकल्पापर्यंतच्या कल्पांत जन्मास येणारे देव उपपादशय्येवर उत्पन्न होतात. आणि ज्यांनीं आपल्या शरीराच्या कांतीनें आकाश प्रकाशित केलें आहे असे ते निजून उठलेल्या मनुष्याप्रमाणें चट्कन उठून बसतात.

निषण्णैस्तत्र शय्यायां तैरीक्ष्यन्ते समन्ततः ॥
निकाया देवदेवीनां रचिताञ्जलिकुड्मलाः ॥ १०४॥

अर्थ— त्या शय्येवर उठून बसलेले असे ते देव आपल्या भोवतीं देव आणि देवी ह्यांचे समूह हात जोडून उभे राहिलेले अवलोकन करतात.

स्तुवाना मां स्तवैः श्रव्यैर्दिव्याभरणभासुराः ॥
मूर्ताः केऽमी विलोक्यन्ते पुण्यपुञ्जा इवाभितः ॥१०५॥

अर्थ— श्रवण करण्याला योग्य अशा स्तुतींनीं माझी स्तुति करणारे व दिव्य अशा अलंकारांनीं देदीप्यमान दिसणारे असे मूर्तिमान् पुण्यपुंजच कीं काय असे हे माझ्या भोवतीं कोण बरें दिसतात? असें त्याला वाटूं लागतें.

रम्या रामा मयेमाः काश्चित्रचाटुपरायणाः ॥

**लावण्याम्बुनिधेर्वेला लोक्यन्ते कलनिस्वनाः ॥ १०६ ॥**

अर्थ— त्याला वाटतें कीं, अनेक प्रकारचीं मधुर भाषणें करणाऱ्या मधुरस्वर असलेल्या आणि रमणीय असल्यानें सौंदर्यसमुद्राच्या मर्यादाच कीं काय अशा ह्या, मला दिसत असलेल्या स्त्रिया कोण बरें असाव्यात?

**किमिदं दृश्यते स्थानं रामणीयकमन्दिरम् ॥**
**कथमत्राहमायातः किं स्वप्नोऽयमुतान्यथा ॥ १०७ ॥**

अर्थ— आणखी त्याला वाटतें कीं, हें सुंदर अशा मंदिरानें युक्त असलेलें स्थान मला कसलें दिसत आहे? मी ह्या ठिकाणीं कसा बरें आलों? मी पहातों हें स्वप्न आहे कीं खरें आहे?

**किमकारि मया पुण्यं यातो येनात्र बन्धुरे ॥**
**न पुण्यव्यतिरेकेण लभते सुखसम्पदम् ॥ १०८ ॥**

अर्थ— तो मनांत ह्मणतो कीं, मीं काय बरें पुण्य केलें होतें? ज्या योगानें ह्या सुंदर स्थलीं प्राप्त झालों. कारण, पुण्यावांचून अशी सुखसंपत्ति मिळावयाची नाहीं.

**इत्थं चिन्तयतां तेषां भवकारणकोऽवधिः ॥**
**सम्पद्यते तरां दीप्रः पूर्वसम्बन्धसूचकः ॥ १०९ ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें विचार करीत असलेल्या त्या देवांना त्या भवाच्या निमित्तानें उत्पन्न होणारें न अत्यंत तेजस्वी आणि पूर्वभवांतील संबंध सुचविणारें असें अवधिज्ञान उत्पन्न होतें.

**ज्ञानेन तेन विज्ञाय दानपुण्यप्रभावतः ॥**
**त्रिदशीभूतमात्मानं ते व्रजन्ति सुखासिकाम् ११०**

अर्थ— त्या अवधिज्ञानाच्या योगानें ते देव "आपण दानपुण्याच्या सामर्थ्यानें देव झालों आहोंत" असें जाणून सुखानें तेथें रहातात.

**प्रीतेनामरवर्गेण स्वसम्बन्धेन सादरम् ॥**
**क्रियमाणं ततस्तुष्टा भजन्ते जननोत्सवम् ॥ १११ ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें जन्माला आलेले देव, आपल्या संबंधानें आनंदित झालेल्या देवांनीं आदरानें केलेल्या आपल्या जन्मोत्सवाचा उपभोग संतोषानें घेतात.

**ज्ञात्वा धर्मप्रसादेन तत्र प्रभवमात्मनः ॥**
**पूजयन्ति जिनार्चास्ते भक्त्या धर्मस्य वृद्धये ११२ ॥**

अर्थ— त्या ठिकाणीं आपली उत्पत्ति धर्माच्या प्रसादानें झाली आहे, हें जाणून, ते देव धर्माची वृद्धी होण्याकरितां भक्तीनें जिनबिंबांची पूजा करतात.

**सुखवारिधिमग्नास्ते सेव्यमानाः सुधाशिभिः ॥**
**सर्वदा व्यवतिष्ठन्ते प्रतिबिम्बमिवात्मनः ॥ ११३ ॥**

अर्थ— मग सुखसमुद्रांत मग्न झालेले व देव ज्यांची सेवा करीत आहेत असे ते देव सुखस्वरूप असलेल्या आत्म्याच्या प्रतिबिंबाप्रमाणें सर्वदा सुखानें रहातात.

**ते सर्वे क्लेशनिर्मुक्ता द्वाविंशतिमुदन्वताम् ॥**
**आसते तत्र भुञ्जाना दानवृक्षफलं सुराः ॥ ११४ ॥**

अर्थ— पुढें ते दानरूपी वृक्षाच्या फलाचा उपभोग करणारे देव क्लेशरहित असे होत्साते बावीस सागर कालपर्यंत तेथें रहातात.

**तेषां सुखप्रमां वक्ति वचोभिर्यो महात्मनाम् ॥**
**प्रयाति पदविक्षेपैर्गगनान्तमसौ ध्रुवम् ॥ ११५ ॥**

अर्थ— त्या महात्म्यांच्या सुखाचें प्रमाण जो आपल्या वाणीनें सांगतो, तो पावलें टाकून आकाशाच्या शेवटाला जातो, म्हणजे, पावलांनीं आकाशाचें परिमाण ठरवितो, असें खचित समजावें.

**नवयौवनसम्पन्ना दिव्यभूषणभूषिताः ॥**
**ते वरेण्यादिसंस्थाना जायन्तेऽन्तर्मुहूर्ततः ॥ ११६ ॥**

अर्थ— ते माहेंद्रादिकल्पांत उत्पन्न होणारे जीव नवीन तारुण्यानें युक्त, दिव्यभूषणानें सुशोभित आणि ज्यांच्या शरीराची रचना श्रेष्ठ अशा पहिल्या प्रकारची (समचतुरस्र नांवाच्या संस्थानाची) आहे असे अंतर्मुहूर्त कालांत होतात.

**तेषां खेदमदस्वेदजरारोगादिवर्जिताः ॥**
**जायन्ते भास्कराकाराः स्फटिका इव विग्रहाः ॥ ११७ ॥**

अर्थ— त्यांचे देह श्रम, मद, घाम, वृद्धपणा, रोग इत्यादि दुर्विकारांनीं रहित आणि स्फटिकाप्रमाणें स्वच्छ व सूर्याप्रमाणें तेजस्वी असे होतात.

**राजते हृदये तेषां हारयष्टिर्विनिर्मला ॥**
**निसर्गसम्भवा मूर्ता सम्यग्दृष्टिरिव स्थिता ॥ ११८ ॥**

अर्थ— त्यांच्या हृदयांवर निर्मल अशा प्रकारची हारयष्टि (हार) निर्मल अशी सम्यग्दृष्टीच कीं काय! अशी स्वभावसिद्ध शोभत असते.

**मुकुटो मस्तके तेषामुद्योतितदिगन्तरः ॥**
**निषेधान इवादित्यं तमोध्वंसी विभासते ॥ ११९ ॥**

अर्थ— त्यांच्या मस्तकांवर, ज्यानें सर्वदिशा प्रकाशित केल्या आहेत असा असल्यामुळें आणि अंधकाराचा नाश करीत असल्यामुळें सूर्याचा तिरस्कारच करीत आहेत कीं काय! असा मुकुट सुशोभित दिसत असतो.

**निधुवनकुशलाभिः पूर्णचन्द्राननाभिः ।**
**स्तनभरविनताभिर्मन्मथाध्यासिताभिः ॥**
**पृथुतरजघनाभिर्बन्धुराभिर्वधूभिः ।**

समममलवचोभिः सर्वदा ते रमन्ते ॥ १२० ॥

अर्थ— सुरतक्रीडेमध्यें कुशल, पूर्णचंद्राप्रमाणें आनंद देणाऱ्या वदनांनीं युक्त, स्तनांच्या भारामुळें नम्र झालेल्या, मदनविकारांचें स्थान अशा व ज्यांचे कटीप्रदेशाच्या खालचे भाग प्रशस्त आहेत अशा आणि मधुर भाषण करणाऱ्या सुंदर युवतींशीं सहवर्तमान ते सर्वदा रममाण होत असतात.

दिवोऽवतीर्योचितचित्तवृत्तयो ।
महानुभावा भुवि पुण्यशेषतः ॥
भवन्ति वंशेषु बुधार्चितेषु ।
विशुद्धसम्यक्त्वधरा नरोत्तमाः ॥ १२१ ॥

अर्थ—ज्यांची चित्तवृत्ति शुद्ध आहे असे ते महाभाग स्वर्गांतील आयुष्य समाप्त झाल्यावर तेथून च्युत होऊन कांहीं पुण्य शेष राहिलें असल्यामुळें सज्जनांनीं पूज्य अशा वंशांत उत्पन्न होतात. आणि शुद्धसम्यक्त्व धारण करणारे असे असल्यामुळें ते सर्वांत श्रेष्ठ असे होतात.

अवाप्य ते चक्रधरादिसम्पदं ।
मनोरमामत्र विपुण्यदुर्लभाम् ॥
नयन्ति कालं निखिलं निराकुला ।
न लभ्यते किं खलु पात्रदानतः ॥ १२२ ॥

अर्थ— ते पुण्यवान् जीव ह्या लोकांत पातक्यांना दुर्लभ अशी चक्रवर्ती वगैरेंची मनोहर संपत्ति मिळवून आपल्या आयुष्याचा सर्व काल कोणत्याही प्रकारें व्यग्र न होतां घालवितात. पात्रदानानें काय बरें मिळत नाहीं? सर्व मिळतें.

निषेव्य लक्ष्मीमिति शर्मकारिणीं ।
प्रथीयसीं द्वित्रिभवेषु कल्मषम् ॥

प्रदह्य ते ज्ञानकृशानुनाऽखिलं ।
श्रयन्ति सिद्धिं विगतापदं सदा ॥ १२३ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें सुख देणाऱ्या मोठ्या संपत्तीचा अनुभव करून ते दोन तीन भवांत ज्ञानाग्नीच्या योगानें सर्व कर्मांचा नाश करतात. आणि ज्यांत विपत्ति (दुःख) नाहीं अशा मोक्षाचा सर्वदा आश्रय करतात.

विधाय सप्ताष्टभवेषु वा स्फुटं ।
जघन्यतः कल्मषकक्षकर्तनम् ॥
व्रजन्ति सिद्धिं मुनिदानवासिता ।
व्रतं चरन्तो जिननाथभाषितम् ॥ १२४ ॥

अर्थ— अथवा ते मुनींना दान केल्यामुळें सुसंस्कृत झालेले असे पुण्यवान् जीव जघन्यपक्षानें सात आठ भवांत कर्मारण्याचा नाश करून श्रीजिनेंद्रांनीं सांगितलेल्या व्रतांचें आचरण करणारे असे होत्साते निश्चयानें सिद्धीला जातात.

पात्रदानमहनीयपादपः ।
शुद्धदर्शनजलेन वर्द्धितः ॥
यद्ददाति फलमर्चितं सतां ।
तस्य को भवति वर्णने क्षमः ॥ १२५ ॥

अर्थ— पात्रदानरूपी पूज्य वृक्ष शुद्धदर्शनरूपी जलानें वाढविला असतां सज्जनांना जें उत्तम फल देतो त्याचें वर्णन करण्याला कोण समर्थ आहे? कोणी नाहीं.

गणेशिनाऽमितगतिना यदीरितं ।
दानजं फलमिदमीर्यते परैः ॥
विभासितं दिनमणिना यदम्बरं ।
भास्यते कथमपि दीपकैरिदम् ॥ १२६ ॥

अर्थ— अपरिमित अशा ज्ञानानें युक्त असलेल्या गणधरानें जें दानापासून उत्पन्न होणारें फल सांगितलें आहे, तेंच फल दुसरेही विद्वान सांगत असतात. ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण, सूर्यानें प्रकाशित केलेलेंच हें आकाश दीपही कसेंतरी प्रकाशित करीत असतात.

इत्यमितगत्याचार्यकृतोपासकाचारे
एकादशः परिच्छेदः

---

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

# परिच्छेद बारावा.

**भावद्रव्यस्वभावा यैरुन्नताः कर्मपर्वताः ॥**
**विभिन्ना ध्यानवज्रेण दुःखव्यालालिसङ्कुलाः ॥१॥**

अर्थ-- ज्या जिनेंद्रांनीं दुःखरूपी सर्पांनीं व्यापलेले, भाव आणि द्रव्य ह्या दोन स्वभावाचे फार मोठे असे कर्मपर्वत ध्यानरूपी वज्रानें फोडून टाकिले,

**कर्मक्षयभवाः प्राप्ता मुक्तिदूतीरघाच्छिदः ॥**
**नवकेवललब्धीर्ये पञ्चकल्याणभागिनः॥ २ ॥**

अर्थ— गर्भावतरण वगैरे पांच कल्याणांना प्राप्त झालेल्या अशा ज्या जिनेंद्रांनीं; कर्मक्षयामुळें उत्पन्न झालेल्या आणि पापांचा नाश करणाऱ्या अशा व मुक्तिलक्ष्मीच्या दूतीच कीं काय अशा ज्या नऊ केवललब्धी, त्या मिळविल्या आहेत,

**सर्वभाषामयी भाषा बोधयन्ती जगत्रयीम् ॥**
**आश्चर्यकारिणी येषां श्वासोष्ठस्पन्दवर्जिता ॥ ३ ॥**

अर्थ-- सर्वभाषामय आणि त्रैलोक्याला ज्ञान करून देणारी अशी ज्या जिनेंद्रांची दिव्यध्वनिरूपी आश्चर्यकारक वाणी श्वास आणि ओंठ ह्यांच्या चलनावांचून उत्पन्न झाली आहे,

**वचांसि तापहारीणि पयांसीव पयोमुचः ॥**
**क्षिपन्तो लोकपुण्येन भूतले विहरन्ति ये ॥ ४ ॥**

अर्थ— मेघांच्या उदकाप्रमाणें ताप शांत करणारीं अशीं उपदेशवाक्यें भव्यजीवांच्या पुण्यामुळें उच्चार करीत जे भगवान्

ह्या भूतलावर विहार करतात,

प्रातिहार्याष्टकं कृत्वा येषां लोकातिशायिनीम् ॥
सपर्यां चक्रिरे सर्वे सादरा भुवनेश्वराः ॥ ५ ॥

अर्थ— आदरानें युक्त असे संपूर्ण त्रैलोक्याधिपति ( देवेंद्र, नागेंद्र वगैरे ) आठ प्रातिहार्यें करून ज्या प्रभूंची सर्व लोकांना आश्चर्यकारक अशी पूजा करते झाले,

येषामिन्द्राज्ञया यक्षः स्वर्गशोभाभिभाविनीम् ॥
करोत्यास्थायिकीं कीर्णां लोकत्रितयजन्तुभिः ॥ ६ ॥

अर्थ— इंद्राच्या आज्ञेनें कुबेर ज्या भगवंतांची स्वर्गाच्या शोभेचा पराभव करणारी जिची शोभा आहे अशी समवसरण सभा त्रैलोक्यांतील सर्व जीवांनीं व्याप्त अशी करतो,

आद्यसंहतिसंस्थाना निःस्वेदा क्षीरशोणिता ॥
राजते सुन्दरा येषां सुगन्धिरमला तनुः ॥ ७ ॥

अर्थ— ज्याचें वज्रवृषभनाराच नांवाचें पहिलें संहनन आहे, आणि समचतुरस्र नांवाचें पहिलेंच संस्थान आहे असा, ज्याला घाम येत नसून ज्यांतील रक्त दुधाप्रमाणें आहे असा आणि सुगंध व निर्मल असा ज्यांचा सुंदर देह फारच सुशोभित दिसत आहे,

येषां द्विष्टः क्षयं याति तुष्टो लक्ष्मीं प्रपद्यते ॥
न रुष्यन्ति न तुष्यन्ति चैनयोः समवृत्तयः ॥ ८ ॥

अर्थ— ज्या भगवंतांचा द्वेष करणारा नाश पावतो, ज्यांची भक्ति करणारा संपत्तीला मिळतो; परंतु जे जिनप्रभु सर्वत्र समबुद्धि असल्यामुळें ह्या दोघांविषयींहीं कोप करीत नाहींत आणि संतोषही मानीत नाहींत,

लक्ष्मीं सातिशयां येषां भुवनत्रयतोषिणीम् ॥

**अनन्यभाविनीं शक्तो वक्तुं काश्चिन्न विद्यते ॥ ९ ॥**

अर्थ— ज्या भगवंतांची अतिशयांनीं युक्त व त्रिभुवनाला आनंद देणारी आणि दुसऱ्याला न प्राप्त होणारी अशी लक्ष्मी वर्णन करण्यास कोणीही समर्थ नाहीं,

**रागद्वेषमदक्रोधलोभमोहादयोऽखिलाः ॥**
**येषु दोषा न तिष्ठन्ति तप्तेषु नकुला इव ॥ १० ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें सूर्यकिरणांनीं तापलेल्या जागेंत मुंगूस रहात नाहींत; त्याप्रमाणें राग, द्वेष, मद, क्रोध, लोभ, मोह वगैरे सर्व दोष ज्यांच्या ठिकाणीं रहात नाहींत,

**शक्तितो भक्तितोऽर्हन्तो जगतीपतिपूजिताः ॥**
**ते द्वेधा पूजया पूज्या द्रव्यभावस्वरूपया ॥ ११ ॥**

अर्थ— असे ( वरील दहा श्लोकांनीं वर्णन केलेले ) व त्रैलोक्याधिपतींनीं आपल्या शक्तीप्रमाणें भक्तीनें ज्यांचें पूजन केलें आहे असे जे भगवान् अर्हंत, त्यांची, द्रव्यपूजा आणि भावपूजा ह्या दोन प्रकारच्या पूजेनें पूजा करावी.

**वचोविग्रहसङ्कोचो द्रव्यपूजा निगद्यते ॥**
**तत्र मानससङ्कोचो भावपूजा पुरातनैः ॥ १२ ॥**

अर्थ— त्यापैकीं, वाणीचा आणि शरीराचा संकोच करणें ( त्यांना बाकीच्या सर्व व्यवहारांतून काढून जिनचरणीं लावणें ) ही द्रव्यपूजा होय, आणि मनाचा संकोच करणें (इतर विषयांतून काढून जिनचरणीं लावणें) ही भावपूजा होय; असें प्राचीन विद्वानांचें मत आहे,

**गन्धप्रसूनसान्नायदीपधूपाक्षतादिभिः ॥**
**क्रियमाणाऽथवा ज्ञेया द्रव्यपूजा विधानतः ॥ १३ ॥**

अर्थ— किंवा गंध, पुष्प, चरू, दीप, धूप, अक्षता वगैरेंनीं

यथाविधि केली जाणारी जी पूजा ती द्रव्यपूजा समजावी.

व्यापकानां विशुद्धानां जिनानामनुरागतः ॥
गुणानां यदनुध्यानं भावपूजेयमुच्यते ॥ १४ ॥

अर्थ— व्यापक आणि शुद्ध अशा श्रीजिनांच्या गुणांचें भक्तीनें चिंतन करणें ही भावपूजा होय. असें शास्त्रकार ह्मणतात.

द्वेधाऽपि कुर्वतः पूजां जिनानां जितजन्मनाम् ॥
न विद्यते द्वये लोके दुर्लभं वस्तु पूजितम् ॥ १५ ॥

अर्थ— ज्यांनीं संसार जिंकला आहे अशा श्रीजिनांची वर सांगितलेली दोनही प्रकारची पूजा जो करतो त्याला मृत्युलोक आणि स्वर्ग ह्या दोन्ही लोकांत दुर्लभ अशी कोणतीच उत्तम वस्तु नाहीं.

यैः कल्मषाष्टकं प्लुष्टं विशुद्धध्यानतेजसा ॥
प्राप्तमष्टगुणैश्वर्यमात्मनीनमनव्ययम् ॥ १६ ॥
क्षुधातृषाश्रमस्वेदनिद्रातोषाद्यभावतः
अन्नपानासनस्नानशयनाभरणादिभिः ॥ १७ ॥
क्षुधादिनोदनैर्येषां नास्ति जातु प्रयोजनम् ॥
सिद्धे हि वांछिते कार्ये कारणान्वेषणं वृथा ॥ १८ ॥

अर्थ— ज्यांनीं शुद्ध अशा ध्यानरूपी अग्नीनें आठही प्रकारचें कर्म जाळून टाकिलें आणि आत्म्याला हितकारक व अविनाशी असें अष्टगुणैश्वर्य मिळविलें, ज्यांना क्षुधा, तृषा, श्रम, घाम, निद्रा, आनंद वगैरे विकार नसल्यामुळें त्यांचा नाश करणाऱ्या अन्न, जल, आसन, स्नान, शयन, अलंकार वगैरेची केव्हांच गरज लागत नाहीं. बरोबरच आहे. कारण, इष्टकार्य सिद्ध झाल्यावर त्याचें साधन शोधणें व्यर्थ होय—

कर्मव्यपायतो येषां न पुनर्जन्म जायते ॥

**विलयं हि गते बीजे कुतः सम्पद्यतेऽङ्कुरः ॥ १९ ॥**

अर्थ--ज्यांच्या अष्टकर्मांचा क्षय झाल्यामुळें ज्यांचा पुनः जन्म होत नाहीं. योग्यच आहे. कारण, बींजच जर नाहींसें झालें तर मग अंकुर कसा उत्पन्न होणार?—

**रागद्वेषादयो दोषा येषां सन्ति न कर्मजाः ॥**
**निमित्तरहितं क्वापि न नैमित्तं विलोक्यते ॥ २० ॥**

अर्थ-- ज्यांच्या ठिकाणीं कर्मापासून उत्पन्न होणारे रागद्वेषादिक दोष नाहींत, ह्यांत आश्चर्य नाहीं. कारण, कारण नसल्यावर कार्य कोठेंच दृष्टीं पडत नाहीं—

**न निर्वृतिममी मुक्त्वा पुनरायान्ति संसृतिम् ॥**
**शर्मदं हि पदं मुक्त्वा दुःखदं कः प्रपद्यते ॥ २१ ॥**

अर्थ-- जे मोक्षस्थान सोडून पुनः संसारांत येत नाहींत. सुख देणारें स्थान टाकून दुःख देणाऱ्या स्थळीं कोण बरें येईल ?—

**सुखस्य प्राप्यते येषां न प्रमाणं कथञ्चन ॥**
**आकाशस्येव नित्यस्य निर्मलस्य गरीयसः ॥ २२ ॥**

अर्थ-- नित्य, निर्मल आणि मोठें असें जें आकाश त्याचें प्रमाण केव्हांही सांपडत नाहीं, त्याप्रमाणें ज्यांच्या सुखाचें परिमाण कशानेंही मिळत नाहीं--

**पश्यन्ति ये सुखीभूता लोकाग्रशिखरस्थिताः ॥**
**लोकं कर्मभ्रुकुंसेन नाट्यमानमनारतम् ॥ २३ ॥**

अर्थ— जे स्वतः सुखस्वरूप झाले असून सर्व त्रैलोक्याच्या शिखरावर ( मोक्षस्थानीं ) रहात असलेले असे होत्साते कर्मरूपी नटानें निरंतर नाचविले जात असलेल्या सर्व संसारी जीवसमूहाला अवलोकन करतात.--

**येषां स्मरणमात्रेण पुंसां पापं पलायते ॥**

ते पूज्या न कथं सिद्धा मनोवाक्कायकर्मभिः ॥ २४ ॥

अर्थ— आणि ज्यांचें नुसतें स्मरण केलें असतांही जीवांची सर्व पातकें पळून जातात ते सिद्ध परमेष्ठी मन वाणी आणि काय ह्यांच्या योगानें पूज्य असे कसे बरें होणार नाहींत?

चारयन्त्यनुमन्यन्ते पञ्चाचारं चरन्ति ये ॥
जनका इव सर्वेषां जीवानां हितकारिणः ॥ २५ ॥
येषां पादपरामर्शे जीवा मुञ्चन्ति पातकम् ॥
निखिलं हिमरश्मीनां चन्द्रकान्तोपला इव ॥ २६॥
उपदेशैः स्थिरं येषां चारित्रं क्रियते तराम् ॥
ते पूज्यन्ते त्रिधाऽऽचार्याः पदं वर्यं यियासुभिः २७

अर्थ— जे पांच प्रकारचा आचार लोकांत प्रचलित करतात, कोणी आचार पाळीत असल्यास त्याला अनुमोदन देतात आणि स्वतःही तोच आचार आचरण करतात असे असल्यानें जे पित्याप्रमाणें सर्व जीवांचें कल्याण करणारे आहेत, ज्याप्रमाणें चंद्राच्या किरणांच्या स्पर्शानें चंद्रकांत मणि आपल्यांतील पाणी बाहेर टाकितो त्याप्रमाणें ज्यांच्या पादस्पर्शानें जीव सर्वपातकांचा त्याग करतो, आणि ज्यांच्या उपदेशानेंच जीवांचें चारित्र फार स्थिर केलें जातें ते आचार्य उत्तमपदाला जाण्याची इच्छा करणाऱ्यांना मन, वचन, काय ह्या तिहींच्या योगानें अवश्य पूज्य आहेत.

उन्नतेभ्यः ससत्त्वेभ्यो येभ्यो दलितकल्मषाः ॥
जायन्ते पावना विद्याः पर्वतेभ्य इवापगाः ॥ २८ ॥
चरन्तः पञ्चधाऽऽचारं भवारण्यदवानलम् ॥
द्वादशाङ्गश्रुतस्कन्धं पाठयन्ति पठन्ति ये ॥ २९ ॥
येषां वचोन्हदे स्नाता न सन्ति मलिना जनाः ॥

तेऽर्च्यन्ते न कथं दक्षैरुपाध्याया विरेफसः ॥ ३० ॥

अर्थ— ज्याप्रमाणें उंच अशा पर्वतापासून नद्या उत्पन्न होतात त्याप्रमाणें ज्या धीर आणि थोर पुरुषांपासून पातकाचा नाश करणाऱ्या विद्या उत्पन्न होत आहेत, ह्या संसाररूपी अरण्याचा वणवाच कीं काय! असा पांच प्रकारचा आचार जे स्वतः आचरण करतात, बारा अंगांनीं युक्त असलेल्या श्रुतस्कंधाचें जे स्वतः पठण करतात आणि दुसऱ्यालाही तो श्रुतस्कंध पढवितात, ज्यांच्या वचनरूपी डोहांत स्नान करणारे ( ज्यांनीं केलेले ग्रंथ वाचणारे ) लोक मुळींच मलिन रहात नाहींत ह्म० निष्पाप होतात ते निष्कलमष असे उपाध्याय परमेष्ठी शहाण्या लोकांनीं कसें बरें पूजिले जाणार नाहींत?

यैरनङ्गानलस्तीव्रः सन्तापितजगत्त्रयः ॥
विध्यापितः शमाम्भोभिः पापपङ्कापहारिभिः ॥३१॥
दिधक्षवो भवारण्यं ये कुर्वन्ति तपोऽनघम् ॥
निराकृताखिलग्रन्था निस्स्पृहाः स्वतनावपि ॥ ३२ ॥
निधानमिव रक्षन्ति ये रत्नत्रयमादृताः ॥
ते सद्भिर्वरिवस्यन्ते साधवो भव्यबान्धवाः ॥ ३३ ॥

अर्थ— ज्यानें त्रैलोक्याला संताप दिला आहे असा मदनाग्नि ज्यांनीं पापरूपी पंकाचें हरण करणाऱ्या शमरूपी जलानें विझविला आहे, जे सर्व परिग्रहांचा त्याग करून आणि आपल्या शरीराविषयींही निस्पृह होऊन संसाररूपी अरण्याला जाळून टाकण्याकरितां निर्दोष तपश्चर्या करीत आहेत, आणि एखाद्या निधानाप्रमाणें ( पुरून ठेविलेल्या द्रव्याप्रमाणें ) रत्नत्रयाचें मोठ्या आदरानें रक्षण करीत आहेत, ते भव्यजीवांचे बंधूच कीं काय

असे साधु सज्जनांनीं अवश्य पूजिले जातात. ह्मणजे अशा साधूंची सज्जन अवश्य पूजा करितात.

अर्चयद्भ्यस्त्रिधा पुंभ्यः पञ्चेति परमेष्ठिनः ॥
नश्यन्ति तरसा विघ्ना बिडालेभ्य इवाखवः ॥ ३४ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें वर सांगितलेले जे पंच परमेष्ठी, त्यांची, मन वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें पूजा करणाऱ्या श्रावकापासून विघ्नें–ज्याप्रमाणें मांजरापासून उंदीर पळून जातात त्याप्रमाणें–पळून जातात.

पूजयन्ति न ये दीना भक्तितः परमेष्ठिनः ॥
सम्पद्यते कुतस्तेषां शर्म निन्दितकर्मणाम् ॥ ३५ ॥

अर्थ— जे दीन (अज्ञानी) लोक भक्तीनें पंच परमेष्ठींची पूजा करीत नाहींत त्या निंद्यकर्म करणाऱ्यांना सुख कोठून होणार?

इन्द्राणां तीर्थकर्तॄणां केशवानां रथाङ्गिनाम् ॥
सम्पदः सकलाः सद्यो जायन्ते जिनपूजया ॥ ३६ ॥

अर्थ— इंद्र, तीर्थंकर, केशव आणि चक्रवर्ती ह्या सर्वांच्या संपूर्ण संपत्ति जिनपूजेनें तत्काळ प्राप्त होतात.

मानवैर्मानवावासे त्रिदशैस्त्रिदशालये ॥
खेचरैः खेचरावासे पूज्यन्ते जिनपूजकाः ॥ ३७ ॥

अर्थ— मनुष्यें आपल्या लोकांत जिनपूजकांची पूजा करतात, देव स्वर्गांत जिनपूजकाची पूजा करतात, आणि खेचर [ विद्याधर ] आपल्या लोकांत जिनपूजकांची पूजा करतात.

सकामा मन्मथालापा निबिडस्तनमण्डलाः ॥
रमणी रमणीयाङ्गा रमयन्ति जिनार्चिनः ॥ ३८ ॥

अर्थ— जिनपूजा करणारे पुण्यवान् जीव सकाम, मदनोद्दीपक भाषण करणाऱ्या, ज्यांचें स्तनमंडल भरलेलें आहे आणि

ज्यांचे अवयव सुंदर आहेत अशा रमणींना रमवितात. ह्मणजे अशा रमणीय स्त्रियांचा उपभोग करणारे होतात.

पवित्रं यन्निरातङ्कं मुक्तानां पदमव्ययम् ॥
दुष्प्रापं विदुषामर्थ्यं प्राप्यते तज्जिनार्चकैः ॥ ३९ ॥

अर्थ— मोठ्या कष्टानें प्राप्त होणारें, पवित्र, ज्या ठिकाणीं कोणत्याही प्रकारची पीडा नाहीं असें व विद्वानांनीं अभिलषणीय असें जें मोक्षस्थान तें जिनपूजकांना प्राप्त होतें.

जिनस्तवं जिनस्नानं जिनपूजां जिनोत्सवम् ॥
कुर्वाणो भक्तितो लक्ष्मीं भजते याचितां जनः ४०

अर्थ— जिनांची स्तुति, जिनमूर्तीला अभिषेक करणें, जिनांची पूजा व जिनांचा उत्सव हे विधि भक्तीनें करणाऱ्या लोकांना इष्ट असलेली संपत्ति प्राप्त होते.

संसारारातिभीतस्य व्रतानां गुरुसाक्षिकम् ॥
गृहीतानामशेषाणां रक्षणं शीलमुच्यते ॥ ४१ ॥

अर्थ— संसाररूपी शत्रूपासून भ्यालेल्या मनुष्यानें गुरूच्या समक्ष स्वीकारलेल्या सर्वव्रतांचें जें रक्षण करणें त्याला शील असें ह्मणतात.

साक्षीकृता व्रतादाने कुर्वते परमेष्ठिनः ॥
भूपा इव महादुःखं विचारे व्यभिचारिणः ॥ ४२ ॥

अर्थ— व्रतें ग्रहण करण्याच्या वेळीं साक्षी असलेले परमेष्ठी स्वीकारलेल्या व्रतांत चुकी करणाऱ्याला राजाप्रमाणें मोठें दुःख देतात. तात्पर्य- राजा ज्याप्रमाणें अमुक गोष्ट करीन अशी प्रतिज्ञा करून ती न करणाऱ्याला शिक्षा करतो त्याप्रमाणें परमेष्ठी हे व्रतांचा अंगीकार करून ती न करणाऱ्याला शिक्षा करतात. ह्या ठिकाणीं परमेष्ठी हे वीतराग असून शिक्षा कशी करतात?

अशी शंका येते. तिचें समाधान असें कीं, व्रतभ्रष्ट जीव आपल्याच वाईट परिणामांनीं कर्मबद्ध होऊन दुर्गतीस जातो. परमेष्ठी शिक्षा करितात असें ह्मणणें औपचारिक आहे.

**एकदा ददते दुःखं नरनाथास्तिरस्कृताः ॥**
**गुरवो न्यक्कृता दुःखं वितरन्ति भवे भवे ॥४३॥**

अर्थ— राजांचा अपमान केला असतां ते एकदाच दुःख देतात. पण गुरूंचा अपमान केला असतां ते प्रत्येक भवांत दुःख देतात. ह्मणजे गुरूंचा अपमान केल्यानें प्रत्येक भवांत दुःख भोगावें लागतें.

**भक्षयित्वा विषं घोरं वरं प्राणा विसार्जिताः ॥**
**न कदाचिद्व्रतं भग्नं गृहीत्वा सूरिसाक्षिकम् ॥४४॥**

अर्थ— भयंकर विष भक्षण करून प्राणत्याग केला तरी बरें! पण उपाध्यायांच्या साक्षीनें व्रत घेऊन त्याचा भंग करणें केव्हांही बरें नाहीं.

**वसनैर्भूषणैर्हीनः सकलैरपि शोभते ॥**
**शीलेन बुधपूज्येन न पुनर्वर्जितो जनः ॥४५॥**

अर्थ— सर्व प्रकारचीं वस्त्रें व भूषणें हीं नसलीं तरी मनुष्य शोभतो. पण पंडितांना मान्य असलेल्या शीलानें रहित असा मनुष्य मात्र मुळींच शोभत नाहीं.

**सहजं भूषणं शीलं शीलं मण्डनमुत्तमम् ॥**
**पाथेयं पुष्कलं शीलं शीलं रक्षणमूर्जितम् ॥४६॥**

अर्थ— शील हें आपल्या बरोबर उत्पन्न झालेलें भूषण आहे. शील हा एक उत्तम अलंकार आहे. शील हें परलोकीं जाणाऱ्याच्या बरोबर येणारें पुष्कळ असें फराळाचें आहे. आणि शील हेंच जीवाचें उत्तम प्रकारचें रक्षण आहे.

**शीलेन रक्षितो जीवो न केनाप्यभिभूयते ॥**
**महाह्रदनिमग्नस्य किं करोति दवानलः ॥ ४७ ॥**

अर्थ— शीलानें रक्षण केलेल्या जीवाचा पराभव कोणाच्यानेंही करवत नाहीं. कारण, मोठ्या डोहांत बुडून बसलेल्या मनुष्याला वणवा काय करणार ?

**बान्धवाः सुहृदः सर्वे निःशीलस्य पराङ्मुखाः ॥**
**शत्रवोऽपि दुराराध्याः सम्मुखाः सन्ति शीलिनः ४८**

अर्थ—बंधु आणि मित्र हे सर्व शीलरहित असलेल्या मनुष्याच्या उलट होतात. आणि ज्यांना प्रसन्न करणें फारच कठिण आहे असे शत्रूसुद्धां शीलवान् मनुष्याला अनुकूल होतात.

**शीलतो न परो बन्धुः शीलतो न परः सुहृत् ॥**
**शीलतो न परा माता शीलतो न परः पिता ॥४९॥**

अर्थ— मनुष्याला शीलाहून दुसरा बंधु नाहीं; शीलाहून दुसरा मित्र नाहीं; शीलापेक्षां दुसरी माता नाहीं; आणि शीलाहून दुसरा पिता नाहीं.

**उपकारो न शीलस्य कर्तुमन्येन शक्यते ॥**
**कल्पद्रुमः फलं दत्ते परः कुत्र महीरुहः ॥ ५० ॥**

अर्थ—शील जो मनुष्याचा उपयोग करतें, तो उपयोग दुसऱ्या कोणाकडूनही होणें शक्य नाहीं. कारण, कल्पवृक्ष जें फल देतो तें फल दुसरा कोणताही वृक्ष कोठें देतो? मुळींच देत नाहीं.

**तापेऽपि सुखितः शीली शीलमोची पुनर्जनः ॥**
*चित्रं जनांगुलिच्छाये स्थितोऽपि परितप्यते ॥ ५१ ॥*

अर्थ— कसलाही ताप होत असतां शीलवान् मनुष्य सुखी असतो. आणि शीलाचा त्याग करणारा मनुष्य लोक ज्या

ठिकाणाला ताप होऊं नये ह्मणून आपल्या हातांनीं त्याचें आच्छादन करतात त्या ठिकाणीं जरी असला तथापि ताप पावतो; हें मोठें आश्चर्य आहे.

कदाचन न केनापि सुशीलः परिभूयते ॥
न तिरस्क्रियते यो हि श्लाघ्यते तस्य जीवितम्॥५२

अर्थ— सुशील मनुष्याचा कोणीही केव्हांही अपमान करीत नाहीं. आणि लोक ज्याचा तिरस्कार करीत नाहींत त्याच्याच जगण्याची सर्व लोक स्तुति करतात. ह्मणून शीलरक्षण अवश्य केलें पाहिजे.

भङ्गस्थानपरित्यागी व्रतं पालयतेऽमलम् ॥
तस्करैर्लुट्यते कुत्र दूरतोऽपि पलायितः ॥ ५३ ॥

अर्थ— जो व्रतांचा नाश करणारीं निमित्तें सोडून देतो तोच व्रतरक्षण निर्दोषपणें करतो. बरोबरच आहे. कारण, जो दूर पळून गेला त्याला चोरांनीं कोठें तरी लुटलें आहे काय?

द्यूतदोष,

नानानर्थकरं द्यूतं मोक्तव्यं शीलशालिना ॥
शीलं हि नश्यते तेन गरलेनेव जीवितम् ॥ ५४ ॥

अर्थ— अनेक प्रकारचे अनर्थ उत्पन्न करणारें असें द्यूत हें शीलवानानें अवश्य टाकावें. कारण, ज्याप्रमाणें विषानें जीविताचा नाश होतो तसा द्यूतानें शीलाचा नाश होतो.

विषादः कलहो राटिः कोपो मानः श्रमो भ्रमः ॥
पैशून्यं मत्सरः शोकः सर्वे द्यूतस्य बान्धवाः ॥५५॥

अर्थ— खेद, कलह, राटि (?), क्रोध, अभिमान, दगदग, भ्रांति, चहाडी, मत्सर आणि शोक हे सर्व दोष जुगाराचे बंधु आहेत.

दुःखानि तेन जन्यन्ते जलानीवाम्बुवाहिना ॥
व्रतानि तेन धूयन्ते रजांसीव च वायुना ॥ ५६ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें मेघ पाणी उत्पन्न करतात, त्याप्रमाणें द्यूत हें दुःखें उत्पन्न करतें. आणि जसा वायु धुरळा उडऊन देतो तसें द्यूत हें व्रताला उडवून देतें. ह्मणजे मनुष्याच्या ठिकाणीं कोणतेंही व्रत टिकूं देत नाहीं.

न श्रियस्तत्र तिष्ठन्ति द्यूतं यत्र प्रवर्तते ॥
न वृक्षजातयस्तत्र विद्यन्ते यत्र पावकः ॥ ५७ ॥

अर्थ— ज्या ठिकाणीं द्यूताचा आरंभ होतो तेथें संपत्ति रहात नाहींत. योग्यच आहे. कारण, जेथें अग्नि आहे, तेथें कोणत्याही प्रकारचीं झाडें टिकत नाहींत.

मातुरप्यन्तरीयं यो हरते जनपूजितम् ॥
अकर्तव्यं परं तस्य कुर्वतः कीदृशी त्रपा ॥ ५८ ॥

अर्थ— सर्व लोकांना पूज्य वाटत असलेलें आपल्या मातेचें लुगडेंसुद्धां द्यूत खेळणारा मनुष्य चोरून नेतो. मग दुसरें कोणतेंही दुष्कर्म करीत असतांना त्याला लाज कसली वटणार?

सम्पदं सकलां हित्वा स गृह्णाति महापदम् ॥
स्वकुलं मलिनीकृत्य वितनोति च दुर्यशः ॥ ५९ ॥

अर्थ— द्यूत खेळणारा मनुष्य सर्व प्रकारच्या संपत्तीचा त्याग करून मोठ्या विपत्तीचा संग्रह करतो. तो आपलें कुल मलिन करून दुष्कीर्ति वाढवितो.

नारकैरपरैः क्रुद्धैर्नारकस्येव मस्तके ॥
जनस्य कितवैस्तस्य दुर्ज्वालो ज्वाल्यतेऽनलः ॥ ६० ॥

अर्थ— रागावलेले नारकी जीव जसें दुसऱ्या नारकी जीवाच्या मस्तकावर भयंकर अग्नि पेटवितात; त्याप्रमाणें लुच्चे

लोक जुगार खेळणाऱ्याच्या मस्तकावर भयंकर अग्नि पेटवितात.

कर्कशं दुःश्रवं वाक्यं जल्पन्तो वञ्चिताः परे ॥
कुर्वन्ति द्यूतकारस्य कर्णनासादिकर्तनम् ॥ ६१ ॥

अर्थ— जुगारी मनुष्यानें फसविलेले दुसरे लोक कर्कश आणि न ऐकण्यासारखे शब्द त्याला बोलतात; आणि त्याचे कान, नाक कांपतात!

विज्ञायेति महादोषं द्यूतं दीव्यन्ति नोत्तमाः
जानानाः पावकोष्णत्वं प्रविशन्ति कथं बुधाः॥ ६२

अर्थ—ह्याप्रमाणें द्यूतांत मोठे दोष आहेत असें जाणून उत्तम लोक द्यूत खेळत नाहींत. कारण, अग्नीची उष्णता समजल्यावर शहाणे लोक त्यांत कसा बरें प्रवेश करतील?

वेश्यादोष.

वितनोति दृशो रागं या वात्येव रजोमयी ॥
विध्वंसयति या लोकं शर्वरीव तमोमयी ॥ ६३ ॥
या स्वीकरोति सर्वस्वं चौरीवार्थपरायणा ॥
छलेन या निगृह्णाति-शाकिनीवामिषप्रिया ॥ ६४ ॥
वह्निज्वालेव या स्पृष्टा सन्तापयति सर्वतः ॥
शुनीव कुरुते चाटु दानतो याऽतिकश्मला ॥६५॥
विमोहयति या चित्तं मदिरेव निषेविता ॥
सा हेया दूरतो वेश्या शीलालङ्कारधारिणा ॥६६॥

अर्थ—वेश्या ही धुरळ्यानें भरलेल्या वावटळ्याप्रमाणें डोळ्याची लाली वाढविते. अंधकारानें व्याप्त झालेल्या रात्रीप्रमाणें सर्व लोकांचा नाश करते. द्रव्याला लुब्ध असल्यामुळें ती चोरी करणाऱ्या स्त्रीप्रमाणें पुरुषाचें सर्वस्व लुटते. मांसप्रिय अशा शाकिनीप्रमाणें ती कपटानें पुरुषाला आपल्या ताब्यांत

घेते. तिला स्पर्श केला असता अग्नीच्या ज्वालेप्रमाणें चोहीकडून संताप उत्पन्न करते, कांहीं दिलें असतां अतिपातकी अशी ती कुतरीप्रमाणें लाडीगोडी लावते. आणि तिचें सेवन केलें असतां मदिरेप्रमाणें ती पुरुषाला मोह उत्पन्न करते. वेश्या अशा प्रकारची असल्यामुळें शीलरूपी अलंकार धारण करणाऱ्यानें ती दूरच वर्ज्य करावी.

**सत्यं शीलं शमं शौचं संयमं नियमं दमम् ॥**
**प्रविशन्ति बहिर्मुक्त्वा विटाः पण्याङ्गनागृहम् ६७**

अर्थ— वेश्यासक्त असलेले पुरुष सत्य, शील, शांति, शुद्धि, संयम, नियम आणि दम हे सर्व बाहेर टाकून वेश्येच्या घरांत प्रवेश करतात. तात्पर्य, वेश्यासक्त मनुष्यांत हे सद्गुण असत नाहींत.

**तपो व्रतं यशो विद्या कुलीनत्वं दमो दया ॥**
**छेद्यन्ते वेश्यया सद्यः कुठार्येवाखिला लताः॥६८॥**

अर्थ— ज्याप्रमाणें कुऱ्हाडीनें सर्व वेली तोडल्या जातात, त्याप्रमाणें वेश्येनें तप, व्रत, कीर्ति, विद्या, कुलीनपणा दम आणि दया ह्यांचा तत्काल उच्छेद केला जातो.

**जननी जनको भ्राता तनयस्तनया स्वसा ॥**
**न सन्ति वल्लभास्तस्य दारिका यस्य वल्लभा ॥६९॥**

अर्थ— ज्या पुरुषाला वेश्या प्रिय झाली आहे त्याला माता, पिता, बंधु, पुत्र, कन्या आणि बहीण ह्यांपैकीं कोणीही प्रिय असत नाहीं.

**न तस्मै रोचते सेव्यं गुरूणां वचनं हितम् ॥**
**सशर्करमिव क्षीरं पित्ताकुलितचेतसे ॥ ७० ॥**

अर्थ— पित्तविकारानें व्यापलेल्या मनुष्याला जसें साखर

घातलेलें दूधही गोड लागत नाहीं, तसें वेश्यासक्त पुरुषाला अवश्य पाळावयाचें असें गुरूंचें ( वडिलांचें ) हितकर भाषणही गोड लागत नाहीं.

**यो वेश्यावदनं निंस्ते मूढो मद्यादिवासितम् ॥**
**मद्यमांसपरित्यागव्रतं तस्य कुतस्तनम् ॥ ७१ ॥**

अर्थ-- मद्यादिकांचा वास येत असलेल्या वेश्येच्या वदनाचें जो मूर्ख पुरुष चुंबन करतो त्याचें मद्यमांसत्यागाचें व्रत कोठून रहाणार ?

**वेश्यावक्त्रगतां निन्द्यां लालां पिबति योऽधमः ॥**
**शुचित्वं मन्यते स्वस्य का पराऽतो विडम्बना ७२**

अर्थ-- जो नीच पुरुष वेश्येच्या मुखांतील निंद्य अशी लाळ प्राशन करतो आणि आपणाला शुद्ध मानतो ह्यापेक्षां दुसरी थट्टा ती कोणती ?

**वदनं जघनं यस्या नीचलोकमलाविलम् ॥**
**गणिकां सेवमानस्य तां शौचं बत कीदृशम् ७३**

अर्थ-- जिचें तोंड आणि जघन ( कमरेच्या खालचा भाग ) नीच लोकांच्या मलानें व्याप्त होत असतें त्या वेश्येचें सेवन करणाऱ्यांत शुद्धता कसली बरें असणार ?

**अपरं हृदये धत्ते परेण सह भाषते ॥**
**परं निषेवते लुब्धा परमाह्वयते दृशा ॥ ७४ ॥**

अर्थ-- वेश्या ही मनांत एकाचें चिंतन करते, एकाबरोबर बोलते, दुसऱ्या एकाचा आसक्त होऊन समागम करते; आणि भलत्याच एकाला डोळ्यानें खूण करून बोलावते !!!

**सरलोऽपि स दक्षोऽपि कुलीनोऽपि महानपि ॥**
**ययेक्षुरिव निस्सारः सुपर्वाऽपि विमुच्यते ॥ ७५ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें रस काढून घेतलेला ऊंस कितीही चांगला, सरळ आणि मोठा व उत्तम पेऱ्यांचा असला तथापि लोक टाकून देतात त्याप्रमाणें निर्धन झालेला पुरुष सरल स्वभावाचा, कुशल, कुलीन, मोठ्या योग्यतेचा असा जरी असला; किंवा तो प्रत्यक्ष देव जरी असला तथापि त्याचा वेश्या त्याग करते.

**न सा सेव्या त्रिधा वेश्या शीलरत्नं पिपासता ॥**
**जानानो न हि हिंस्रत्वं व्याघ्रं स्पृशति कश्चन ७६**

अर्थ— वेश्या ही वर सांगितलेल्या दुर्गुणांनीं युक्त असल्यामुळें शीलरूपी रत्नाचें रक्षण करण्याची इच्छा करणाऱ्यानें तिचें मन वचन काय ह्या तिहींच्या योगानें केव्हांही सेवन करूं नये. कारण, वाघाचा घातकी स्वभाव समजणारा कोणताही मनुष्य त्याला स्पर्श करीत नाहीं.

परस्त्रीदोष.

**तिरश्री मानुषी देवी निर्जीवा च नितम्बिनी ॥**
**परकीया न भोक्तव्या शीलरत्नवता त्रिधा ॥७७॥**

अर्थ— ज्याच्या जवळ शीलरूपी रत्न आहे अशा पुरुषानें तिर्यंची, मानुषी देवी ह्यापैकीं कोणतीही परस्त्री उपभोगूं नये. विशेष काय पण एखादी निर्जीव ( काष्ठपाषाणादिनिर्मित पुतळी) जरी परस्त्री असली तथापि तिचा सुद्धां उपभोग करूं नये. ह्मणजे ती पाहून अनुरक्त होऊं नये.

**जीवितं हरते रामा परकीया निषेविता ॥**
**प्लोषते सर्पिणी दुष्टा स्पृष्टा दृष्टिविषा न किम् ॥ ७८**

अर्थ— परक्या स्त्रीचें सेवन केलें असतां ती आपल्या जीविताचें हरण करते. योग्यच आहे. कारण, जिच्या

नजरेंत विष आहे अशा दुष्ट सर्पिणीला स्पर्श केला असतां ती स्पर्श करणाऱ्याला जाळीत नाहीं काय?

**यच्चेह लौकिकं दुःखं परनारीनिषेवणे ॥**
**तत्प्रसूनं मतं प्राज्ञैर्नारकं दारुणं फलम् ॥ ७९ ॥**

अर्थ— परस्त्रीच्या सेवनामुळें ह्या जगांत जें लौकिक दुःख प्राप्त होतें तें त्या दुष्कर्माचें फूल होय; आणि मरणानंतर जें नरकांत भयंकर दुःख व्हावयाचें तें त्याचें फल होय; असें विद्वानांनीं मानलें आहे.

**स्वजनै रक्ष्यमाणायास्तस्या लाभोऽतिदुष्करः ॥**
**तापस्तु चिन्त्यमानायां सर्वाङ्गीणो निरंतरः ॥ ८० ॥**

अर्थ— पति वगैरे स्वजनांनीं रक्षण केलेल्या परस्त्रीचा लाभ होणें फार कठिण असतें. परंतु तिचें नुसतें चिन्तन केलें तर निरंतर सर्व शरीराला ताप मात्र होतो.

**प्राप्यापि कष्टकष्टेन तां देशे यत्र तत्र वा ॥**
**किं सुखं लभते भीतः सेवमानस्त्वरान्वितः ॥ ८१ ॥**

अर्थ— एखाद्या जाग्यांत त्या परस्त्रीची जरी गांठ पडली तथापि कोणी पाहील ह्मणून भ्यालेला पुरुष गडबडीनें तिचा उपभोग करून काय सुख मिळवीत असेल तें समजत नाहीं!

**या हिनस्ति स्वकं कान्तं सा जारं न कथं खला ॥**
**बिडाली याऽत्ति पुत्रं स्वं सा किं मुञ्चति मूषकम् ॥ ८२ ॥**

अर्थ— जी आपल्या पतीचा नाश करते, ती दुष्ट स्त्री जाराचा कसा बरें नाश करणार नाहीं? अवश्य करील. कारण, जी मांजरी आपल्या पोराला खाते, ती उंदराला सोडील काय?

**यावद्दर्शी कुचेतस्कः किं वाञ्छति पराङ्गनाम् ॥**
**न पापतः परो लाभः कदाचित्तत्र विद्यते ॥ ८३ ॥**

अर्थ— इतकें समजूनही दुर्बुद्धि मनुष्य परस्त्रीची इच्छा कां बरें करतो? त्यांत पापाहून दुसरा कोणताही लाभ केव्हांही होत नाहीं.

**या स्वं मुञ्चति भर्तारं विश्वासस्तत्र कीदृशः॥**

**को विश्वासमृते स्नेहः किं सुखं स्नेहतो विना॥ ८४॥**

अर्थ— जी स्त्री आपल्या पतीचा त्याग करते तिचा विश्वास कसला असणार? विश्वासावांचून प्रेम कसलें असणार? आणि प्रेमावांचून सुख तरी कसलें होणार?

**वधो बन्धो धनभ्रंशस्तापः शोकः कुलक्षयः॥**

**आयासः कलहो मृत्युः पारदारिकबान्धवाः॥ ८५॥**

अर्थ— वध, बंध, धननाश, त्रास, दुःख, कुलक्षय, यातायात, कलह आणि मृत्यु हे परस्त्रीवर आसक्त झालेल्या पुरुषाचे सोबती आहेत.

**लिङ्गच्छेदं खरारोहं कुलालकुसुमार्चनम्॥**

**जननिन्दामभोग्यत्वं लभते पारदारिकः॥ ८६॥**

अर्थ— परस्त्रीचे ठायीं आसक्त असलेला पुरुष लिंगच्छेद, गाढवावर बसविणें, कुंभाराच्या फुलांनीं पूजन ( कुंभार ज्याप्रमाणें माती कुटतो त्याप्रमाणें कुटणें ), लोकांत निंदा आणि कोणीही जवळ बाळगण्याची अयोग्यता ह्यांचा लाभ घेतो.

**लब्ध्वा विडम्बनां गुर्वीमत्र प्राप्तः स पञ्चताम्॥**

**श्वभ्रेयदुःखं प्राप्नोति कस्तद्वर्णयितुं क्षमः॥ ८७॥**

अर्थ— परस्त्रीसक्त पुरुष ह्याप्रमाणें ह्या जगांत मोठ्या निंदेला मिळवून, मेल्यानंतर नरकांतील दुःखाला मिळवितो, त्या दुःखाचें वर्णन करण्याला कोणीही समर्थ नाहीं.

**एकान्ते यौवने ध्वान्ते नारीं नेदीयसीं सतीम्॥**

दृष्ट्वा कसाति धीरोऽपि का वार्ता कातरे जने ॥८८॥

अर्थ— तारुण्यांत असतांना एकांतीं अंधारांत एखादी पतिव्रता स्त्री देखील जवळ आलेली पाहून धीर मनुष्य चंचल होतो. मग अधीर मनुष्याची गोष्ट काय सांगावयाची आहे?

जल्पनं हसनं नर्मक्रीडा वक्त्रावलोकनम् ॥
आसनं गमनं स्थानं वर्णनं भिन्नभाषणम् ॥ ८९ ॥
नार्या परिचयं सार्धं कुर्वाणः परकीयया ॥
वृद्धोऽपि तुष्यति प्रायस्तरुणो न कथं पुनः ॥ ९० ॥

अर्थ— परस्त्रीबरोबर भाषण, हसणें, थट्टा, तिचें मुख पहाणें, तिच्याजवळ वसणें, तिच्याबरोबर हिंडणें, तिच्याशीं एकत्र रहाणें, तिचें वर्णन करणें, एकांतीं गोष्टी बोलणें हे व्यापार करणारा पुरुष वृद्ध जरी असला तथापि बहुधा आनंदित होतो. मग तरुण पुरुष कसा बरें होणार नाहीं?

विबुध्येति महादोषं परराम मनीषिभिः ॥
विवर्ज्या दूरतः सद्भिर्भुजङ्गीव भयङ्करा ॥ ९१ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें असलेले महादोष जाणून विचारी अशा सज्जनांनीं परस्त्रीचा भयंकर सर्पिणीप्रमाणें दूर त्याग करावा.

मृगयादोष.

नामापि कुरुते यस्या गृहीतं गुरुकल्मषम् ॥
मृगया सा त्रिधा हेया भवदुःखविभीरुणा ॥ ९२ ॥

अर्थ— जिचें नुसतें नांव घेतलें असतांही महापातक होतें, ती मृगया (शिकार) संसारदुःखापासून भिणाऱ्या मनुष्यानें मन, वचन, काय ह्या तिहींच्या योगानें सोडावी.

त्रस्यन्ति सर्वदा दीनाश्चलतः पर्णतोऽपि ये ॥
हिंस्यन्ते तेऽपि यैर्जीवास्तेभ्यः किं निर्घृणाः परे ॥ ९३ ॥

अर्थ— जे गरीब जीव पान हाललें असतांही नेहमी घाबरतात, त्या जीवांना जे मारतात, त्यांच्यापेक्षां निर्दय दुसरे कोण बरें आहेत?

निरागसः पराधीना नश्यन्तो भयविव्हलाः ॥
कुरङ्गा यैर्निहन्यन्ते पापिष्ठा न परे ततः ॥ ९४ ॥

अर्थ— जे निरपराधी व पराधीन असे हरिण भयानें घाबरून पळत असतात, त्यांना जे मारतात; त्यांच्यापेक्षां पापी दुसरे कोणी नाहींत.

गृह्णतोऽपि तृणं दन्तैर्देहिनो मारयन्ति ये ॥
व्याघ्रेभ्यस्ते दुराचारा विशिष्यन्ते कथं खलाः ॥९५॥

अर्थ— दांतांनीं गवत घेणाऱ्या–अर्थात् शरण आलेल्याप्रमाणें दांतीं तृण धरणाऱ्या–जीवांना सुद्धां जे मारतात, ते दुष्ट लोक वाघांपेक्षांही अधिक दुराचारी कसे नव्हेत बरें?

ये मारयन्ति निस्त्रिंशा ये मार्यास्तेऽपि विव्हलाः ॥
तेषां परस्परं नास्ति विशेषस्तत्क्षणं विना ॥ ९६ ॥

अर्थ— जे मारतात ते लोक निर्दय असतात आणि ज्यांना मारतात ते घाबरलेले असतात; हा भेद त्या वेळींच असतो. कारण, पुढें नरकांत ते दोन्ही जीव एकमेकांस मारणारे असल्यानें सारखेच होतात. वरील भेद तेथें रहात नाहीं. अर्थात् दोघेही निर्दय होतात.

स्वमांसं परमांसैर्ये पोषयन्ति दुराशयाः ॥
स्वमांसमेव खाद्यन्ते हटतो नारकैरिमे ॥ ९७॥

अर्थ— जे दुर्बुद्धि जीव आपल्या अंगांतील मांस दुसऱ्या जीवांच्या मांसानें वाढवितात, ते ह्या बलात्कारामुळें आपलें मांस नारकी जीवांना खावयास लावतात. तात्पर्य— मांस

खाणारे जीव नरकांत जातात. आणि त्या ठिकाणीं असलेले नारकी जीव त्यांचें मांस खातात.

**स्वल्पायुर्विकलो रोगी विचक्षुर्बधिरः खलः ॥**
**वामनः पामनः षण्ढो जायते स भवे भवे ॥९८॥**

अर्थ— मांस भक्षण करणारा जीव प्रत्येक भवांत अल्पायु, विकलेंद्रिय, रोगी, अंधळा, बहिरा, दुष्ट, गिड्डा, खरजुला नपुंसक असा होतो.

**दुःखानि यानि दृश्यन्ते दुःसहानि जगत्रये ॥**
**सर्वाणि तानि लभ्यन्ते प्राणिमर्दनकारिणा ॥९९॥**

अर्थ— ह्या त्रैलोक्यांत जीं दुःसह अशीं दुःखें दिसत आहेत तीं सर्व दुःखें हिंसा ( शिकार ) करणाऱ्याला प्राप्त होतात.

**इति दोषवती मत्वा मृगया हितकांक्षिणा ॥**
**नानानर्थकरी त्याज्या राक्षसीव विभीषणा ॥ १०० ॥**

अर्थ— स्वहित करणाऱ्यानें मृगया ही ह्याप्रमाणें दोषांनीं युक्त व अनेकप्रकारचे अनर्थ करणारी आहे असें जाणून, तिचा भयंकर राक्षसीप्रमाणें त्याग करावा.

मौनवर्णन.

**भोजनं कुर्वता कार्यं मौनं शीलवता सता ॥**
**सन्तोषित्वमिवानिंद्यं भैक्ष्यशुद्धिविधायिना ॥ १०१ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें भिक्षान्नाची शुद्धि करणारा यति स्तुत्य असा संतोष धारण करतो त्याप्रमाणें शीलवान् सज्जनानें भोजन करतांना मौन धारण करावें.

**सर्वदा शस्यते जोषं भोजने तु विशेषतः ॥**
**रसायनं सदा श्रेष्ठं सरोगित्वे पुनर्न किम् ॥ १०२॥**

अर्थ— सर्वदा मौन असणें फारच चांगलें आहे. त्यांत

भोजनांत मौन असणें विशेष चांगलें आहे. कारण, जें रसायन सर्वदा सेवन करण्याला चांगलें असतें तें रोगीपणांतही चांगलें असत नाहीं काय?

**सन्तोषो भाव्यते तेन वैराग्यं तेन दृश्यते ॥**
**संयमः पोष्यते तेन मौनं येन विधीयते ॥ १०३ ॥**

अर्थ— जो पुरुष मौन धारण करतो तो संतोषाची भावना करतो, तो वैराग्य जाणतो आणि संयमाची वृद्धि करतो.

**वचोव्यापारतो दोषा ये भवन्ति दुरुत्तराः ॥**
**ते सर्वेऽपि निवार्यन्ते मौनव्रतविधायिना ॥ १०४ ॥**

अर्थ— वाणीच्या क्रियेमुळें जे दुस्तर दोष होतात ते सर्व दोष मौन धारण करणाऱ्या पुरुषानें निवारण केले जातात. ह्मणजे ते दोष तो होऊं देत नाहीं.

**सागारोऽपि जनो येन प्राप्यते यतिसंयमम् ॥**
**मौनस्य तस्य शक्यन्ते केन वर्णयितुं गुणाः १०५**

अर्थ— ज्या मौनानें गृहस्थ श्रावकही यतीनें करावयाच्या संयमानें युक्त केला जातो, त्या मौनाचे गुण वर्णन करण्यास कोण समर्थ आहे?

**जोषेण विज्ञानो रोधः कल्मषस्य विधीयते ॥**
**बलिष्ठेन महिष्ठेन सलिलस्येव सेतुना ॥ १०६ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें बळकट आणि मोठा असा पूल पाण्याचा प्रतिबंध करतो, त्याप्रमाणें मौन हें वाणीमुळें आत्मप्रदेशांत प्रवेश करणाऱ्या पातकाला प्रतिबंध करतें.

**हुङ्काराङ्गुलिखात्कारभ्रूमूर्द्धचलनादिभिः ॥**
**मौनं विदधता सञ्ज्ञा विधातव्या न गृद्धये १०७**

अर्थ— मौन धारण करणाऱ्यानें भोजनाकरतां हूंकार, बोटें

हलविणें, खाकरणें, भुवया किंवा मस्तक हलविणें इत्यादिकांच्या योगानें खुणा करूं नयेत.

**सार्वकालिकमन्यच्च मौनं द्वेधा विधीयते ॥**
**भक्तितः शक्तितो भव्यैर्भवभ्रमणभीरुभिः १०८**

अर्थ— संसारांत भ्रमण करण्यास भिणाऱ्या भव्य जीवांनीं सार्वकालिक ( सर्वदा धारण करावयाचें ) मौन आणि दुसरें ( एका विवक्षित कालपर्यंत धारण करावयाचें मौन ) असें दोन प्रकारचें मौन आपल्या शक्तीप्रमाणें भक्तीनें धारण केलें जातें.

**भव्येन शक्तितः कृत्वा मौनं नियतकालिकम् ॥**
**जिनेन्द्रभवने देया घण्टिका समहोत्सवम् ॥१०९॥**

अर्थ— भव्यजीवानें नियमित कालापर्यंत धारण करावयाचें मौन शक्तीप्रमाणें धारण करून त्या कालाची मर्यादा झाल्यावर जिनमंदिरांत मोठ्या समारंभानें घंटा दान करावी. हें नियमित कालपर्यंत धारण केलेल्या मौनव्रताचें उद्यापन होय.

**न सार्वकालिके मौने निर्वाहव्यतिरेकतः ॥**
**उद्यापनं परं प्राज्ञैः किञ्चनापि विधीयते ॥ ११० ॥**

अर्थ— सर्वकाल ह्मणजे मरणपर्यंत धारण करावयाच्या मौनांत त्याचा निर्वाह करणें ( तें योग्यप्रकारें चालविणें ) ह्यापेक्षां दुसरें कोणतेंही उद्यापन विद्वान लोक करीत नाहींत.

**आवश्यके मलक्षेपे पापकार्ये विशेषतः ॥**
**मौनी न पीड्यते पापैः सन्नद्धः सायकैरिव ॥ १११ ॥**

अर्थ— सामायिकादि आवश्यक कर्मांत, मलमूत्रविसर्गाच्या वेळीं आणि मैथुन वगैरे पापकर्मांत मौन धारण करणारा श्रावक, ज्याप्रमाणें अंगांत कवच धारण करणारा मनुष्य बाणांनीं

पीडित होत नाहीं, त्याप्रमाणें पातकांनीं पीडित होत नाहीं.

**कोपादयो न संक्लेशा मौनव्रतफलार्थिना ॥**
**पुरः पश्चाच्च कर्तव्याः सूच्यते तद्धितैः कृतैः ॥ ११२ ॥**

अर्थ— मौनव्रताच्या फलाची इच्छा करणाऱ्या श्रावकानें प्रतिदिवशींच्या सामायिकादिकर्मांत मौन धारण करण्याच्या आधीं व मागाहून क्रोधादिक संक्लेश परिणाम होऊं देऊं नयेत. कारण, त्यांच्या योगानें मौनव्रताचा नाश होतो.

**वाचंयमः पवित्राणां गुणानां हितकारिणाम् ॥**
**सर्वेषां जायते स्थानं मणीनामिव नीरधिः ॥ ११३ ॥**

अर्थ— मौन धारण करणारा श्रावक ज्याप्रमाणें समुद्र हा सर्वप्रकारच्या रत्नांचें स्थान आहे त्याप्रमाणें पवित्र आणि हितकर अशा सर्वगुणांचें स्थान होतो.

**वाणी मनोरमा तस्य शास्त्रसन्दर्भगर्भिता ॥**
**आदेया जायते येन क्रियते मौनमुज्वलम् ॥ ११४ ॥**

अर्थ— जो निर्दोष अशा प्रकारचें मौन धारण करतो त्याची वाणी मनोहर, शास्त्रीयविषयानें युक्त व सर्वांना ग्राह्य अशी होते.

**पदानि यानि विद्यन्ते वन्दनीयानि कोविदैः ॥**
**सर्वाणि तानि लभ्यन्ते प्राणिना मौनकारिणा ११५**

अर्थ— ज्ञानी लोकांनीं वंदनीय अशीं जीं जीं उत्तम स्थानें आहेत तीं सर्व स्थानें मौन धारण करणाऱ्याला मिळतात.

**निर्मलं केवलज्ञानं लोकालोकावलोकनम् ॥**
**लीलया लभ्यते येन किं तेनान्यन्न कांक्षितम् ॥ ११६ ॥**

अर्थ— ज्याच्या योगानें लोकांचें प्रत्यक्ष होते असें जें निर्दोष केवलज्ञान, ते ज्या मौनाच्या योगानें सहज प्राप्त होतें; त्या मौनाच्या योगानें जीवाचें कोणतेंही दुसरें इष्ट मिळणार नाहीं काय?

उपवासवर्णन.

**रागो निवार्यते येन धर्मो येन विवर्ध्यते ॥**
**पापं निहन्यते येन संयमो येन जन्यते ॥ ११७ ॥**
**अनेकजन्मसंवृद्धकर्मकाननपावकः ॥**
**उपवासः स कर्तव्यो नीरागीभूतचेतसा ॥ ११८ ॥**

अर्थ — ज्यानें रागकषाय निवारण होतो, ज्यानें धर्माची वृद्धि होते, ज्यानें पापाचा नाश होतो, ज्यानें संयम उत्पन्न होतो असा आणि अनेक जन्मांत वृद्धी पावलेल्या कर्मरूपी अरण्याचा नाश करणारा अग्नीच कीं काय असा उपवास श्रावकानें अंतःकरण रागरहित करून अवश्य करावा.

**उपेत्याक्षाणि सर्वाणि निवृत्तानि स्वकार्यतः ॥**
**वसन्ति यत्र स प्राज्ञैरुपवासोऽभिधीयते ॥ ११९ ॥**

अर्थ— ज्यांत सर्व इंद्रियें आपापलें कार्य सोडून आत्म्याच्या जवळ येऊन रहातात ह्मणजे इंद्रयें बाह्य व्यापारांचा त्याग करून अंतर्मुख होतात; तो उपवास होय, असें विद्वान् लोक ह्मणतात. हा उपवास शब्दाचा अर्थ सांगितलेला आहे.

**स सार्वकालिको जैनैरेकोऽन्योऽसार्वकालिकः ॥**
**द्विविधः कथ्यते शक्तो हृषीकाश्वनियन्त्रणे ॥ १२०**

अर्थ— तो इंद्रियरूपी अश्वांचें नियमन करण्याला समर्थ असा उपवास एक सार्वकालिक (मरणपर्यंत करण्याचा) आणि दुसरा असार्वकालिक (नियमितकालीं करण्याचा) असा दोन प्रकारचा आहे; असें श्रीजिनांनीं सांगितलें आहे.

**तत्राद्यो म्रियमाणस्य वर्तमानस्य चापरः ॥**
**कालानुसारतः कार्यं क्रियमाणं महाफलम् ॥ १२१ ॥**

अर्थ— त्यांत पहिल्या प्रकारचा (सार्वकालिक) उपवास हा

मरणोन्मुख झालेल्याचा होय. आणि दुसरा (असार्वकालिक) उपवास हा वर्तमान (मरणोन्मुख न झालेल्या) पुरुषाचा होय. तात्पर्य- मरणोन्मुख झालेल्या श्रावकानें संन्यासविधीनें सार्वकालिक उपवास करावा. आणि तसा नसेल त्यानें अष्टम्यादि पर्वतिथींच्या दिवशीं उपवास करावा. कारण, कालाला अनुसरून कोणतेंही कार्य केलें असतां तें मोठ्या फलाला देतें.

वर्तमानो मतस्त्रेधा स वर्यो मध्यमोऽधमः ॥
कर्तव्यः कर्मनाशाय निजशक्त्यनुगूहकैः ॥ १२२ ॥

अर्थ— वर्तमान पुरुषानें करावयाचा जो उपवास ता उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ असा तीन प्रकारचा आहे. तो उपवास आपली शक्ति न झांकतां कर्मनाशाकरितां अवश्य करावा.

चतुर्णां तत्र भुक्तीनां त्यागो वर्यश्चतुर्विधः ॥
उपवासः सपानीयस्त्रिविधो मध्यमो मतः ॥ १२३
भुक्तिद्वयपरित्यागे द्विविधो गदितोऽधमः ॥
उपवासस्त्रिधाऽप्येष शक्तित्रितयसूचकः ॥ १२४ ॥

अर्थ— चार वेळ भोजनाचा त्याग करणें हा चतुर्विध नांवाचा उत्तम उपवास होय. उपवासाच्या दिवशीं पाणी पिऊन उपवास करणें हा त्रिविध नांवाचा मध्यम उपवास होय. आणि दोन वेळ भोजनाचा त्याग केला असतां होणारा द्विविध नांवाचा अधम उपवास होय. हा उत्तम, मध्यम आणि अधम असा तीन प्रकारचा उपवास उत्तम मध्यम कनिष्ठ अशा तीन प्रकारच्या शक्तीला सुचविणारा आहे. तात्पर्य— उपवासाच्या अगोदरच्या दिवशीं एकवार भोजन करून एकवार भोजन न करणें, उपवासाच्या दिवशीं दोनीही वेळां भोजन न करणें आणि उपवासाच्या दुसरे दिवशीं

एकवार भोजन करून एकवार भोजन न करणें अशा प्रकारें एका उपवासांत चार भोजनांचा त्याग करावा लागतो. ह्याला-च उत्तम उपवास ह्मणतात. ह्या चार भोजनांचा त्याग करणें हेच ह्या उत्तम उपवासाचे चार प्रकार होत. मध्यम उपवास ह्मणजे चार भोजनांचा त्याग करून उपवासाच्या दिवशीं पाणी पिणें हा होय. ह्यांत एकवार जलाहार होत असल्यानें तीन आहारांचा त्याग होत असल्यामुळें हा तीन प्रकारचा होतो. आणि कनिष्ठ उपवासांत उपवासाच्या दिवशींच फक्त दोन वेळा भोजनाचा त्याग होत असल्यानें तो दोन प्रकारचा होतो असें समजावें.

प्रहरद्वितये भुक्त्वा समेत्याचार्यसन्निधिम् ॥
वन्दित्वा भक्तितः कृत्वा कायोत्सर्गं यथागमम् १२५
पञ्चाङ्गं प्रणतिं कृत्वा गृहीत्वा सूरिवाक्यतः ॥
उपवासं पुनः कृत्वा कायोत्सर्गं विधानतः ॥ १२६ ॥
आचार्यं स्तवतः स्तुत्वा वन्दित्वा गणनायकम् ॥
दिनद्वयं ततो नेयं स्वाध्यायासक्तचेतसा ॥ १२७ ॥

अर्थ— उपवासाच्या पूर्वदिवशीं दोन प्रहरीं भोजन करून उपाध्यायाच्या जवळ जावें; आणि त्याला भक्तीनें नमस्कार करून यथाशास्त्र कायोत्सर्ग करावा. मग पंचांग नमस्कार करून सूरीच्या सांगण्याला अनुसरून उपवासाचें ग्रहण करावें. पुनः यथाविधि कायोत्सर्ग करून आचार्यांची स्तुति करावी. नंतर गणधरांना नमस्कार करून तो दिवस आणि पुढला दुसरा दिवस स्वाध्याय करण्यांत मन आसक्त ठेवून घालवावा.

विधाय साक्षिणं सूरिं गृह्यमाणः पटीयसा ॥
सम्पद्यते तरामेष व्यवहार इव स्थिरः ॥ १२८ ॥

अर्थ— उपाध्यायाला साक्षी करून उपवास ग्रहण केला असतां, ज्याप्रमाणें साक्षीदार असल्यामुळें कोणताही व्यवहार कायम होतो, त्याप्रमाणें हा उपवास स्थिर होतो.

**सर्वभोगोपभोगानां कर्तव्या विरतिस्त्रिधा ॥**
**शयितव्यं महीपृष्ठे प्रासुके कृतसँस्तरे ॥ १२९ ॥**

अर्थ— सर्व प्रकारच्या भोगोपभोग वस्तूंचा मन, वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें त्याग करावा. निर्जंतुक अशा भूमीवर कांहींतरी अंथरून त्याच्यावर शयन करावें.

**विहाय सर्वमारम्भमसँयमविवर्द्धकम् ॥**
**विरक्तचेतसा स्थेयं यतिनेव पटीयसा ॥ १३० ॥**

अर्थ— असंयमाला वाढविणाऱ्या सर्व आरंभाचा त्याग करून समर्थ अशा यतीप्रमाणें विरक्तमनानें असावें.

**तृतीये वासरे कृत्वा सर्वमावश्यकादिकम् ॥**
**भोजयित्वाऽतिथिं भक्त्या भोक्तव्यं गृहमेधिना ॥**

अर्थ— मग तिसऱ्या दिवशीं आवश्यकादि सर्व क्रिया करून भक्तीनें अतिथीला भोजन घालून गृहस्थानें आपण भोजन करावें.

**उपवासः कृतोऽनेन विधानेन विरागिणा ॥**
**हिनस्त्येकोऽपि रेफांसि तमांसीव दिवाकरः १३२**

अर्थ— रागशून्य अशा श्रावकानें अशा प्रकारच्या विधीनें एक जरी उपवास केला, तथापि तो सूर्य ज्याप्रमाणें अंधकाराचा नाश करतो त्याप्रमाणें सर्व पातकांचा नाश करतो.

**उपवासं विना शक्तो न परः स्मरमर्दने ॥**
**सिंहेनैव विदार्यन्ते सिन्धुरा मदमन्थराः ॥ १३३ ॥**

अर्थ— उपवासावांचून दुसरा कोणताही विधि मदनाचा नाश करण्यास समर्थ नाहीं. कारण, मदानें माजलेले हत्ती

सिंहानेंच मारले जातात.

उपवासेन सन्तप्ते क्षिप्रं नश्यति पातकम् ॥
ग्रीष्मार्काध्यासिते तोयं कियत्तिष्ठति पल्वले १३४

अर्थ— शरीर उपवासानें तापलें असतां पातक तत्काल नाश पावतें. बरोबरच आहे. कारण, ग्रीष्मऋतूंतील सूर्यकिरणांनीं लहान तळें व्यापलें असतां त्यांतील पाणी किती दिवस टिकणार ?

नित्यो नैमित्तिकश्चेति द्वेधाऽसौ कथितो बुधैः ॥
प्रोषधे स मतो नित्यो बहुधाऽन्ये व्यवस्थिताः ॥

अर्थ— तो उपवास नित्य आणि नैमित्तिक असा दोन प्रकारचा आहे. त्यांत अष्टमी चतुर्दशी ह्या पर्वतिथींच्या दिवशीं जो केला जातो तो नित्य होय ; आणि नैमित्तिक अनेकप्रकारचा आहे ; असें विद्वानांनीं सांगितलें आहे.

उपवासा विधीयन्ते ये पञ्चम्यादिगोचराः ॥
उक्ता नैमित्तिकाः सर्वे ते कर्मक्षपणक्षमाः ॥ १३६ ॥

अर्थ— पंचमी वगैरे तिथींच्या दिवशीं जे उपवास केले जातात ते नैमित्तिक उपवास होत. ते सर्व उपवास कर्मक्षय करण्याला समर्थ असतात.

गुरुतरकर्मजालसलिलं भववृक्षकरं ॥
बहुपरिणाममेघनिवहप्रसवं प्रसभम् ॥
क्षपयति सर्वमुग्र उपवासपयोजपति- ।
र्विरचितसंवृतिर्निखिलदेहितडागततेः ॥ १३७ ॥

अर्थ— रागादि अनेक परिणामरूपी मेघसमूहापासून उत्पन्न झालेलें, संसाररूपी वृक्षाला उत्पन्न करणारें असें सर्वप्राणीरूपी तळ्यांचें फारच मोठें असें कर्मजालरूपी उदक, हा उग्र असा

उपवासरूपी सूर्य संवर उत्पन्न करून जुलमानें नाहींसें करतो.

जनयति यो विधूय विपदं रभसाऽपाचितिं ।
घटयति सम्पदं त्रिदशमानववर्गनुताम् ॥
विधिविहितस्य तस्य श्रुतकेवलिनो ।
वदति फलं न कोऽप्यनशनस्य परो भुवने ॥ १३८ ॥

अर्थ— जो ( उपवास ) एकदम विपत्तीचा नाश करून पूज्यता उत्पन्न करतो, आणि देव व मनुष्यें ह्यांच्या समुदायानें स्तुति करण्याला योग्य अशी संपत्ति प्राप्त करून देतो; तो उपवास यथाविधि केला असतां त्याचें फल ह्या जगांत श्रुतकेवलीवाचून दुसरा कोणीही सांगणार नाहीं.

रचयति यस्त्रिधा व्रतमिदं महिनं महितै- ॥
रमितगतिश्चतुर्विधमनन्यमनाः पुरुषः ॥
भवशतसाश्रितं कलिलमेष निहत्य पुनः ।
शिवपदमेति शाश्वतमपास्तसमस्तमलम् ॥ १३९ ॥

अर्थ— जो महाबुद्धिमान् असा पुरुष, पूज्य अशा लोकांनाही पूज्य असें हें चार प्रकारचें उपवासव्रत एकाग्रपणें मन वचन काय ह्या तिहींच्या योगानें करतो तो शेंकडो जन्मांत संपादन केलेलें पातक नष्ट करून शाश्वत आणि संपूर्ण पापरूपी मल ज्यानें दूर फेंकून दिला आहे असें जें मोक्षस्थान त्या ठिकाणीं गमन करतो.

इत्युपासकाचारे द्वादशः परिच्छेदः

---

## परिच्छेद तेरावा.

शशाङ्कामलसम्यक्त्वो व्रताभरणभूषितः ॥
शीलरत्नमहाखानिः पवित्रगुणसागरः ॥ १ ॥
ऋजुभूतमनोवृत्तिर्गुरुसन्तोषणोद्यतः ॥
जिनप्रवचनाभिज्ञः श्रावकः सप्तधोत्तमः ॥ २ ॥

अर्थ— उत्तम श्रावक असतो, तो, चंद्राप्रमाणें स्वच्छ असें सम्यक्त्व, व्रतरूपी अलंकारांनीं युक्त असणें, शीलरूपी रत्नांची खाणच कीं काय असें असणें, पवित्र गुणांचा समुद्रच कीं काय असें असणें, मनोवृत्ति सरल असणें, गुरूना संतोष करण्याविषयीं सर्वदा तत्पर असणें आणि जिनवाणीचें ज्ञान असणें ह्या सात गुणांनीं युक्त असतो.

निसर्गजरुचौ जन्तावेकान्तरुचिराजिते ॥
असहाये महाप्राज्ञे सदायतनसेवके ॥ ६ ॥
कृतानायतनत्यागे परदृष्ट्यविमोहिते ॥
शासनासाधनाहीने जिनशासनबृंहके ॥ ४ ॥
सोपानं सिद्धिसौधस्य कल्मषक्षपणक्षमम् ॥
ज्ञानचारित्रयोर्हेतुः स्थिरं तिष्ठति दर्शनम् ॥ ५ ॥

अर्थ— ज्याच्या ठिकाणीं स्वभावतःच श्रद्धान आहे, दृढनिश्चयाविषयींच्या प्रेमानें जो शोभत आहे, ज्यानें सर्व परिग्रहाचा त्याग केला आहे, जो मोठा बुद्धिमान् आहे, जो अर्हतादि सदायतनांची सेवा करित आहे, कुदेवतादि अनायतनांचा ज्यानें त्याग केला आहे, जो मिथ्यादर्शनानें भुललेला नाहीं, आणि जो जिनशासनाचा विरोध न करता त्याची प्रभावना

करीत आहे अशा श्रावकाच्या ठिकाणी,– मोक्षस्थानरूपी गवीचा जिनाच कीं काय असें, कर्माचा नाश करण्याविषयीं समर्थ आणि सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र ह्यांचें साधक असें सम्यग्दर्शन स्थिर रहातें.

न निरस्यति सम्यक्त्वं जिनशासनभावितः॥
गृहीतं वह्निसन्तप्तो लोहपिण्ड इवोदकम्॥ ६॥

अर्थ— ज्याप्रमाणें अग्नीनें तापलेला लोखंडाचा गोळा आपल्यावर पडलेलें पाणी बाहेर सोडीत नाहीं त्याप्रमाणें जिनशासनाचा ज्याला संस्कार झाला आहे असा श्रावक सम्यक्त्वाचा केव्हांही त्याग करीत नाहीं.

विनय.

दर्शनज्ञानचारित्रतपस्सु विनयं परम्॥
करोति परमश्रध्दस्तितीर्षुर्भववारिधिम्॥ ७॥

अर्थ— उत्तम श्रद्धा धारण करणारा व भवसमुद्रांतून तरण्याची इच्छा करणारा असा श्रावक दर्शन ज्ञान चारित्र आणि तप ह्यांचे ठिकाणीं मोठा विनय धारण करतो.

दर्शनविनय.

जिनेशानां विमुक्तानामाचार्याणां विपश्चिताम्॥
साधूनां जिनचैत्यानां जिनराद्धान्तवेदिनाम्॥ ८॥
कर्तव्या महती भक्तिः सपर्या गुणकीर्तनम्॥
अपवादतिरस्कारः सम्भ्रमः शुभदृष्टिभिः॥ ९॥

अर्थ— सम्यग्दर्शनी श्रावकांनीं अर्हंत, सिद्ध, आचार्य, उपाध्याय, साधु, जिनचैत्य ( जिनबिंब ) आणि जैनसिद्धांत जाणणारे लोक ह्यांची मोठी भक्ति करावी; त्यांची पूजा करावी त्यांच्या गुणांचें वर्णन करावें; त्यांच्यावर येत असलेले अप-

याद घालवावेत; आणि त्यांच्या संबंधानें उत्सव करावा. यालाच दर्शनविनय असें ह्मणतात.

ज्ञानविनय.

आगमाध्ययनं कार्यं कृतकालादिशुद्धिना ॥
विनयारूढचित्तेन बहुमानविधायिना ॥ १० ॥

अर्थ— ह्याप्रमाणें ज्याच्या मनांत वर सांगितलेला विनय उत्पन्न झाला आहे व जो अर्हतादिकांचा बहुमान करतो आहे त्या श्रावकानें कालादिकांची शुद्धि करून आगमाचें अध्ययन करावें; आणि

कुर्वताऽवग्रहं योग्यं सूरिनिह्नवमोचिना ॥
परमां कुर्वता शुद्धिं व्यञ्जनार्थद्वयास्थिताम् ॥ ११॥

अर्थ— योग्य प्रतिज्ञा करणें, सूरीचें नांव न छपविणें, व्यंजनशुद्धि आणि अर्थशुद्धि चांगली करणें ह्याप्रमाणें करणाऱ्या श्रावकानें ज्ञानविनय केला असें होतें. ह्मणजे, वरील दोन श्लोकांत अध्ययनादि ज्या क्रिया सांगितल्या आहेत, त्या करणें याला ज्ञानविनय ह्मणतात.

चारित्रविनय.

संयमे संयमाधारे संयमप्रतिपादिनि ॥
आदरं कुर्वतो ज्ञेयश्चारित्रविनयः परः ॥ १२ ॥

अर्थ— संयम, संयम पाळणारे आणि संयमाचें प्रतिपादन करणारे मुनिवर्य ह्यांच्याविषयीं आदर करणें, याला उत्तम चारित्रविनय ह्मणतात.

तपोविनय.

महातपःस्थिते साधौ तपःकार्ये ससंयमे ॥
भक्तिमात्यन्तिकीं प्राहुस्तपसो विनयं बुधाः ॥ १३ ॥

अर्थ— महातपश्चर्या करणारा साधु, तप व संयम ह्यांच्या विषयीं अत्यंतभक्ति असणें ह्याला पंडित लोक तपोविनय ह्मणतात.

सम्यक्त्वचरणज्ञानतपांसीमानि जन्मिनाम् ॥
निस्तारणसमर्थानि दुःखोर्मेर्भवनीरधेः ॥ १४ ॥

अर्थ— सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्र आणि तप हीं, दुःखरूपी तरंगांनीं युक्त असलेल्या भवसमुद्रांतून जीवांना तारण्याला समर्थ आहेत.

चतुर्विधमिदं साधोः पोष्यमाणमहर्निशम् ॥
सिद्धिं साधयते सद्यः प्रार्थितां नृपतेरिव ॥ १५ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें चार प्रकारचें सैन्य राजाची इष्टसिद्धि करून देतें; त्याप्रमाणें वर सांगितलेलीं हीं चार अंगें मोक्षाचीं साधनें (चार प्रकारचे विनय) निरंतर वाढविलीं असतां सज्जनाची इष्टसिद्धि तत्काल करून देतात.

सिषाधयिषते सिद्धिं चतुरङ्गमृतेऽत्र यः ॥
स पोतेन विना मूढस्तितीर्षति पयोनिधिम् ॥१६॥

अर्थ— वर सांगितलेल्या सम्यग्दर्शनादि चार अंगांवाचून जो मनुष्य ह्या जगांत मोक्ष साध्य करून घेण्याची इच्छा करतो, तो मूर्ख नौकेवांचून समुद्र तरून जाण्याची इच्छा करतो असें समजावें.

लोकद्वयेऽपि सौख्यानि दृश्यन्ते यानि कानिचित्
जन्यन्ते तानि सर्वाणि चतुरङ्गेण देहिनः ॥ १७॥

अर्थ— हा लोक आणि परलोक ह्या दोनीं ठिकाणींही जीं कांहीं सुखें दृष्टीं पडतात तीं सर्व सुखें ह्या चार अंगांच्या योगानेंच जीवांना प्राप्त होतात.

निरस्यति रजः सर्वं न्यायं सूचयते हितम् ॥

मातेव कुरुते किं न चतुरङ्गनिषेवणा ॥ १८ ॥

अर्थ— ह्या चार अंगांची सेवा ही सर्व पातक घालविते, न्याय सुचविते, ह्मणून मातेप्रमाणें कोणकोणतें हित करीत नाहीं बरें? सर्व हित करते.

चतुरङ्गमपाकृत्य कुर्वते कर्म ये परम् ॥

कल्पद्रुममपाकृत्य ते भजन्ति विषद्रुमम् ॥ १९ ॥

अर्थ— जे लोक ह्या चार अंगांचा त्याग करून दुसरेंच कर्म करूं लागतात, ते कल्पवृक्ष सोडून विषवृक्षाला भजतात असें समजावें.

चतुरङ्गं सुखं दत्ते यत्तत्कर्म परं कथम् ॥

यत्करोति सुहृत्कार्यं तन्न वैरी कदाचन ॥ २० ॥

अर्थ— हीं वर सांगितलेलीं चार अंगें जें सुख देतात तें सुख दुसरें कोणतेंही साधन कसें देईल? कारण, मित्र जें कार्य करतो तें कार्य शत्रु केव्हांही करणार नाहीं.

ये सन्ति साधवोऽन्ये च चतुरङ्गविभूषणाः ॥

विधेयो विनयस्तेषां मनोवाक्कायकर्मभिः ॥ २१ ॥

अर्थ— जे साधु आणि दुसरे श्रावक ह्या मुक्तिसाधक अशा चार अंगांनीं सुशोभित असतात त्यांच्याशीं मन, वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें विनय धारण करावा.

गुणानामनवद्यानां तदीयानामनारतम् ॥

चिन्तनीयं पटीयोभिरुपबृंहणकारणम् ॥ २२ ॥

अर्थ— भक्तिमान् श्रावकांनीं त्या साधूंच्या स्तुत्य अशा गुणांचें सदोदित चिंतन करावें. कारण, तें चिंतन धर्माची वृद्धि करणारें आहे.

ध्यायतो योगिनां पथ्यमपथ्यप्रतिषेधनम् ॥

**मानसो विनयः साधोर्जायते शुद्धिसाधकः ॥२३॥**

अर्थ— योग्यांनीं स्वतःच्या कल्याणाकरितां केलेले व्यापार आणि आपलें अकल्याण करणाऱ्या व्यवहारांचा त्याग ह्या दोन्हीं गोष्टींचें चिंतन करणाऱ्या सज्जनाला मोक्षसिद्धि करून देणारा असा मानसिक विनय प्राप्त होतो.

**यश्चिन्तयति साधूनामनिष्टं दुष्टमानसः ॥**
**सर्वानिष्टखनिर्मूढो जायते स भवे भवे ॥ २४ ॥**

अर्थ— जो दुष्ट मनाचा मनुष्य साधूंच्या अनिष्टाचें चिन्तन करतो, तो प्रत्येक भवांत सर्व अकल्याणांचें स्थान होतो.

**दुर्भगो विकलो मूर्खो निर्विवेको नपुंसकः ॥**
**नीचकर्मकरो नीचो यतिदूषणचिन्तकः ॥ २५ ॥**

अर्थ— यतीच्या दोषांचें चिंतन करणारा जीव अभागी, विकलेंद्रिय, मूर्ख, अविचारी, नपुंसक, नीचकृत्यें करणारा असा नीच होतो.

**विज्ञायेति महाप्राज्ञः संयतानामरेफसाम् ॥**
**सश्चिन्तयति नानिष्टं त्रिविधेन कदाचन ॥ २६ ॥**

अर्थ— बुद्धिमान् श्रावक ह्याप्रमाणें सर्व जाणून निष्पाप अशा यतींचें अनिष्ट मन, वचन, काय ह्या तिहींच्या योगानें केव्हांही चिंतन करीत नाहीं.

**श्रवणीयमनाक्षेपं सपर्याप्रतिपादकम् ॥**
**अनवज्ञापरं तथ्यं मधुरं हृदयङ्गमम् ॥ २७ ॥**
**वचनं वदतः पथ्यं रागद्वेषाद्यनाविलम् ॥**
**वाचिको विनयोऽवाचि वचनीयनिखर्वकः ॥ २८ ॥**

अर्थ— श्रवण करण्याला योग्य, ज्यांत कोणाच्या दोषांचा उच्चार नाहीं असें, दुसऱ्याकडून सत्कार मिळविणारें, दुस-

ज्याचा अपमान न होऊं देणारें, खरें, मनोहर, हितकर आणि रागद्वेषादिकांनीं रहित असें भाषण करणाऱ्याला वाचिक विनय प्राप्त होतो. हा विनय दुर्भाषपणाचा नाश करतो. ह्मणजे वाचिक विनय पाळणाऱ्याच्या तोंडांतून दुर्भाषण निघत नाहीं.

अभ्याख्यानतिरस्कारकारकं गुणदूषकम् ॥
न वाच्यं वचनं भक्तैस्तपोधनविनिन्दकम् ॥ २९ ॥

अर्थ— साधूंची निंदा व तिरस्कार दाखविणारें, गुणावर दोषरोप करणारें आणि तपस्वी महात्म्यांची निंदा ज्यांत आहे असें भाषण भक्तिमान् श्रावकांनीं केव्हांही करूं नये.

वदन्ति दूषणं दीना ये साधूनामनेनसाम् ॥
ते भवन्ति दुराचारा दृष्या जन्मनि जन्मनि ॥ ३० ॥

अर्थ— जे मूर्ख जीव निष्पाप अशा साधूंचे दोष वर्णन करतात, ते जन्मोजन्मीं दुराचारी आणि दुष्ट होतात.

अनादेयगिरो गर्ह्याः क्लेशिनः शोकिनो जडाः ॥
यतिनिन्दापराः सन्ति जन्मद्वितयदूषिताः ॥ ३१ ॥

अर्थ— यतींची निंदा करणारे जीव ज्यांचें भाषण कोणालाही ग्राह्य नाहीं असे, निंद्य, क्लेश भोगणारे, शोक करणारे मूर्ख असे झाले आहेत. ते ह्या आणि पुढच्या अशा दोनही जन्मांत दोषी असतात.

किं चित्रमपरं तस्माद्यदुदासीनचेतसाम् ॥
वन्दका वन्दितास्तेषां निन्दकाः सन्ति निन्दिताः ॥३२॥

अर्थ— ज्यांचें मन उदासीन झालें आहे अशा साधूंना वंदन करणारे लोक जगाला वंद्य होतात. आणि त्यांची निंदा करणारे लोक जगाला निंद्य होतात; असें जें होतें ह्यापेक्षां दुसरा चमत्कार तो कोणता?

**यादृशः क्रियते भावः फलं तत्रास्ति तादृशम् ॥**
**यादृशं चर्च्यते रूपं तादृशं दृश्यतेऽब्दके ॥ ३३ ॥**

अर्थ— ज्या प्रकारचा भाव आपण करतों त्याप्रकारचें फल त्यांत मिळतें. उदाहरण असें कीं, आह्मी आमचें रूप जसें बनावितों तसेंच तें आरशांत दिसतें.

**व्रतिनां निन्दकं वाक्यं विबुध्येति न सर्वदा ॥**
**मनोवाक्काययोगेन वक्तव्यं हितमिच्छता ॥ ३४ ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें जाणून आपलें हित व्हावें अशी इच्छा करणाऱ्या श्रावकानें यतींची निंदा करणारें वाक्य मन वाणी आणि काय ह्या तिहींच्या योगानें केव्हांही उच्चारूं नये.

**अभ्युत्थानासनत्यागप्रणिपाताञ्जलिक्रियाः ॥**
**आयाति संयते कार्या यात्यनुव्रजनं पुनः ॥ ३५ ॥**

अर्थ— यति आपल्या घरांत येत असतां उठून उभें रहाणें, आसन सोडणें, नमस्कार, हात जोडणें ह्या क्रिया कराव्यात; आणि जाऊं लागला असतां पुनः त्याच क्रिया करून त्याच्या मागून त्याला घालवीत जावें.

**आयान्तं ये तपोराशिं विलोक्यापि न कुर्वते ॥**
**अभ्युत्थानासनत्यागौ नैभ्यः सन्त्यधमाः परे ॥ ३६**

अर्थ— तपोनिधि असा मुनि येत असलेला पाहूनही जे उठून उभें रहाणें व आसनाचा त्याग करणें ह्या गोष्टी करीत नाहींत, त्यांच्यापेक्षां नीच दुसरे कोणी नाहींत.

**यत्र यत्र विलोक्यन्ते संयमायत्तमानसाः ॥**
**तत्र तत्र प्रणन्तव्या विनयोद्यतमानसैः ॥ ३७ ॥**

अर्थ— ज्यांचीं मनें संयमाच्या आधीन झालीं आहेत असे साधु ज्या ज्या ठिकाणीं दिसतील, त्या त्या ठिकाणीं विनयसं-

पादनाविषयीं ज्यांची मनें उद्युक्त झालीं आहेत अशा श्रावकांनीं त्यांना नमस्कार करावा.

शय्योपवेशनस्थानगमनादीनि सर्वदा ॥
विधातव्यानि नीचानि संयताराधनापरैः ॥ ३८ ॥

अर्थ— साधूंची आराधना करण्याविषयीं तत्पर असलेल्या श्रावकांनीं आपली शय्या, आपलें बसण्याचें आसन, आपले गमनादिव्यापार हे सर्व नेहमीं यतीच्यापेक्षां खालचे अशा प्रकारचे करावेत.

पुण्यवन्तो वयं येषामाज्ञां यच्छन्ति योगिनः ॥
मन्यमानैरिति प्राज्ञैः कर्तव्यं यतिभाषितम् ॥३९॥

अर्थ— ज्या आह्मांला यती आज्ञा करीत आहेत ते आह्मी मोठे पुण्यवान् आहोंत, ह्याप्रमाणें समजून शहाण्या मनुष्यांनीं यतींशीं भाषण करावें. अर्थात् यतींना आपल्या भाषणानें आपल्यास आज्ञा करण्याची इच्छा होईल अशा विनयानें यतींशीं बोलावें.

निष्ठीवनमवष्टम्भं जृम्भणं गात्रभञ्जनम् ॥
असत्यभाषणं नर्म हास्यं पादप्रसारणम् ॥ ४० ॥
अभ्याख्यानं करस्फोटं करेण करताडनम् ॥
विकारमङ्गसंस्कारं वर्जयेद्यतिसन्निधौ ॥ ४१ ॥

अर्थ— थुंकणें, ताठ्यानें बसणें, जांभई देणें, अंग मोडणें, खोटें बोलणें, थट्टा करणें, हांसणें, पाय पसरणें, गुप्त गोष्टी उघड बोलणें, चिटक्या वाजविणें, टाळ्या वाजविणें, क्रोध वगैरे विकारांच्या चेष्टा, शरीराचा संस्कार ह्या गोष्टी यतीच्या संनिध असतां करूं नयेत.

उच्चस्थानास्थितैः कार्या वन्दना न तपस्विनाम् ॥

न गतिर्वामतः कार्या विनीतैर्न च पृष्ठतः ॥ ४२ ॥

अर्थ— विनयशील अशा श्रावकानें उंच आसनावर बसून यतीला वंदन करूं नये. यतीला आपल्या डाव्या बाजूला घालून जाऊं नये. आणि यतीला आपल्या मागें करूनही जाऊं नये.

त्रिधेति विनयोऽध्यक्षः करणीयो मनीषिभिः ॥
परोक्षेऽपि स साधूनामाज्ञाकरणलक्षणः ॥ ४३ ॥

अर्थ— ह्याप्रकारें मन वचन आणि काय ह्या तिहींच्या योगानें तीन प्रकारचा विनय बुद्धिमान् श्रावकानें यतीच्या समक्ष करावा. आणि यतीच्या परोक्ष त्यानें केलेल्या आज्ञेप्रमाणें वागणें ह्या रूपानें तो विनय पाळावा.

संघे चतुर्विधे भक्त्या रत्नत्रितयराजिते ॥
विधातव्यो यथायोग्यं विनयो नयकोविदैः ॥४४ ॥

अर्थ— नीति जाणणाऱ्या श्रावकांनीं रत्नत्रयानें शोभणाऱ्या अशा चार प्रकारच्या संघाविषयींही भक्तीनें योग्यप्रकारें विनय पाळावा.

विनयेन विहीनस्य व्रतशीलपुरस्सराः ॥
निष्फलाः सन्ति निश्शेषा गुणा गुणवतां मताः

अर्थ— विनयानें रहित अशा श्रावकाचे-गुणवानांना मान्य असलेले असेही-बाकीचे सर्व व्रतें शील वगैरे गुण निष्फल होतात.

विनश्यन्ति समस्तानि व्रतानि विनयं विना ॥
सरोरुहाणि तिष्ठन्ति सलिलेन विना कथम् ॥ ४६॥

अर्थ— विनय जर नसेल तर सर्व व्रतें नाश पावतात. योग्यच आहे. कारण, पाणीच जर नसेल; तर कमलें कशीं टिकतील?

**निर्वृतिस्तरसा वश्या विनयेन विधीयते ॥**

**आत्मनीनसुखाधारा सौभाग्येनेव कामिनी ॥ ४७**

अर्थ— ज्याप्रमाणें आपल्या सुखाचें साधन अशी पत्नी संपत्तीनें वश होते, त्याप्रमाणें मुक्ति ही विनयानें लवकर वश होते.

**सम्यग्दर्शनचारित्रतपोज्ञानानि देहिना ॥**

**अवाप्यन्ते विनीतेन यशांसीव विपश्चिना ॥४८॥**

अर्थ— ज्याप्रमाणें विद्वान् मनुष्य कीर्ति मिळवितो, त्याप्रमाणें विनययुक्त असलेला श्रावक सम्यग्दर्शन, सम्यक्चारित्र, तप आणि सम्यग्ज्ञान ह्यांना मिळवितो.

**तस्य कल्पद्रुमो भृत्यस्तस्य चिन्तामणिः करे ॥**

**तस्य सन्निहितो यक्षो विनयो यस्य निर्मलः ॥४९॥**

अर्थ— ज्याचा विनय निर्मल आहे त्याचा कल्पवृक्ष सेवक होतो; चिंतामणि त्याच्या हातांत येतो; आणि यक्ष त्याच्या जवळ असतो.

**आराध्यन्तेऽखिला येन त्रिदशाः सपुरन्दराः ॥**

**सङ्घस्याराधने तस्य विनीतस्यास्ति कः श्रमः ॥ ५० ॥**

अर्थ— ज्या विनयवानाला सर्व इंद्रादिदेव वश होतात; त्या विनययुक्त श्रावकाला संघ वश करण्यांत श्रम कसला आहे ?

**क्रोधमानादयो दोषाश्छिद्यन्ते येन वैरदाः ॥**

**न वैरिणो विनीतस्य तस्य सन्ति कथञ्चन ॥ ५१ ॥**

अर्थ— ज्यानें क्रोध मान वगैरे, वैर उत्पन्न करणाऱ्या दोषांचा नाश केलेला असतो, त्या विनयशील अशा श्रावकाचे कोणत्याहि प्रकारानें कोणीच वैरी असत नाहीं.

**कालत्रयेऽपि ये लोके विद्यन्ते परमेष्ठिनः ॥**

**ते विनीतेन निश्शेषाः पूजिता वन्दिताः स्तुताः ५२**

अर्थ— ह्या जगांत भूत वर्तमान आणि भविष्य ह्या तिन्ही कालांत जे परमेष्ठी आहेत त्या सर्वांचें विनय पाळणाऱ्या श्रावकानें पूजन केलें, वंदन केलें; आणि स्तुतीही केली असें होतें.

गर्वो निखर्व्यते तेन जन्यते गुरुगौरवम् ॥
आर्जवं दृश्यते स्वस्य विनयं वितनोति यः ॥५३॥

अर्थ— जो श्रावक आपला विनय वाढवितो, तो आपल्या गर्वाचा नाश करतो; आपलें महत्व उत्पन्न करतो; आणि आपला सरळपणा लोकांत दाखवितो असें जाणावें.

विनीतस्यामला कीर्तिर्बम्भ्रमीति महीतलम् ॥
सुखयन्ती जनं सेव्या कान्तिः शीतरुचेरिव ॥५४॥

अर्थ— ज्याप्रमाणें सर्व जीवांना आनंद देणारी असल्या-मुळें सेवन करण्याला योग्य अशी चंद्राची कांति सर्व जगांत व्यापते, त्याप्रमाणें विनीत मनुष्याची निर्मल अशी कीर्ति संपूर्ण पृथ्वीतलावर भ्रमण करते.

विनयः कारणं मुक्तेर्विनयः कारणं श्रियः ॥
विनयः कारणं प्रीतेर्विनयः कारणं मतेः ॥ ५५ ॥

अर्थ— मोक्ष प्राप्त होणें, लक्ष्मी प्राप्त होणें, इतरांनीं आपल्यावर प्रीति करणें, चांगली बुद्धि उत्पन्न होणें या सर्व गोष्टींचें कारण विनयच होय. ह्मणजे वरील सर्व सुखें विनयापासूनच उत्पन्न होतात.

विनयेन विना पुंसो न सन्ति गुणसम्पदः ॥
न बीजेन विना क्वापि जायन्ते सस्यजातयः ॥५६॥

अर्थ— मनुष्याला, गुणरूप संपत्ति विनयावांचून प्राप्त होत नाहीं. जसें; बींजाशिवाय धान्यें कोठेंहि उत्पन्न होत नाहींत.

प्रश्रयेण विना लक्ष्मीं यः प्रार्थयति दुर्मनाः ॥

**स मूल्येन विना नूनं रत्नं स्वीकर्तुमिच्छति ॥५७॥**

अर्थ— जो दुष्ट मनुष्य विनयगुण असल्यावांचून लक्ष्मीची इच्छा करितो, तो किंमत दिल्यावांचून रत्न घेण्याची इच्छा करितो; असें समजावें. अर्थात् मूर्ख होय.

**का सम्पदविनीतस्य का मैत्री चलचेतसः ॥**
**का तपस्या विशीलस्य का कीर्तिः कोपवर्त्तिनः ५८**

अर्थ— विनयशून्य ह्मणजे उद्धट मनुष्याची संपत्ति कसली? चंचल मनाच्या माणसाची मैत्री कसली? शीलरहित मनुष्याचें तप कसलें? आणि रागिट माणसाची कीर्ति कसली?

**न शठस्येह यस्यास्ति तस्यामुत्र कथं सुखम् ॥**
**न कच्छे कर्कटी यस्य गृहे तस्य कुतस्तनी ॥ ५९ ॥**

अर्थ— ज्या दुष्टाला इहलोकीं संतोषरूप सुख नाहीं, त्याला परलोकी कसें सुख असणार? ज्याच्या शेतांत ककडी नाहीं, त्याच्या घरीं ककडी कोठून येणार? येणार नाहीं.

**लाभालाभौ विबुध्येति भो विनीताविनीतयोः ॥**
**विनीतेन सदा भाव्यं विमुच्याविनयं त्रिधा ६०**

अर्थ— सुजनहो! याप्रमाणें विनयवानाचे लाभ आणि अविनीताचे तोटे जाणून; तीनही प्रकारांनीं अविनय सोडून सदा विनयवान् व्हावें.

वैयावृत्य.

**कृतान्तैरिव दुर्वारैः पीडितानां परीषहैः ॥**
**वैयावृत्यं विधातव्यं मुमुक्षूणां विमुक्तये ॥ ६१ ॥**

अर्थ— यमाप्रमाणें दुर्निवार अशा परीषहांनीं पीडिलेल्या यतींची सेवा, मुक्त होण्याच्या इच्छेनें ( संसारसुखाची इच्छा न धरितां ) करावी.

दुर्भिक्षे मरके घोरे चौरराजाद्युपद्रुते ॥
कर्मक्षयाय कर्त्तव्या व्यावृतिर्व्रतवर्तिनाम् ॥ ६२ ॥

अर्थ— मोठा दुष्काळ पडला असतां, अथवा भयंकर रोग प्राप्त झाला असतां, चोर अथवा राजा ह्यांच्याकडून उपद्रव होऊं लागला असतां श्रावकानें आपल्या कर्मक्षयाकरितां व्रतें करणाऱ्या साधूंची सेवा करावी.

आचार्येऽध्यापके वृद्धे गणरक्षे प्रवर्तके ॥
शैक्षे तपोधने सङ्घे गणे ग्लाने दशस्वपि ॥ ६३ ॥
प्रासुकैरौषधैर्योग्यैर्मनसा वपुषा गिरा ॥
विधेया व्यावृतिः सद्भिर्भवभ्रान्ति जिहासुभिः ६४

अर्थ— व्रताचरण करणारा आचार्य, शास्त्र पढविणारा अध्यापक ( उपाध्याय ), बहुत कालपर्यंत जिनदीक्षा घेतलेला वृद्ध, गणाचें रक्षण करणारा, गणाची प्रवृत्ति करणारा, विद्याभ्यास करणारा, व्रतादि तपश्चर्या करणारा, चार प्रकारच्या मुनींचा संघ, महामुनींचा समुदाय, आणि रोगादिकांच्या योगानें क्लेश भोगणारा ह्या दहा प्रकारच्या साधूविषयीं त्यांना स्वीकार करण्याला योग्य अशा प्रासुक औषधांच्या योगानें मन वाणी आणि काय ह्या तिहींच्या योगानें— संसारभ्रमणाचा नाश करण्याची इच्छा करणाऱ्या सज्जनांनी— व्यावृत्ति ( सेवा ) करावी. ह्मणजे ह्या दहा प्रकारच्या साधूंची औषधादि देऊन सज्जन श्रावकानें सेवा करावी.

तपोभिर्दुष्करै रोगैः पीड्यमानं तपोधनम् ॥
यो दृष्ट्वोपेक्षते शक्तो निर्धर्मो न ततः परः ॥ ६५ ॥

अर्थ— दुष्कर तप आणि रोग ह्यांच्या योगानें पीडित झालेल्या तपोधनाला पाहूनही जो त्याच्या पीडेचें निवारण

करण्याला समर्थ असलेला मनुष्य त्याची उपेक्षा करतो, त्याच्यापेक्षां अधर्मी दुसरा कोणी नाहीं.

गृहस्थोऽपि यतिर्ज्ञेयो वैयावृत्यपरायणः ॥
वैयावृत्त्यविनिर्मुक्तो न गृहस्थो न संयतः ॥ ६६ ॥

अर्थ— जो वैयावृत्य ( साधूंची सेवा ) करण्याविषयीं तत्पर असतो तो जरी गृहस्थ असला तथापि यति होय. आणि जो वैयावृत्य करीत नाहीं तो गृहस्थही नव्हे, आणि संयमीही नव्हे.

वैयावृत्त्यपरः प्राणी पूज्यते संयतैरपि ॥
लभते न कुतः पूजामुपकारपरायणः ॥ ६७ ॥

अर्थ— वैयावृत्त्य करण्याविषयीं तत्पर असलेला मनुष्य यतींनींहि पूजिला जातो. कारण, उपकार करण्याविषयीं तत्पर असलेला मनुष्य पूजेला कसा बरें प्राप्त होणार नाहीं?

संयमो दर्शनं ज्ञानं स्वाध्यायो विनयो नयः ॥
सर्वेऽपि तेन दीयन्ते वैयावृत्त्यं तनोति यः ॥ ६८ ॥

अर्थ— जो वैयावृत्त्य करतो, त्यानें संयम, दर्शन, ज्ञान, स्वाध्याय, विनय आणि नय ह्या सर्वांचें दान केल्यासारखें होतें.

निर्वृतिर्दीयते तेन तेन धर्मो विधास्यते ॥
आगमोऽध्याप्यते तेन क्रियते तेन वा न किम् ६९

अर्थ— वैयावृत्य करणाऱ्यानें मोक्ष दिल्यासारखें होतें. त्यानें धर्माचरण केल्याप्रमाणें होतें. त्यानें अध्यापन केल्यासारखें होते. विशेष काय सांगावयाचें आहे? त्यानें काय केल्यासारखें होत नाहीं बरें? सर्व केल्यासारखें होत आहे. तात्पर्य, एक वैयावृत्य केलें म्हणजे सर्व धार्मिकक्रिया केल्याप्रमाणें होतें.

समाधिर्विहितस्तेन जिनाज्ञा तेन पालिता ॥

धर्मो विस्तारितस्तेन तीर्थं तेन प्रवर्तितम् ॥ ७० ॥

अर्थ--वैयावृत्य करणाऱ्यानें समाधि संपादन केला. त्यानेंच जिनांची आज्ञा पाळली. त्यानेंच धर्माचा विस्तार केला, आणि शास्त्राचीही प्रवृत्ति केली असें समजावें.

दुष्प्रापं तीर्थकर्तृत्वं त्रैलोक्यक्षोभणक्षमम् ॥
प्राप्यते व्यावृतेर्यस्यास्तस्याः किं न परं फलम् ७१

अर्थ— ज्या वैयावृत्तीपासून त्रैलोक्यांत हालचाल उत्पन्न करणारें असें तीर्थंकरत्वहि प्राप्त करून दिलें जातें, तिच्यापासून दुसरें कोणतेंहि फळ मिळणार नाहीं काय ?

परस्यापोह्यते दुःखं सदा येनोपकुर्वता ॥
सम्पद्यते कथं तस्य क कार्यं कारणं विना ॥ ७२ ॥

अर्थ— वैयावृत्ति करणाऱ्या उपकारक मनुष्यानें जर दुसऱ्याचें दुःख घालविलें जातें, तर त्याला दुःख कसें होणार? मुळींच व्हावयाचें नाहीं. ह्याचें बीज असें आहे कीं, कारण असल्यावांचून कार्य कोठेंही उत्पन्न होत नाहीं.

सेव्यो दीर्घायुरादर्यो नीरोगो निरुपद्रवः ॥
वदान्यः सुन्दरो दक्षो जायते स प्रियंवदः ॥ ७३ ॥

अर्थ— वैयावृत्य करणारा श्रावक दुसऱ्यांनीं सेवा करण्याला योग्य, दीर्घायु, आदर करण्याला योग्य, निरोगी, निरुपद्रवी, उदार, सुंदर, शहाणा आणि मधुरभाषण करणारा असा होतो

स धार्मिकः स सद्दृष्टिः स विवेकी स कोविदः ॥
स तपस्वी स चारित्री व्यावृत्तिं विदधाति यः ७४

अर्थ— जो वैयावृत्य करतो, तोच धार्मिक, तोच सम्यग्दर्शनी, तोच विचारी, तोच विद्वान्, तोच तपस्वी आणि तोच चारित्र पाळणारा होय.

प्रायश्चित्तः

**आश्रित्य भक्तितः सूरिं रत्नत्रितयभूषितम् ॥**
**प्रायश्चित्तं विधातव्यं गृहीत्वा व्रतशुद्धये ॥ ७५ ॥**

अर्थ— श्रावकानें रत्नत्रयानें भूषित अशा उपाध्यायाचा आश्रय करून भक्तीनें व्रताच्या शुद्धतेकरितां प्रायश्चित्त घेऊन मग व्रताचरण करावें.

**न सदोषः क्षमः कर्तुं दोषाणां व्यपनोदनम् ॥**
**कर्दमाक्तं कथं वासः कर्दमेण विशोध्यते ॥ ७६ ॥**

अर्थ— सदोष असलेला मनुष्य दोष घालविण्याला समर्थ होत नाहीं. कारण, चिखलानें राड झालेलें वस्त्र चिखलानेंच कसें स्वच्छ केलें जाईल ? ( ह्मणून प्रायश्चित्त देणारा गुरु निर्दोष असावा. )

**दोषमालोचितं ज्ञानी सूरिरीशो व्यपोहितुम् ॥**
**अज्ञानेनैव वैद्येन व्याधिः क्वापि चिकित्स्यते ॥ ७७**

अर्थ— शिष्यानें सांगितलेला दोष घालविण्याला ज्ञानी असा उपाध्यायच समर्थ असतो. कारण, अज्ञानी अशा वैद्यानें कोठें तरी रोग घालविला आहे काय ?

**आलोच्यर्जुस्वभावेन ज्ञानिने यंसतात्मने ॥**
**तदीयवाक्यतः कार्यं प्रायश्चित्तं मनीषिणा ॥ ७८ ॥**

अर्थ— ज्यानें आपलें मन ताब्यांत ठेविलें आहे अशा ज्ञानी पंडिताला सरलस्वभावानें आपले दोष सांगून विचारी श्रावकानें त्या उपाध्यायाच्या सांगण्याप्रमाणें प्रायश्चित्त करावें.

**प्राञ्जलीभूय कर्तव्या सूरेरालोचना त्रिधा ॥**
**विपाके दुःखदं कार्यं वक्रभावेन निर्मितम् ॥ ७९ ॥**

अर्थ— सरलपणानें सूरीपुढें ( उपाध्यायापुढें ) मन, वचन

आणि काय ह्या तिहींच्या योगानें आलोचना करावी. कारण वक्रपणानें जें काय केलें जातें तें परिणामीं दुःखप्रद होतें.

**फलाय जायते पुंसो न चारित्रमशोधितम् ॥**
**मलग्रस्तानि सस्यानि कीदृशं कुर्वते फलम् ॥ ८० ॥**

अर्थ— श्रावकाचें अशुद्ध चारित्र ( दोषाचें प्रायश्चित केल्या-वांचून होणारें चारित्र ) फल देणारें होत नाहीं. बरोबरच आहे. कारण, मळ लागलेलीं धान्यें कसलें फल देणार? तात्पर्य, अशुद्ध धान्य पेरलें असतां चांगलें पीक येत नाहीं.

स्वाध्याय.

**वाचना पृच्छनाऽऽम्नायाऽनुप्रेक्षा धर्मदेशना ॥**
**स्वाध्यायः पञ्चधा कृत्यः पञ्चमीं गतिमिच्छता ८१**

अर्थ— पांचवी जी सिद्धगति तिची इच्छा करणाऱ्या पुरुषानें वाचना ( निर्दोष असा ग्रंथ दुसऱ्याला देणें किंवा पढविणें आणि तशा प्रकारच्या ग्रंथाचा अर्थ दुसऱ्याला पढविणें ), पृच्छना ( संशय दूर करण्याकरितां ग्रंथाचा अर्थ दुसऱ्याला विचारणें ), ( आम्नाय ) ( आपण शुद्ध रीतीनें ग्रंथ पाठ करणें ), अनुप्रेक्षा ( ज्या पदार्थाचें स्वरूप आपल्याला समजलें असेल त्याचें चिंतन करणें ) आणि धर्मदेशना ( धर्मकथांचा उपदेश करणें ) असा पांच प्रकारचा स्वाध्याय करावा.

**तपोऽन्तरानन्तरभेदभिन्नं ।**
**तपोनिधौ किञ्चन पापहारि ॥**
**स्वाध्यायतुल्यं न विलोकयतेऽन्य- ।**
**ध्दृषीकदोषप्रशमप्रवीणम् ॥ ८२ ॥**

अर्थ— तपोनिधींच्या ठिकाणीं, पापाचा नाश करणारें आणि इंद्रियांच्या दोषांचा उपशम करण्यांत प्रवीण असें स्वाध्याया-

सारखें अंतरंग व बाह्य असें दोनही प्रकारचें दुसरें कोणतेंही तप दृष्टीं पडत नाहीं.

स्वाध्यायमत्यस्य चलस्वभावं।
न मानसं यन्त्रयितुं समर्थम्॥
शक्नोति नोन्मूलयितुं प्रवृद्धं।
तमः परो भास्करमन्तरेण॥ ८३॥

अर्थ— चंचलस्वभावाच्या मनाचें नियमन करण्यास स्वाध्यायावांचून दुसरें कोणीही समर्थ नाहीं. योग्यच आहे. कारण, वृद्धि पावलेल्या अंधकाराचा नाश करण्यास सूर्यावांचून दुसरा कोणीही समर्थ नाहीं.

यां स्वाध्यायः पापहानिं विधत्ते।
कृत्वैकाग्र्यं नोपवासः क्षमस्ताम्॥
शक्तः कर्तुं संयतानां न कार्यं।
लोके दृष्टोऽसंयतो दुष्टचेष्टः॥ ८४॥

अर्थ— एकाग्र मन करून केलेला स्वाध्याय ज्या पातकाचा नाश करतो, त्या पातकाचा नाश करण्यास उपवास कांहीं समर्थ नाहीं. कारण, दुर्व्यापार करणारा असंयत मनुष्य संयमी लोकांचें कार्य करण्यास समर्थ असा ह्या जगांत कोठेंच दृष्टीं पडत नाहीं.

विज्ञातनिःशेषपदार्थजातः।
कर्मास्रवद्वारपिधानकारी॥
भूत्वा विधत्ते स्वपरोपकारं।
स्वाध्यायवर्ती बुधपूजनीयः॥८५॥

अर्थ-- स्वाध्याय करणाऱ्याला जीवादि सर्व पदार्थांचें ज्ञान झालें असल्यामुळें तो आपल्या कर्मास्रवांचा संवर करतो.

आणि स्वतःवर व दुसऱ्यावर उपकार करून विद्वान् लोकांना पूज्य होतो.

यद्बुद्धतत्त्वो विधुनोति सद्यो ।
विध्वंसिताशेषहृषीकदोषः ॥
तपोविधानैर्भवकोटिलक्षै- ।
र्नूनं तदज्ञो न धुनोति कर्म ॥८६॥

अर्थ— स्वाध्याय करण्यानें ज्याला तत्त्वज्ञान झालें आहे व ज्यानें सर्व इंद्रियांच्या दोषांचा नाश केला आहे असा मनुष्य तत्काल ज्या कर्मांचा नाश करतो, त्या कर्मांचा नाश अज्ञानी जीव अनेक तपश्चर्या करून लक्षावधि कोटी वेळां संसारांत जन्म घेऊनही करण्यास समर्थ होत नाहीं; हें अगदीं खरें आहे.

*निरस्तसर्वाक्षशरीरवृत्ति- ।*
*र्विधीयते येन शरीरिवर्गः ॥*
प्ररूढजन्माङ्कुरशोषपूषा ।
स्वाध्यायतोऽन्योऽस्ति तरो न योगः ॥८७॥

अर्थ— ज्यानें सर्व जीव, संपूर्ण इंद्रियें आणि शरीर ह्यांच्या दुराचारांचा ज्यांनीं नाश केला आहे असे केले जातात असा व वाढूं लागलेल्या जन्मरूपी अंकुराचें शोषण करणारा सूर्यच कीं काय असा स्वाध्यायावांचून दुसरा कोणताच योग नाहीं.

गुणाः पवित्राः शमसंयमाद्या ।
*विबोधहीनाः क्षणतश्चलन्ति ॥*
कालं कियन्तं दलपुष्पपूर्णा- ।
स्तिष्ठन्ति वृक्षाः क्षतमूलबन्धाः ॥८८॥

अर्थ— शम, संयम वगैरे पवित्र गुण ज्ञान जर नसेल तर एका क्षणांत चळूं लागतात. योग्यच आहे. कारण, ज्यांचीं

मुळें तुटलेलीं आहेत असे वृक्ष किती दिवस पानें आणि फुलें यांनीं भरलेले असे रहातील?

जानात्यकृत्यं न जनो न कृत्यं ।
जैनेश्वरं वाक्यमबुध्यमानः ॥
करोत्यकृत्यं विजहाति कृत्यं ।
ततस्ततो गच्छति दुःखमुग्रम् ॥८९॥

अर्थ— जिनेंद्रांनीं केलेल्या उपदेशाचें ज्याला ज्ञान नाहीं त्या मनुष्याला कृत्यहि समजत नाहीं, आणि अकृत्यहि समजत नाहीं, त्यामुळें तो करावयाचें तें सोडून अकृत्यच करूं लागतो. आणि त्या योगानें भयंकर दुःख पावतो.

अनात्मनीनं परिहर्तुकामा ।
गृहीतुकामाः पुनरात्मनीनम् ॥
पठन्ति शश्वज्जिननाथवाक्यं ।
समस्तकल्याणविधायि सन्तः ॥९०॥

अर्थ— आत्म्याचें अकल्याण ज्याच्यापासून होतें तें सोडावें आणि आत्म्याचें कल्याण ज्याच्यापासून होतें त्याचा स्वीकार करावा अशी इच्छा करणारे सज्जन निरंतर सर्व कल्याण करणारे असें श्रीजिनवाक्य (जिनांनीं उपदेशिलेलें शास्त्र) पठण करतात.

सुखाय ये सूत्रमपास्य जैनं ।
मूढाः श्रयन्ते वचनं परेषाम् ॥
तापच्छिदे ते परिहृत्य तोयं ।
भजन्ति कल्पक्षयकालवह्निम् ॥९१॥

अर्थ— जे मूर्ख लोक जिनांनीं सांगितलेल्या शास्त्राचा त्याग करून सुखाकरितां अन्यमती लोकांच्या शास्त्राचा आश्रय करतात,

ते ताप शांत होण्याकरितां पाणी टाकून कल्पांतकालच्या अग्नीचा आश्रय करतात; असें जाणावें.

विहाय वाक्यं जिनचन्द्रदृष्टं । (सृष्टं) असा पाठ चांगला.
परं न पीयूषमिहास्ति किञ्चित् ॥
मिथ्यादृशां वाक्यमपास्य नूनं ।
पश्यामि नो किञ्चन कालकूटम् ॥ ९२ ॥

अर्थ— श्रीजिनचंद्रापासून उत्पन्न झालेलें वाक्य अर्थात् जिनेंद्रांनीं उपदेशिलेलें शास्त्र ह्यावांचून ह्या जगांत दुसरें अमृत नाहीं. आणि मिथ्यादृष्टींनीं उपदेशिलेल्या शास्त्रावांचून दुसरें कालकूट विष मला कोठेंच दिसत नाहीं. असें आचार्य ह्मणतात.

विधीयते येन समस्तमिष्टं ।
कल्पद्रुमेनेव महाफलेन ॥
आवर्ज्यतां विश्वजनीनवृत्ति- ।
र्मुक्त्वा परं कर्म जिनागमोऽसौ ॥ ९३ ॥

अर्थ— महाफलांनां धारण करणाऱ्या कल्पवृक्षाप्रमाणें ज्यानें संपूर्ण इच्छित प्राप्त करून दिलें जातें, तो हा सर्व जीवांचें हित करणारा जिनागम सर्व कामें सोडून अवश्य संपादन करा!

परेऽपि ये सन्ति तपोविशेषा ।
जिनेन्द्रचन्द्रोदितसूत्रदृष्टाः ॥
स्वशक्तितस्ते निखिला विधेया ।
विधानतः कर्मनिकर्तनाय ॥ ९४ ॥

अर्थ— स्वाध्यायावांचून दुसरेहि जे तपोविशेष जिनसूत्रांत दिसत असतील, ते देखील सर्व तपोविशेष ह्मणजे निरनिराळीं तपें कर्माच्या नाशाकरितां यथाविधि करावेत.

सौख्यं स्वस्थं दीयते येन नित्यं ।
रागावेशश्छिद्यते येन सद्यः ॥
येनानन्दो जन्यते याचनीय-।
स्तं सन्तोषं कुर्वते के न भव्याः ॥९५॥

अर्थ— ज्यानें आत्मस्वरूपाचें सुख निरंतर दिलें जातें, ज्यानें रागाच्या वेगाचा तत्काल नाश केला जातो, आणि ज्यानें दुसऱ्यांनीं इच्छा करण्यासारखा आनंद उत्पन्न केला जातो तो संतोष कोणते भव्यजीव संपादन करित नाहींत बरें?

नेष्टं दातुं कोऽप्युपायः समर्थः ।
सौख्यं नृणामस्ति सन्तोषतोऽन्यः ॥
अम्भोजानां कः प्रबोधं विधातुं ।
शक्तो हित्वा भानुमन्तं न दृष्टः ॥९६॥

अर्थ— संतोषावांचून दुसरा कोणताही उपाय मनुष्यांना इष्टफल देण्यास समर्थ नाहीं. योग्यच आहे. कारण, कमलें प्रफुल्लित करण्यास सूर्यावांचून दुसरा कोणीही समर्थ दिसत नाहीं.

विमुच्य सन्तोषमपास्तबुद्धिः ।
सुखाय यः काङ्क्षति कश्चनान्यम् ॥
दारिद्र्यहानाय स कल्पवृक्षं ।
निरस्य गृह्णाति विषद्रुमं हि ॥९७॥

अर्थ— जो बुद्धिहीन मनुष्य संतोषाचा त्याग करून सुखाकरितां दुसऱ्या एखाद्या उपायाची इच्छा करतो, तो कल्पवृक्षाचा त्याग करून दारिद्र्याच्या नाशाकरितां विषारी अशा वृक्षाचें ग्रहण करतो; असें समजावें.

क्रोधलोभमदमत्सरशोका ।
धर्महानिपटवः परिहार्याः ॥

**व्याधयो न सुखघातपटिष्ठाः ।**
**पोषयन्ति कृतिनः सुखकांक्षाः ॥ ९८ ॥**

अर्थ— धर्माचा नाश करण्याला समर्थ असे जे क्रोध, लोभ, मद, मत्सर आणि शोक ते वर्ज्य करावेत. कारण, सुखाची इच्छा करणारे शहाणे लोक सुखाचा नाश करणाऱ्या व्याधी पोषण करित नाहींत.

**सत्वेषु मैत्री गुणिषु प्रमोदः ।**
**सङ्क्लिश्यमानेषु कृपापरत्वम् ॥**
**मध्यस्थभावो विपरीतवृत्तौ ।**
**सदा विधेयो विदुषा शिवाय ॥ ९९ ॥**

अर्थ— ज्ञानी श्रावकानें सर्वजीवांविषयीं मैत्री, सद्गुणी लोकांविषयीं आनंद, क्लेश भोगत असलेल्या जीवांवर दया आणि द्वेष करणाऱ्या विषयीं उदासीनता हे भाव नेहमी आपल्या कल्याणाकरितां धारण करावेत.

**अनश्वरश्रीप्रतिबन्धकेषु ।**
**प्रभूतदोषोपचितेषु नित्यम् ॥**
**विरागभावः सुधिया विधेयो ।**
**भवाङ्गभोगेषु विनश्वरेषु ॥ १०० ॥**

अर्थ— अविनाशी अशा मोक्षसंपत्तीला प्रतिबंध करणारे, नेहमीं पुष्कळ दोषांमुळें वाढलेले आणि क्षणिक अशा संसारांतील भोगांविषयीं बुद्धिमान् श्रावकानें वैराग्य धारण करावें.

**श्रावकधर्मं भजति विशिष्टं ।**
**योऽनघचित्तोऽमितगतिदृष्टम् ॥**
**गच्छति सौख्यं विगलितकष्टं ।**
**स क्षपयित्वा सकलमनिष्टम् ॥ १०१ ॥**

अर्थ— जो श्रावक अपरिमितज्ञानी अशा जिनेंद्रांनीं प्रत्यक्ष अवलोकन केलेला जो वर सांगितलेला धर्म, त्याचें निष्पाप मनानें सेवन करतो; तो सर्व अनिष्टांचा नाश करून ज्यांत दुःख मुळींच नाहीं असें सुख भोगतो.

॥ इत्युपासकाचारे त्रयोदशः परिच्छेदः ॥

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

# परिच्छेद १४ वा.

## द्वादशानुप्रेक्षा.

---

### अनित्यानुप्रेक्षा.

यौवनं नगनदीस्यदोपमं ।
शारदाम्बुदविलासि जीवितम् ॥
स्वप्नलब्धधनविभ्रमं धनं ।
स्थावरं किमपि नास्ति तत्त्वतः ॥ १ ॥

अर्थ— तारुण्य हें पर्वतावरून वहात येणाऱ्या नदीच्या प्रवाहाप्रमाणें त्वरित निघून जाणारें आहे. जीवित हें शरदृतूंतील मेघांप्रमाणें अस्थिर आहे.

विग्रहा गदभुजङ्गमालया ।
सङ्गमा विगमदोषदूषिताः ॥
सम्पदोऽपि विपदा कटाक्षिता ।
नास्ति किञ्चिदनुपद्रवं स्फुटम् ॥ २ ॥

अर्थ— शरीरें हीं रोगरूपी सर्पांचीं घरें आहेत, स्त्रीपुत्रादिकांचे समागम हे वियोगदोषानें दूषित झालेले आहेत, आणि संपत्ति विपत्तीनें अवलोकन केलेल्या आहेत. ह्यामुळें जगांत कांहीं एक उपद्रवरहित नाहीं हें स्पष्ट आहे.

प्रीतिकीर्तिमतिकान्तिभूतयः ।
पाकशासनशरासनस्थिराः ॥
अध्वनीनपथसङ्गसङ्गमाः ।
सन्ति मित्रपितृपुत्रबान्धवाः ॥ ३ ॥

अर्थ— प्रीति, कीर्ति, बुद्धि, कांति आणि संपत्ति ह्या इंद्रधनुष्याप्रमाणें स्थिर आहेत. आणि मित्र, पिता, पुत्र व बंधु ह्यांचे समागम हे मार्गांत एकत्र जमलेल्या वाटसरूंच्या समागमासारखे आहेत.

मोक्षमेकमपहाय कृत्रिमं ।
नास्ति वस्तु किमपीह शाश्वतम् ॥
किञ्चनापि सहगामि नात्मनो ।
ज्ञानदर्शनमपास्य पावनम् ॥ ४ ॥

अर्थ— एक मोक्ष सोडून ह्या जगांत कोणतीही कृत्रिम वस्तु शाश्वत नाहीं. आणि ज्ञानदर्शन सोडून दुसरी कोणतीही पवित्र वस्तु आत्म्याच्या बरोबर जाणारी नाहीं.

सन्ति ते त्रिभुवने न देहिनो ।
ये न यान्ति समवर्तिमन्दिरम् ॥
शक्रचापखचिता हि कुत्र ते ।
ये व्रजन्ति न विनाशमम्बुदाः ॥ ५ ॥

अर्थ— जे यमाच्या मंदिराला जाणार नाहींत असे प्राणी ह्या त्रैलोक्यांत मुळींच नाहींत. कारण, इंद्रधनुष्यानें युक्त असे असून त्वरित नाश पावत नाहींत असे मेघ कोठें तरी आहेत काय?

देहपंजरमपास्य जर्जरं ।
यत्र तीर्थपतयोऽपि पूजिताः ॥
यान्ति पूर्णसमये शिवास्पदं ।
तत्र के जगति नात्र गत्वराः ॥ ६ ॥

अर्थ— जेथें सर्वांनीं पूजित असे तीर्थंकर देखील ह्या जुन्या झालेल्या देहरूपी पिंजऱ्याला टाकून देऊन ज्या मुक्तिस्थानीं

गेले, तेथें ह्या जगांत ऊर्ध्वगमनशील अशा प्रकारचे कोणते जीव आयुष्य संपल्यावर जाणार नाहींत बरें?

तात्पर्य— तीर्थंकरांना सर्व लोक पूज्य मानीत होते. तथापि ते सुद्धां ह्या देहाचा त्याग करून मोक्षाला गेले. अर्थात् आमच्यापेक्षां त्यांना ह्या ठिकाणीं सुख असूनही ते जर मोक्षाला जाण्याकरितांच सर्वपरिग्रहांचा त्याग करून मोक्षाला गेले; तर मग बाकीच्या जीवांना जर तसें सुख येथें नाहीं तर मग ते सुख भोगण्याकरितां मोक्षाला कां जाणार नाहींत? अर्थात् मोक्षाची इच्छा कां करणार नाहींत? अवश्य करतील आणि कर्मक्षय करून मोक्षाला जातील. ही अनित्यानुप्रेक्षा होय.

अशरणानुप्रेक्षा.

यं करोति पुरतो यमराजो ।
भक्षणाय भुवने क्षुधितात्मा ॥
कानने मृगमिव द्विपवैरी ।
तस्य नास्ति शरणं भुवि कोऽपि ॥ ७ ॥

अर्थ— अरण्यांत ज्याप्रमाणें सिंह हत्तीला खाण्याकरितां आपल्यापुढें घेतो; त्याप्रमाणें यमराज क्षुधित होऊन ज्या जीवाला खाण्याकरितां ह्या जगांत आपल्यापुढें घेतो, त्या जीवाचें रक्षण करणारें ह्या जगांत कोणीही नाहीं.

अन्तकेन यदि विग्रहभाजः ।
स्वीकृतस्य समपत्स्यत पाता ॥
रक्षितः सुरवरैरमरिष्य- ।
न्नो तदा सुरवधूनिकुरम्बः ॥ ८ ॥

अर्थ— यमानें आपल्या हातांत धरलेल्या मनुष्याचा जर कोणी रक्षण करणारा असता, तर इंद्रांनीं ज्याचें रक्षण केलें

आहे असा देवींचा समूह केव्हांच मरण पावला नसता.

यं निहन्तुममरा न समर्था ।
हन्यते न स परैः समवर्ती ॥
यो द्विपैर्न समदैरपि भग्नो ।
भज्यते हि शशकैर्न स वृक्षः ॥ ९ ॥

अर्थ— ज्याला मारण्याला देवही समर्थ झाले नाहींत त्या यमाला मारण्यास दुसरा कोणीही समर्थ नाहीं. कारण, मत्त झालेल्या हत्तींना सुद्धां जो वृक्ष मोडतां आला नाहीं, तो वृक्ष सशांच्यानें केव्हांही मोडला जाणार नाहीं.

स्यन्दनद्विपपदातितुरङ्गै- ।
र्मन्त्रतन्त्रजपपूजनहोमैः ॥
शक्यते न स खलु रक्षितुमङ्गी ।
जीवितव्यपगमे म्रियमाणः ॥ १० ॥

अर्थ— आयुष्याचा काल संपला असता मरूं लागलेला जीव रथ, हत्ती, पायदळ, घोडे, मंत्र, तंत्र, जप, पूजन, होम इत्यादिकांच्या योगानें मुळींच रक्षण करण्याला शक्य नाहीं.

ये चरन्ति धरणीं सह शैलै- ।
र्ये क्षिपन्ति सकलं ग्रहचक्रम् ॥
ते भवन्ति भुवने न स कश्चि- ।
द्यो निहन्ति तरसा यमराजम् ॥ ११ ॥

अर्थ— जे पर्वत मस्तकावर घेऊन भूमीवरून संचार करतात आणि जे ह्या संपूर्ण ग्रहमालेला फेंकून देतात असेही जीव ह्या जगांत उत्पन्न होतात. परंतु, त्यांत जो यमराजाला बलानें मारतो, असा कोणीच नाहीं.

**यो हिनस्ति रभसेन बलिष्ठा- ।**
**निन्द्रचन्द्ररविकेशवरामान् ॥**
**रक्षको भवति कश्चन मृत्यो- ।**
**र्निघ्नतो भवभृतो न ततोऽत्र ॥ १२ ॥**

**अर्थ—** जो यमराज बलवान् अशा इंद्र, चंद्र, सूर्य, केशव, राम ह्यांना सुद्धां झडकन् मारून टाकतो; तो अंतक संसारी जीवाला मारूं लागला असतां त्याच्यापासून रक्षण करण्यास ह्या जगांत कोणीही तयार होत नाहीं. ही अशरण भावना होय.

**चित्रजीवाकुलायां तनूभागिना ।**
**कुर्वता चेष्टितं सर्वदा मोहिना ॥**
**गृह्णता मुञ्चता विग्रहं संसृतौ ।**
**नर्तकेनेव रङ्गक्षितौ भ्रम्यते ॥ १३ ॥**

**अर्थ—** ज्याप्रमाणें नाटक्या मनुष्य रंगभूमीवर अनेक सोंग घेऊन अनेक चेष्टा करित नाचत असतो; त्याप्रमाणें मोहनीय कर्मानें युक्त असलेला हा जीव अनेक तऱ्हेच्या जीवांनीं व्याप्त असलेल्या ह्या संसारांत अनेक चेष्टा करीत व वारंवार शरीर धारण करावयाचें आणि तें सोडून द्यावयाचें असें करीत सर्वदा फिरत असतो.

संसारानुप्रेक्षा.

**श्वसिति रोदिति सीदति खिद्यते ।**
**स्वपिति रुष्यति तुष्यति ताम्यति ॥**
**लिखति दीव्यति सीव्यति नृत्यति ।**
**भ्रमति जन्मवने कलिलाकुलः ॥ १४ ॥**

**अर्थ—** कर्मावृत झालेला हा जीव श्वासोच्छ्वास करतो, दुःखित होतो, खिन्न होतो, निजतो, रागावतो, संतुष्ट होतो,

ताप पावतो, लिहितो, क्रीडा करतो, अनेक व्यवहार करतो, नाचतो; ह्याप्रमाणें करीत ह्या संसारारण्यांत फिरत असतो.

जनकस्तनयस्तनयो जनको।
जननी गृहिणी गृहिणी जननी॥
भगिनी दुहिता दुहिता भगिनी।
भवतीति बताङ्गिणो बहुशः॥ १५॥

अर्थ— या जीवसमूहांत जो पिता असतो तोच अनेक वेळां पुत्र होतो. जो पुत्र असतो तो पिता होतो. जी माता असते तीच पत्नी होते. जी पत्नी असते ती माता होते. जी भगिनी असते तीच कन्या होते. आणि जी कन्या असते ती भगिनी होते. अशाप्रमाणें हा जीवसमूह अनेकवेळां बनत असतो! अरेरे?

कलिलजालवशः स्वयमात्मनो।
भवति यत्र सुतो निजमातरि॥
किमपरं बत तत्र निगद्यते।
विविधदुःखखनौ जननार्णवे॥ १६॥

अर्थ— हा कर्मजालाच्या ताब्यांत सांपडलेला जीव अनेक दुःखांची खाणच कीं काय! अशा ज्या संसारसमुद्रांत आपणच आपल्या आईच्या ठिकाणीं आपला पुत्र होतो! तेथें ह्यापेक्षां अधिक वाईट आणखी काय असावें?

किमपि वेत्ति शिशुर्न हिताहितं।
विविधदुःखमुपैति युवा परम्॥
विकलतां भजते स्थविरस्तरां।
भवति शर्म कदा बत संसृतौ॥ १७॥

अर्थ— या संसारांत हा जीव बालपणीं कल्याण अकल्याण कांहींच जाणत नाहीं, तरुण झालेला जीव अनेक प्रकारचें

दुःख पावतो, वृद्धावस्थेंत असलेला जीव कलाहीन होतो, मग ह्या संसारांत सुख केव्हां बरें होतें?

न सोऽस्ति सम्बन्धविधिर्जगत्त्रये ।
समं समस्तैरपि देहधारिभिः ॥
अवापि यो न भ्रमता भवार्णवे ।
शरीरिणा कर्मनियन्त्रितात्मना ॥ १८ ॥

अर्थ— कर्मनियंत्रित होऊन संसारांत भ्रमण करणाऱ्या जीवानें मुळींच न मिळविलेला अर्थात् अनुभविलेला नाहीं असा सर्व जीवांशीं सह कोणताच संबंध ह्या त्रैलोक्यांत नाहीं.

यत्र चित्रैर्विवर्तैः परावर्त्यते ।
कर्मणाऽनारतं भ्रम्यमाणो जनः ॥
दुःसहं दुर्वचं मानसं कायिकं ।
तत्र दुःखं न किं संसृतावश्नुते ॥ १९ ॥

अर्थ— कर्मसंबंधामुळें नेहमीं भ्रमण करणारा जीव ज्या संसारांत अनेक फेरे फिरून पुनः त्या ठिकाणीं प्राप्त होतो, त्या संसारांत तो जीव दुःसह आणि सांगतां न येण्यासारखें शारीरिक आणि मानसिक दुःख भोगित नाहीं काय? अवश्य भोगतो. ही संसारानुप्रेक्षा होय.

एकत्वानुप्रेक्षा.

देहबान्धवनिमित्तमङ्गिना ।
पापकर्म विविधं विधीयते ॥
एककेन बृहती विषह्यते ।
नारकीं गतिमुपेयुषा व्यथा ॥ २० ॥

अर्थ— देह आणि आपले दारापुत्रादि प्रियजन ह्यांच्या करितां हा जीव अनेकप्रकारचें पापकर्म करीत असतो. परंतु,

त्यामुळें नरकगतीला प्राप्त होणाऱ्या ह्या एकट्याच जीवाला मोठें दुःख सोसावें लागतें!

पद्मपत्रनयना मनोरमाः ।
कारयन्ति दुरितं दुरुत्तरम् ॥
दुर्गतिं विकटदुःखसङ्कटा- ।
मेककस्य शरणं न गच्छतः ॥ २१ ॥

अर्थ— कमलपत्राप्रमाणें ज्यांचे नेत्र आहेत अशा मनोहर स्त्रिया ह्या जीवाला दुर्धर पाप करावयास लावतात. परंतु, भयंकर दुःखामुळें संकटमय अशा नरकगतीला हा जीव एकटाच जाऊं लागला असतां ह्याचें रक्षण करणारें मात्र कोणी नसतें!

मातृतातसुतदारबान्धवाः ।
शर्मदा मम मुधेति तप्यते ॥
कर्म पूर्वमपहाय विद्यते ।
नात्र कोऽपि सुखदुःखकारकः ॥ २२ ॥

अर्थ— आई, बाप, पुत्र, स्त्री आणि बंधुवर्ग हे मला सुख देणारे आहेत असें ह्मणून हा जीव व्यर्थ त्रास भोगीत आहे. कारण, पूर्वी केलेल्या कर्मावांचून ह्याला सुखदुःख देणारा दुसरा ह्या जगांत कोणी नाहीं.

वेदनां गतवतः स्वकर्मजा- ।
मत्र यो न विदधाति किञ्चन ॥
किं करिष्यति परत्र यत्नतो ।
देहजादिनिवहः स पालितः ॥ २३ ॥

अर्थ— आपण यत्नानें रक्षण केलेला जो पुत्रादिकांचा समुदाय ह्या ठिकाणीं आपल्या कर्मामुळें दुःख भोगीत असलेल्या आपल्याबद्दल कांहींच करूं शकत नाहीं; तो समुदाय

परलोकांत तरी आपल्याबद्दल काय करणार?

एकको भ्रमति दुःखकानने ।
भूरिनिर्वृतिनिवासमेककः ॥
एककः श्रयति दुःखमेककः ।
शर्म याति न परोऽस्य विद्यते ॥ २४ ॥

अर्थ— हा जीव दुःखारण्यांत एकटाच फिरतो, अनंत-सुखाचें निवासस्थान असलेल्या मोक्षशिलेवर एकटाच रहातो, एकटाच दुःख भोगतो आणि सुखही एकटाच भोगतो; ह्याला दुसरा कोणीच सहाय असत नाहीं.

जन्ममृत्युरतिकीर्तिसम्पदा- ।
मेकको भवति भाजनं सदा ॥
नास्ति कोऽपि सचिवः शरीरिणो ।
द्रव्यमुक्तिमपहाय तत्त्वतः ॥ २५ ॥

अर्थ— हा एकटाच जीव जन्म, मृत्यु, प्रेम, कीर्ति, आणि संपत्ति ह्यांचा आश्रयभूत सर्वदा असतो; ह्याला द्रव्य-मुक्ति ( आत्मस्वरूप ) सोडून दुसरें खरोखर सहाय करणारें कोणीच नाहीं. ही एकत्वानुप्रेक्षा होय.

अन्यत्वानुप्रेक्षा,

अनादिरात्माऽनिधनः स चेतनो ।
विधाय यः कर्म फलस्य भोजकः ॥
हिताहितादानविमोक्षकोविद- ।
स्ततः शरीरं विपरीतमात्मनः ॥ २६ ॥

अर्थ— आत्मा हा अनादि, अनंत, चेतन, कर्में करून त्यांचें फल भोगणारा आणि हिताचें ग्रहण व अहिताचा त्याग ह्यांचें ज्याला ज्ञान आहे असा आहे. आणि शरीर हें ह्या

आत्म्याच्या अगदीं उलट आहे.

**सदाऽपि यो यत्नशतैः प्रपाल्यते ।**
**न यत्र कायोऽपि निजः स देहिनः ॥**
**परं स्वकीयं किमु तत्र विद्यते ।**
**प्रवर्तते यत्र ममेति मोहितः ॥ २७ ॥**

अर्थ— ज्याचें अनेक प्रयत्नांनीं रक्षण केलें जातें तो देह देखील जेथें आपला नाहीं, तेथें दुसरी कोणती वस्तु आपली असावयाची आहे? कीं, जिच्याकरितां मोहित होऊन 'ही माझी आहे' असें ह्मणून ह्या आत्म्यानें प्रवृत्त व्हावें.

**विमुच्य जन्तोरुपयोगमञ्जसा ।**
**न दर्शनज्ञानमयं परं निजम् ॥**
**परत्र सर्वत्र ममेति शेमुषी ।**
**प्रवर्तते मोहपिशाचनिर्मिता ॥ २८ ॥**

अर्थ— ह्या जीवाचा स्वभावभूत असलेला ज्ञानदर्शनस्वरूप उपयोग सोडून दुसरें खरोखर ह्याचें स्वकीय असें कांहींच नाहीं. ह्मणून उपयोगावांचून अन्य वस्तूंविषयीं "हें माझें आहे" अशी जी ह्याला बुद्धि होत आहे, ती मोहरूपी पिशाचानें उत्पन्न केली आहे.

**भवन्ति ये कार्मणयोगसम्भवाः ।**
**परेऽत्र भावा वपुरात्मजादयः ।**
**विहाय ते दुःखपरम्परां परां ।**
**परं न किञ्चिद्वितरीतुमीशते ॥ २९ ॥**

अर्थ— कर्मपुद्गलांच्या संयोगामुळें उत्पन्न होणारे जे 'हा माझा देह, हा माझा पुत्र' अशा तऱ्हेचे दुसरे अनेक भाव आहेत ते सर्व भाव मोठ्या दुःखपरंपरेला सोडून दुसरें कांहींच देण्याला समर्थ नाहींत.

अनात्मनीना भवदुःखहेतवो ।
विनश्वराः कर्मभवा यतोऽखिलाः ॥
ततो न बाह्येषु विशुद्धबुद्धयो ।
ममेति बुद्धिं मनसाऽपि कुर्वते ॥ ३० ॥

अर्थ— कर्मामुळें उत्पन्न झालेले सर्व शरीरादिक पदार्थ, हे आत्म्याचा संबंध नसलेले, दुःखाला कारणीभूत आणि विनाशी असे आहेत. म्हणून शुद्धबुद्धीचे लोक बाह्यवस्तूंविषयीं 'हें माझें' अशी बुद्धि मनानें सुद्धां करीत नाहींत. म्हणजे "हें माझें आहे" असें मनांत सुद्धां आणीत नाहींत.

न विद्यते यत्र कलेवरं निजं ।
स्वकीयबुध्या मनसि व्यवस्थितम् ॥
तदीयसम्बन्धभवाः सुतादयो ।
परे कथं तत्र निजा निगद्यताम् ॥ ३१ ॥

अर्थ— आपलें अशा बुद्धीनें नेहमीं मनांत वागत असलेलें शरीर सुद्धां जेथें आपलें नाहीं, तेथें त्या शरीराच्या संबंधामुळें आपलेसे वाटूं लागलेले दुसरे पुत्रादिक पदार्थ आपले कसे होतील सांगा बरें ?

करोति बाह्येषु ममेति शेमुषीं ।
परेष्वयं यावदनर्थकारिणिम् ॥
न निर्ममस्तावदमुष्य संसृते- ।
रिति त्रिधा सा विदुषा विमुच्यताम् ॥ ३२ ॥

अर्थ— जोंपर्यंत हा जीव बाह्य वस्तूंविषयीं "हें माझें आहे" अशी अनर्थकारक बुद्धि धारण करतो आहे; तोंपर्यंत तो जीव निर्मम (ममतारहित) होत नाहीं. म्हणून विद्वान् मनुष्यानें ह्या संसाराची ममत्वबुद्धि मन वचन काय ह्या तिहींच्या योगानें

सोडावी. ही अन्यत्वानुप्रेक्षा होय.

अशुचित्वानुप्रेक्षा.

क्षणादमेध्याः शुचयोऽपि भावाः।
संसर्गमात्रेण भवन्ति यस्य॥
शरीरतः सन्ततपूतिगन्धे-।
स्ततः परं किंचन नास्त्यशौचम्॥३३॥

अर्थ— ज्याच्या संसर्गामुळें शुद्ध असे पदार्थ सुद्धां एका क्षणांत अशुद्ध होतात, त्या दुर्गंधयुक्त असलेल्या शरीराहून दुसरी कोणतीच वस्तु अशुद्ध नाहीं.

बहुप्रकाराशुचिराशिपूर्णे।
शुक्रास्रजाते शुचिता क काये॥
अमेध्यपूर्णः किममेध्यकुम्भो।
दृष्टो हि मेध्यत्वमुपाददानः॥३४॥

अर्थ— अनेक प्रकारच्या अशुद्धवस्तूंच्या समूहानें भरलेल्या व शुक्र आणि शोणित ह्यांच्यापासून उत्पन्न झालेल्या शरीरांत शुद्धता कोठून असणार? कारण, अशुद्ध वस्तूंनीं भरलेली अशुद्ध घागर शुद्धता धारण करणारी अशी कोठें पाहिली आहे काय?

मज्जास्थिमेदोमलमांसखानिं।
विगर्हणीयं क्रिमिजालगेहम्॥
देहं दधानं शुचिताभिमानं।
मूर्खो विधत्ते न विशुद्धबुद्धिः॥३५॥

अर्थ— चर्बी, हाडें, मेद, मल आणि मांस ह्यांची खाण, व किड्यांचें घर असें निंद्य शरीर धारण करून मूर्ख जीव शुद्धतेचा अभिमान धारण करतो. पण शुद्धबुद्धीचा मनुष्य

तसा अभिमान धारण करीत नाहीं.

स्रवन्नवस्रोतविचित्रगूथं ।
यो वारिणा शोधयते शरीरम् ॥
अङ्गार दुग्धेन निघृष्य मन्ये ।
विशुद्धमङ्गारमसौ विधत्ते ॥ ३६ ॥

अर्थ— जो मनुष्य नऊ द्वारांतून विचित्र अशा मलाला स्रवणाऱ्या अशा ह्या शरीराला पाण्यानें शुद्ध करतो; तो कोळशाला दुधानें धुवून लवकर स्वच्छ करतो, असें मला वाटतें!

न हन्यते तेन जलेन पापं ।
विवर्ध्यते येन विवर्ध्य रागम् ॥
यद्यस्य जन्मप्रभवे समर्थं ।
तत्तस्य दृष्टं न विनाशकारि ॥ ३७ ॥

अर्थ— जें रागाची वृद्धि करून हिंसाजन्य पातकाला वाढवितें त्या जलाच्यानें पापाचा नाश मुळीं करवत नाहीं. कारण, जें ज्याला उत्पन्न करण्याविषयीं समर्थ असतें तें त्याचा नाश करणारें झालें आहे, असें कोठेंच पाहिलें नाहीं.

विनाश्यते चेत्सलिलेन पापं ।
धर्मस्तदानीं क्रियते किमर्थम् ॥
आरोहणं कोऽपि करोति वृक्षे ।
फले हि हस्तेन न लभ्यमाने ॥ ३८ ॥

अर्थ— जर पाणीच पापाचा नाश करतें आहे तर मग धर्म कशा करितां करावयाचा? अहो! फल जर हातानें काढतां येतें आहे, तर मग झाडावर कोण चढणार?

माघेन तीव्रः क्रियते शशाङ्को ।
ग्रीष्मेण भानुर्यदि नाम शीतः ॥

**देहस्तदानीं पयसा विशुद्धो ।**

**विधीयते दुर्वचगूथयूथः ॥ ३९ ॥**

अर्थ— जर माघमासानें चंद्र अत्यंत ताप देणारा असा केला जाईल, अथवा ग्रीष्मऋतूनें सूर्य थंड केला जाईल, तर मात्र बोलतां न येणाऱ्या अशा मलांच्या समुदायानें व्यापलेला हा देह पाण्यानें शुद्ध केला जाईल!

**सद्ज्ञानसम्यक्त्वचरित्रतोयै- ।**

**र्विगाह्यमानैर्मनसाऽपि जीवः ॥**

**विशोध्यमानस्तरसा पवित्रै- ।**

**र्नाशुद्धिमभ्येति भवान्तरेऽपि ॥ ४० ॥**

अर्थ— पवित्र असें सम्यग्ज्ञान, सम्यक्त्व आणि सम्यक्चारित्र हेंच जें उदक, त्या योगानें मनानेंही स्नान करणारा जीव त्वरित शुद्ध होतो. तो पुनः जन्मांतरीं सुद्धां अशुद्ध होत नाहीं. ही अशुचित्वभावना होय.

आस्रवानुप्रेक्षा.

**रन्ध्रैरिवाम्बुविततैरुदधौ तरण्डे ।**

**जीवे मनोवचनकायविकल्पजालैः ॥**

**जन्मार्णवे विशति कर्म विचित्ररूपं ।**

**सद्यो निमज्जनविधायि सुदुर्निवारम् ॥ ४१ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें समुद्रामध्यें नौकेंत मोठमोठ्या छिद्रांच्या योगानें पाणी शिरतें, त्याप्रमाणें ह्या संसारसमुद्रांत मन वचन आणि काय ह्यांच्या विचित्र अशा अनेक चेष्टांच्या योगानें जीवाच्या प्रदेशांत निवारण न करतां येणारें आणि जीवाला तत्काल बुडविणारें (अधोगतीला नेणारें) असें अनेकप्रकारचें कर्म शिरतें. ह्यालाच ह्मणजे "कर्माचा जीवप्रदेशांत प्रवेश होण्याला

साधनीभूत असलेल्या मन वचन काय ह्यांच्या कषाययुक्त परिणामालाच " आस्रव ह्मणतात.

चित्रेण कर्मपवनेन नियुज्यमानः ।
प्राणिप्लवो बहुविधासुखभाण्डपूर्णः ॥
संसारसागरमसारमलभ्यपारं ।
भूरिभ्रमं भ्रमति कालमनन्तमानम् ॥ ४२ ॥

अर्थ— अनेकप्रकारच्या दुःखरूपी वस्तूंनीं पूर्ण भरलेली ही जीवरूपी नौका विचित्र अशा कर्मरूपी वायूनें प्रेरिलेली अशी होत्साती ह्या अपार अशा संसारसमुद्रांत अनेक गोते खात अनंत कालपर्यंत फिरत आहे.

कर्माददाति यदयं भविनः कषायः ।
संसारदुःखमविधाय न तद्व्यपैति ॥
यद्बन्धनं हि विदधाति विपक्षवर्ग- ।
स्तन्नाम कस्य विरचय्य सुखं प्रयाति ॥ ४३ ॥

अर्थ— जीवाचा रागादिकषाय ज्या कर्माचें ग्रहण करतो तें कर्म त्या जीवाला संसाराचें दुःख दिल्यावांचून जात नाहीं. बरोबरच आहे. कारण, शत्रूनें एखाद्याला बांधलें असतां तें बंधन कोणाला सुख देऊन निघून जाईल बरें? अर्थात् शत्रूनें एखाद्याला बांधलें असतां त्यापासून दुःख व्हावयाचेंच.

भेदाः सुखासुखविधानविधौ समर्था ।
ये कर्मणो विविधबन्धरसा भवन्ति ॥
जन्तोः शुभाशुभमनःपरिणामजन्या- ।
स्तैर्भ्रम्यते भववने चिरमेष जीवः ॥ ४४ ॥

अर्थ— जीवाचे जे शुभ अथवा अशुभ अशा प्रकारचे मनाचे परिणाम, त्यांच्यापासून उत्पन्न झालेले, सुखदुःखें देण्याला

समर्थ असे कर्मांचे जे अनेकप्रकारचे अनुभागबंध होतात तेच ह्या जीवाला संसारारण्यांत चिरकाल फिरवीत असतात.

गृह्णाति कर्म सुखदं शुभयोगवृत्त्या ।
दुःखप्रदायि तु यतोऽशुभयोगवृत्त्या ॥
आद्या सुखार्थिभिरतः सततं विधेया ।
हेया परा प्रचुरकष्टनिदानभूता ॥ ४५ ॥

अर्थ— हा जीव मन वचन आणि काय ह्यांच्या शुभपरिणामांच्या योगानें सुख देणारें असें कर्म ग्रहण करतो; आणि अशुभपरिणामांच्या योगानें दुःख देणाऱ्या कर्मांचें ग्रहण करतो. ह्मणून सुखाची इच्छा करणाऱ्या जीवांनीं शुभपरिणाम सर्वदा करावेत. आणि पुष्कळ दुःख देणारे अशा अशुभपरिणामांचा त्याग करावा.

एकप्रकारमपि योगवशादुपेतं ।
कुर्वन्ति कर्म विविधं विविधाः कषायाः ॥
एकस्वभावमुपगम्य जलं घनेभ्यः ।
प्राप्य प्रदेशमुपयाति न किं विभेदम् ॥ ४६ ॥

अर्थ— मन वचन काय ह्यांच्या परिणामामुळें जरी एकप्रकारचेंच कर्म जीवप्रदेशांत प्राप्त झालें तथापि अनेक प्रकारचे कषाय हे त्याला अनेक प्रकारचें करतात. ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण, मेघापासून एकाच प्रकारचें पाणी येतें. परंतु, ते अनेक प्रकारच्या भूमीवर पडून अनेक प्रकारचें होत नाहीं काय?

मिथ्यात्वदौर्वृत्त्यकषाययोग- ।
प्रमाददोषा विविधप्रकाराः ॥
कर्मास्रवाः सन्ति शरीरभाजां ।

जलास्रवा वा सरसां प्रवाहाः ॥ ४७ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें सरोवराचे आंत पाणी आणणारे पाट अनेक असतात; त्याप्रमाणें मिथ्यात्व, दुराचार, कषाय, योग आणि प्रमाद असे अनेक प्रकारचे दोष जीवाचे कर्मास्रव होतात. ह्मणजे जीवप्रदेशांत कर्म आणणारे मार्ग होतात. ही आस्रवानुप्रेक्षा होय.

संवरानुप्रेक्षा.

**संवरणं तरसा दुरिताना- । मास्रवरोधकरेषु नरेषु ॥**
**आगमनस्य कृते हि निरोधे । कुत्र विशन्ति जलानि सरस्सु**

अर्थ— आस्रवांचा निरोध करणाऱ्या जीवांच्या ठिकाणीं संवर ह्मणजे कर्मांच्या आगमनाला प्रतिबंध होतो. कारण, पाणी येण्याच्या द्वाराला प्रतिबंध केल्यावर सरोवरांत कोठून पाणी येणार?

**नश्यति कर्म कदाचन जन्तोः । संवरणेन विना न गृहीतम् ॥**
**शुष्यति कुत्र जलं हि तडागे । सङ्गमने बहुधाऽभिनवस्य**

अर्थ— जीवानें आत्मप्रदेशांत ग्रहण केलेलें कर्म संवर केल्यावांचून केव्हांही नाश पावत नाहीं. कारण, तलावांत नवें पाणी पुष्कळ येऊं लागलें असतां तलावांतील पाणी कोठें तरी आटलें आहे काय?

**योगनिरोधकरस्य सुदृष्टे- । रस्तकषायरिपोर्विरतस्य ॥**
**यत्नपरस्य नरस्य समस्तं । सँवृतिमृच्छति नूतनमेनः ॥५०॥**

अर्थ— ज्यानें योगांचा निरोध केला आहे आणि कषायरूपी शत्रूंचा नाश करून जो हिंसादिकांपासून विरत झाला आहे अशा सम्यग्दृष्टि आणि प्रयत्न करणाऱ्या जीवाच्या प्रदेशांत येणाऱ्या नवीन पापकर्मांचा संवर होतो. ह्मणजे, योगनिरोध केल्यानें जीवप्रदेशांत येणाऱ्या नवीन कर्मांचा संवर होतो.

**धर्मपरस्य परीषहजेतु- । र्वृत्तवतः समितस्य सुगुप्तेः ॥**
**आगमवासितमानसवृत्तेः । सङ्गतिरस्ति न कर्मरजोभिः ॥**

अर्थ— क्षमा वगैरे दहा प्रकारच्या धर्मांविषयीं तत्पर, परीषहांचा जय करणारा, सामायिकादि आचार करणारा, समिति आणि गुप्ति पाळणारा आणि शास्त्राचा संस्कार ज्याच्या मनावर झालेला आहे अशा जीवाला कर्मपुद्गलांचें नवीन बंधन होत नाहीं.

**दर्शनबोधचरित्रतपोभि- । श्चेतसि कल्मषमेति न तुष्टे ॥**
**शूरतरैः पुरुषैः कृतरक्षे । शत्रुबलं विशति क्व पुरे हि ॥**

अर्थ— सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्र आणि तप ह्यांच्या योगानें तुष्ट असलेल्या मनांत पाप येत नाहीं. योग्यच आहे. कारण, शूरपुरुषांनीं ज्याचें रक्षण केलें आहे, अशा नगरांत शत्रूचें सैन्य कोठें तरी प्रवेश करतें काय?

**पातकमास्रवति स्थिररूपं । संसृतिमासवतां न यतीनाम्**
**वर्मधरान्न नराव्रणरङ्गे । क्वापि भिनत्ति शिलीमुखजालम्**

अर्थ—संसारांत असलेल्या यतींना पापास्रव होत नाहीं. कारण, कवच धारण करणाऱ्यांना युद्धांत कोठें बाण लागत नाहीं.

**कामकषायहृषीकनिरोधं । यो विदधाति परैरसुसाध्यम् ॥**
**केवललोकविलोकितलोको । याति स मुक्तिपुरीमनपायां**

अर्थ— दुसऱ्यांना असाध्य असा—काम आणि क्रोधादि कषाय ह्यांचा—निरोध (संवर) ज्यानें केला आहे, तो जीव केवलज्ञानानें सर्वज्ञ होऊन अविनाशी अशा मोक्षपुरीला गमन करतो. ही संवरानुप्रेक्षा होय.

निर्जरानुप्रेक्षा.

**दृढीकृतो याति न कर्मपर्वतः ।**

**शरीरिणां निर्जरया विना क्षयम् ॥**
**न धान्यपुञ्जः प्रलयं प्रपद्यते ।**
**व्ययं विना क्वापि विवर्धितश्चिरम् ॥ ५५ ॥**

अर्थ— जीवानें फार घट्ट बनविलेला कर्मरूपी पर्वत—ज्याप्रमाणें फार दिवसांपासून सांठविलेला धान्याचा ढीग खर्च केल्याशिवाय संपत नाहीं—त्याप्रमाणें निर्जरा केल्यावांचून नाश पावत नाहीं. तात्पर्य–कर्मांचा नाश त्यांच्या फलांचा उपभोग घेऊनच करावयाचा असें जर ह्मटलें, तर तें होणेंच शक्य नाहीं. कारण, एका कर्माच्या फलाचा उपभोग करीत असतांच जीवाला दुसऱ्या कर्माचा बंध होतो. ह्याप्रमाणें होत असल्यामुळें कर्मांचा नाश उपभोगानें होणें शक्य नाहीं. ह्मणून तपश्चर्यादिकांच्या योगानें त्याची निर्जराच केली पाहिजे.

**निरन्तरानेकभवार्जितस्य या ।**
**पुरातनस्य क्षतिरेकदेशतः ॥**
**विपाकजापाकजभेदतो द्विधा ।**
**यतीश्वरास्तां निगदन्ति निर्जराम् ॥ ५६ ॥**

अर्थ— अनेक जन्मापासून निरंतर संपादन केलेल्या कर्माच्या एकदेशाचा जो नाश त्याला जिनेंद्र निर्जरा असें ह्मणतात. ती विपाकज आणि अविपाकज अशी दोन प्रकारची आहे.

**अनेहसा या कलिलस्य निर्जरा ।**
**विपाकजां तां कथयन्ति सूरयः ॥**
**अपाकजाता भवदुःखखर्विणी ।**
**विधीयते या तपसा गरीयसा ॥ ५७ ॥**

अर्थ— कालानें जी कर्माची निर्जरा होते तिला पंडित लोक

सविपाक निर्जरा म्हणतात. आणि मोठी तपश्चर्या करून जी कर्मांची निर्जरा केली जाते ती अविपाक निर्जरा होय. ही निर्जरा संसारदुःख कमी करणारी आहे.

**तपोभिरुग्रैः सति संवरे रजो ।**
**निषूयमानं सकलं पलायते ॥**
**निरास्रवं वारि विवस्वदंशुभि- ।**
**र्न शोष्यमाणं सरसोऽवतिष्ठते ॥ ५८ ॥**

अर्थ— जीवानें संवर केला असतां मग तो उग्र तपश्चर्या करून ज्या कर्मांची निर्जरा करतो तें कर्म त्याच्या प्रदेशांतून निघून जातें. कारण, पाणी येण्याचें द्वार बंद केल्यावर सरोवराचें पाणी सूर्याच्या किरणांनीं आटूं लागल्यामुळें मुळींच टिकत नाहीं.

**परेण जीवस्तपसा प्रतापितो ।**
**विनिर्मलत्वं रभसा प्रपद्यते ॥**
**सुवर्णशैलस्य मलोऽवतिष्ठते ।**
**प्रताप्यमानस्य कृशानुना कथम् ॥ ५९ ॥**

अर्थ— उत्कृष्ट अशा तपश्चर्येनें तप्त झालेला जीव लवकर निर्मळ ( कर्मरहित ) होतो. अर्थात् तपानें कर्मांची निर्जरा करूं लागलेला लवकरच कर्मांपासून मुक्त होतो. कारण, सुवर्णाचा पर्वत असूनहि जर तो अग्नीनें तापला तर मग त्याची मलिनता कशी बरें राहील? ही निर्जरानुप्रेक्षा होय.

लोकानुप्रेक्षा.

**व्योममध्यगमकृत्रिमं स्थिरं ।**
**लोकमङ्गिनिवहेन संकुलम् ॥**
**सप्तरज्जुघनसम्मितं जिना ।**
**वर्णयन्ति पवमानवेष्टितम् ॥ ६० ॥**

अर्थ— श्रीजिनेंद्र हे लोकाचें (त्रैलोक्याचें) स्वरूप असें सांगतात कीं, लोक हा आकाशाच्या मध्यभागीं असणारा अकृत्रिम आणि स्थिर असा असून अनंतानंत जीवसमूहांनीं व्यापलेला आणि सात रज्जूचा घन ह्मणजे तीनशे त्रेचाळीस रज्जूप्रमाणाचा आहे. आणि त्याच्या भोंवती वातवलय आहे.

जन्ममृत्युकलितेन जन्तुना ।
कर्मवैरिवशवर्तिना सता ॥
यो न तत्र बहुशो विगाहितो ।
विद्यते न विषयः स कश्चन ॥ ६१ ॥

अर्थ— जन्ममृत्यूंनीं व्यापलेल्या व कर्मशत्रूच्या ताब्यांत सांपडलेल्या ह्या जीवानें पुष्कळवेळां प्रवेश केलेला नाहीं असा कोणताहि प्रदेश त्या लोकांत नाहीं. ह्मणजे वर जो लोक ह्मणून सांगितला त्यांत कोणत्याहि जीवानें अनेक प्रकारचे जन्म अनेकवेळां घेतलेले असल्यानें त्या लोकांतील कोणताहि प्रदेश असा नाहीं कीं, कोणत्याहि जीवानें त्या प्रदेशांत जन्म घेतलेला नाहीं. तात्पर्य- ह्या लोकांतील कोणत्याहि प्रदेशांत कोणत्याहि जीवानें अनंतवार जन्म घेतला असून तो अनंतवार त्या ठिकाणीं मृतही झालेला आहे.

भूरिशोऽत्र सुखदुःखदायिनी- ।
र्मूर्तिजातिगतियोनिसम्पदः ॥
यन्त्रितो विविधकर्मशृंखलैः ।
का न निर्विशति चेतनश्चिरम् ॥ ६२ ॥

अर्थ— हा जीव अनेक प्रकारच्या कर्मरूपी सांखळ्यांनीं जखडलेला असल्यामुळें ह्या जगांत सुख आणि दुःख देणाऱ्या ज्या ह्मणून मूर्ति (देह), जाति, गति, योनि आणि संपत्ति

आहेत; त्यांपैकीं कोणत्या एकीचा चिरकाल उपभोग घेता झाला नाहीं बरें? तर सर्वांचा उपभोग घेता झाला आहे.

बान्धवो भवति शात्रवोऽपि वा ।
कोऽत्र कस्य निजकार्यवर्जितः ॥
बन्धुरेष मम शत्रुरेष वा ।
शेमुषीमिति करोति मोहितः ॥ ६३ ॥

अर्थ— आपलें कार्य जर नसेल, तर ह्या जगांत कोण कोणाचा बंधु आणि कोण कोणाचा शत्रु होत आहे काय? मुळींच होत नाहीं. ह्मणून हा जीव; हा माझा बंधु आणि हा माझा शत्रु अशी बुद्धि कर्मानें मोहित होऊन धारण करीत आहे, असें समजावें.

देवमर्त्यपशुनारकेष्वयं ।
दुःखजालकलितेष्वनारतम् ॥
कामकोपमदलोभवासितो ।
वर्तते भवविपर्ययाकुलः ॥ ६४ ॥

अर्थ— काम, क्रोध, मद आणि लोभ ह्यांनीं युक्त असलेला हा जीव; दुःखाच्या समूहानें व्यापलेल्या देव, मनुष्य, पशु, नारकी ह्या गतींत नेहमीं परिवर्तन करीत राहिलेला आहे.

जन्मवर्तिनिवहो वियुज्यते ।
युज्यते स्वकृतकर्मभिः पुनः ॥
शुष्कपत्रनिवहः परस्परं ।
मारुतैरिव विभीमवृत्तिभिः ॥ ६५ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें वाळलेलीं पानें जोरानें वहाणाऱ्या वाऱ्या-मुळें एकमेकांशीं संयुक्त होतात आणि वियुक्तही होतात; त्या-प्रमाणें, संसारी जीवांचा समुदाय आपण केलेल्या कर्मांच्या

योगानेंच एकमेकांशीं संयुक्त होतो व वियुक्तही होतो.

एष वेष्टयति भोगकांक्षया ।
कोशकार इव लालया स्वयम् ॥
कर्मबीजभवया विनिन्द्यया ।
घोरमृत्युभयदानदक्षया ॥ ६६ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें कोशकार नांवाचा किडा आपल्या लाळेनें आपल्यालाच वेष्टन करतो; त्याप्रमाणें हा जीव कर्मरूपी बीजापासून उत्पन्न झालेलें व अत्यंत निंद्य आणि भयंकर असें मृत्यूचें भय उत्पन्न करण्यास समर्थ अशा भोगतृष्णेनें आपल्याला आपणच वेढून घेतो.

चेतसीति सततं वितन्वतो ।
लोकरूपमुपजायते परा ॥
राक्षसीत इव संसृतेः स्फुटं ।
धर्मकर्मजननी विरक्तता ॥ ६७ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें त्रैलोक्याचें स्वरूप मनांत नेहमीं चिंतन करणाऱ्या पुरुषाला ज्याप्रमाणें एखाद्याला राक्षसी स्त्री प्राप्त झाली असतां तिच्यापासून विरक्तता उत्पन्न होते, त्याप्रमाणें धर्मकृत्यांना करविणारी उत्कृष्ट विरक्तता उत्पन्न होते; हें स्पष्ट आहे. ही लोकानुपेक्षा होय.

बोधिदुर्लभत्वानुप्रेक्षा.

देशजातिकुलरूपकल्पता- ।
जीवितव्यबलवीर्यसम्पदः ॥
देशनाग्रहणबुद्धिधारणाः ।
सन्ति देहिनिवहस्य दुर्लभाः ॥ ६८ ॥

अर्थ— मुक्तिप्राप्ति होण्याला योग्य असा भरतखंडासारखा

देश, क्षत्रिय वगैरे जाति, सुंदर रूप, निरोगीपणा, दीर्घायु, शरीर बल, आत्म्याची शक्ति, संपत्ति, श्रीजिनांचा उपदेश, त्याचें ज्ञान होण्याला योग्य अशी बुद्धि आणि झालेलें ज्ञान टिकण्याची शक्ति ह्या गोष्टी जीवांना फार दुर्लभ आहेत.

हन्त तासु सुखदानकोविदा ।
ज्ञानदर्शनचरित्रसंगतिः ॥
लभ्यते तनुभृताऽतिकृच्छ्रतः ।
कामिनीष्विव कृतज्ञता सती ॥ ६९ ॥

अर्थ— आणि वरील सर्व गोष्टी जरी प्राप्त झाल्या तथापि त्यांत सुख देण्याला समर्थ अशा दर्शन ज्ञान चारित्र ह्यांचा समागम होणें हें—ज्याप्रमाणें स्त्रियांमध्यें कृतज्ञता हा गुण फार कष्टानें प्राप्त होणारा आहे; त्याप्रमाणेंच फारच कष्टानें होणारें आहे. अरेरे!

साधुलोकमहिता प्रमादतो ।
बोधिरत्र यदि जातु नश्यति ॥
प्राप्यते न भविना तदा पुन- ।
र्नीरधाविव मनोरमो मणिः ॥ ७० ॥

अर्थ— साधुलोकांना पूज्य असें ज्ञान एखादे वेळीं नाश पावलें, तर ज्याप्रमाणें समुद्रांत पडलेलें सुंदर रत्न सांपडत नाहीं त्याप्रमाणें तें ज्ञान ह्या जगांत संसारी जीवाला पुनः मिळावयाचें नाहीं.

हन्त बोधिमपहाय शर्मणे ।
योऽधमो वितनुते धनार्जनम् ॥
जीविताय विषवल्लरीं स्फुटं ।
सेवतेऽमृतलतामपास्य सः ॥ ७१ ॥

अर्थ— जो मूर्ख मनुष्य ज्ञानाचा त्याग करून सुखाकरितां द्रव्य संपादन करूं लागतो, तो जगण्याकरितां अमृतवल्लीचा त्याग करून विषवल्लीचें सेवन करतो हें स्पष्ट आहे. अरेरे! फार वाईट!!

योऽत्र धर्ममुपलभ्य मुञ्चते ।
क्लेशमेष लभतेऽतिदारुणम् ॥
यो निधानमनघं व्यपोहते ।
खिद्यते स नितरां किमद्भुतम् ॥ ७२ ॥

अर्थ— ह्या जगांत जो मनुष्य धर्माची प्राप्ति झाली असतां त्याचा त्याग करतो तो अत्यंत दुःख पावतो. कारण, जो उत्तम ठेवा सांपडलेला टाकून देतो, त्याला अतिशय खेद होतो; ह्यांत आश्चर्य काय?

मुञ्चता जननमृत्युयातनां ।
गृह्णताऽतिशिवतातिमुत्तमाम् ॥
शाश्वतीं मतिमता विधीयते ।
बोधिरद्रिपतिचूलिकास्थिरा ॥ ७३ ॥

अर्थ— जन्ममृत्यूंच्या यातनांचा त्याग करणारा व कल्याण कारिणी अशी बुद्धि धारण करणारा असा जो बुद्धिमान् पुरुष, तोच सुमेरुपर्वताच्या टेंकडीप्रमाणें स्थिर अशा प्रकारचें शाश्वत ज्ञान संपादन करतो. ही बोधिदुर्लभानुप्रेक्षा होय.

धर्मानुप्रेक्षा.

निरुपमनिरवद्यशर्ममूलं ।
हितमभिपूजितमस्तसर्वदोषम् ॥
भजति जिननिवेदितं स धर्मं ।
भवति जनः सुखभाजनं सदा यः ॥ ७४ ॥

अर्थ— ज्याला उपमा नाहीं असा, निर्दोष अशा सुखाला कारणीभूत असलेला, कल्याण करणारा, सर्वांना पूज्य आणि सर्वदोषांचा नाश करणारा असा श्रीजिनेंद्रांनीं सांगितलेला जो धर्म, त्याचें जो पुरुष सेवन करतो, तो सर्वदा सुखाचें स्थान होतो.

व्यपनयति भवं दुरन्तदुःखं ।
वितरति मुक्तिपदं निरामयं यः ॥
भवति कृतधिया त्रिधा विधेयः ।
सकलसमीहितसाधनः स धर्मः ॥ ७५ ॥

अर्थ— जो अत्यंत दुःख देणाऱ्या संसाराचा नाश करतो, आणि पीडारहित असें मोक्षस्थान प्राप्त करून देतो, तो, सर्व इष्टप्राप्तीला साधनीभूत असलेला असा धर्म; विचारी पुरुषानें मन, वचन आणि शरीर ह्या तिहींच्या योगानें आचरण करण्याला योग्य होतो.

मनुजभवमवाप्य यो न धर्मं ।
विषयसुखाकुलितः करोति पथ्यम् ॥
मणिकनकनगं समेत्य मन्ये ।
पिपतिषति स्फुटमेष जीवितार्थी ॥ ७६ ॥

अर्थ— मनुष्यजन्म प्राप्त होऊन जो विषयसुखानें पराधीन झालेला पुरुष हितकर अशा धर्माचें सेवन करीत नाहीं, तो रत्नें आणि सुवर्ण ह्यांचा पर्वत मिळूनही जगण्याच्या इच्छेनें त्यावरून पडण्याची इच्छा करतो! असें मला खचित वाटतें.

कलुषयति कुधीर्निरस्तधर्मो ।
भवशतमेकभवस्य कारणं यः ॥
अभिलषितफलानि दातुमीशं ।

त्यजति तृणार्थितया स कल्पवृक्षम् ॥७७॥

अर्थ— ज्यानें धर्माचा त्याग केला आहे असा जो दुर्बुद्धि मनुष्य एका भवामुळें ( एका भवांत मिळणाऱ्या विषयसुखामुळें ) पुढल्या शेकडों भवांचा नाश करतो, तो गवताच्या इच्छेनें अनेक इष्टफल देण्याला समर्थ अशा कल्पवृक्षाचा त्याग करतो असें समजावें.

शमयमनियमव्रताभिरामं ।
चरति न यो जिनधर्ममस्तदोषम् ॥
भवमरणनिपीडितो दुरात्मा ।
भ्रमति चिरं भवकानने स भीमे ॥ ७८ ॥

अर्थ— शम ( कषाय नसणें ), यम ( यावज्जीव हिंसादिकांचा त्याग करणें ), नियम ( कांहीं कालपर्यंत त्याग करणें ) आणि अहिंसादिव्रतें ह्यांच्या योगानें सुंदर व निर्दोष अशा जिनधर्माचें जो अविचारी मनुष्य सेवन करीत नाहीं, तो जन्ममरणानें पीडित होऊन ह्या भयंकर अशा संसाररूपी अरण्यांत चिरकाल भ्रमण करतो.

विगलितकलिलेन येन युक्तो ।
भवति नरो भुवनस्य पूजनीयः ॥
शुचिवचनमनःशरीरवृत्त्या ।
भजति बुधो न कथं तमत्र धर्मम् ॥ ७९ ॥

अर्थ— निष्पाप अशा ज्या धर्मानें युक्त असलेला पुरुष त्रिभुवनाला पूज्य होतो, त्या धर्माचें शहाणा मनुष्य शुद्ध अशा मन वचन काय ह्या तिहींच्या योगानें ह्या जगांत कसा बरें सेवन करणार नाहीं ?

क्षान्तिर्मार्दवमार्जवं निगदितं सत्यं शुचिस्त्वं त्रप- ।

स्त्यागोऽकिंचनता मुमुक्षुयतिभिर्ब्रह्मव्रतं संयमः ॥
धर्मस्येति जिनोदितस्य दशधा निर्दूषणं लक्षणं ।
कुर्वाणो भवयन्त्रणाविरहितो मुक्त्यङ्गनां श्लिष्यति

अर्थ— क्षमा, दयालुता, सरलपणा, सत्य, शुध्दपणा, तप, त्याग, परिग्रहरहितता, ब्रह्मचर्य आणि संयम असें जिनेंद्रांनीं सांगितलेल्या धर्माचें दहा प्रकारचें दोषरहित असें लक्षण मुमुक्षु अशा यतींनीं सांगितलें आहे. म्हणून ह्या धर्माचें सेवन करणारा जीव संसाराच्या तावडींतून सुटून मुक्तिरूपी स्त्रीला आलिंगन करतो. ही धर्मानुप्रेक्षा होय.

येऽनुप्रेक्षा द्वादशापीति नित्यं ।
भव्यो भक्त्या ध्यायति ध्यानशीलः ॥
हेयादेयाशेषतत्वावबोधी ।
सिद्धिं सद्यो याति स ध्वस्तकर्मा ॥ ८१ ॥

अर्थ— ध्यानशील असा जो कोणी भव्यजीव ह्या बाराही प्रकारच्या अनुप्रेक्षांचें नेहमीं चिंतन करतो, तो त्याज्य काय आणि ग्राह्य काय ह्यांचें ज्ञान होऊन सर्व कर्मांचा नाश करून तत्काल सिद्धीला ( मुक्तीला ) प्राप्त होतो.

सूचिततत्त्वं ध्वस्तकुतत्त्वं ।
भवभयविदलनदमधमकथनम् ॥
यो हृदि धत्ते पापनिवृत्त्यै ।
शुचि रुचिराचिरं जिनपतिवचनम् ॥ ८२ ॥
केवललोकालोकितलोका- ।
मितगतियतिपतिसुरपतिमहिताम् ॥
याति स सिद्धिं पावनशुद्धिं ।
विगलितकलिमलगुणमणिसहिताम् ॥ ८३ ॥

अर्थ— ह्या जीवादितत्त्वांचें ज्ञान करून देणारें, भवभयाचा नाश करणाऱ्या दम ( शांति ) आणि यम ( व्रतादिक ) ह्यांचें निरूपण करणारें, अतिमधुर असलेलें श्रीजिनेंद्राचें भाषण जो भव्यजीव पापाच्या नाशाकरितां हृदयांत धारण करतो; तो जीव, केवलज्ञानाच्या योगानें संपूर्ण लोकांचें ज्यांना प्रत्यक्षज्ञान होत आहे असे अनंतज्ञानी असलेले यतिपति आणि देवेंद्र ह्यांनीं पूज्य, आणि दुसऱ्याला पवित्र करणारी असून स्वतः शुद्ध आणि ज्यांच्या योगानें ह्या कलियुगांतील ( पंचमकालांतील ) पातकें नष्ट होत आहेत अशा सद्‌गुणरूपी रत्नांनीं युक्त अशा सिद्धीला ( मुक्तीला ) प्राप्त होतो.

इत्युपासकाचारे चतुर्दशः परिच्छेदः

---

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

# परिच्छेद पंधरावा.

नियम्य करणग्रामं व्रतशीलगुणावृतैः ॥
सर्वो विधीयते भव्यैर्विधिरेष विमुक्तये ॥ १ ॥

अर्थ— व्रतें, शील आणि गुण ह्यांनीं युक्त असलेल्या भव्यजीवांनीं सर्व इंद्रियें निरुद्ध करून पूर्वी सांगितलेला हा सर्व विधि मोक्षाकरितां केला जातो.

न सा सम्पद्यते जन्तोः सर्वकर्मक्षयं विना ॥
रजोऽपहारिणी वृष्टिर्बलाहकमिवोर्जिता ॥ २ ॥

अर्थ— परंतु ज्याप्रमाणें ढग आल्यावांचून धुरळा नाहींसा करणारी जोराची वृष्टि होत नाहीं, त्याप्रमाणें ती मुक्ति सर्वकर्मांचा क्षय झाल्यावांचून जीवाला प्राप्त होत नाहीं.

समस्तकर्मविश्लेषो ध्यानेनैव विधीयते ॥
नाहस्करं विनाऽन्येन हन्यते शार्वरं तमः ॥ ३ ॥

अर्थ— जीवाची सर्व कर्मांपासून मुक्तता दुसऱ्या कशानेंहि होत नसून ध्यानानेंच होते. कारण, रात्रीं पडलेला अंधार सूर्यावांचून दुसऱ्या कोणाच्यानेंहि घालविला जात नाहीं.

यत्नः कार्यो बुधैर्ध्याने कर्मभ्यो मोक्षकांक्षिभिः ॥
रोगेभ्यो दुःखकारिभ्यो व्याधितैरिव भेषजे ॥४॥

अर्थ— व्याधीनें युक्त असलेले लोक ज्याप्रमाणें रोगांपासून मुक्त होण्याकरितां औषधाबद्दल खटपट करतात, त्याप्रमाणें कर्मांपासून मुक्त होण्याकरितां भव्य जीवानें ध्यानाविषयीं

प्रयत्न करावा. आतां ध्यानाचें सामान्य लक्षण सांगतात—

आद्यत्रिसंहतेः साधोरान्तर्मौहूर्तिकं परम् ॥
वस्तुन्येकत्र चित्तस्य स्थैर्यं ध्यानमुदीर्यते ॥ ५ ॥

अर्थ— पहिल्या तीन संहननांनीं ( वज्रवृषभनाराच, नाराच आणि अर्धनाराच हीं तीन प्रकारचीं जीं संहननें ह्म. शरीराच्या रचना, त्यांनीं ) युक्त असलेल्या साधकाची जी उत्कृष्ट अंतर्मुहूर्त-कालपर्यंत एकाच वस्तूच्या ठिकाणीं ( आत्मस्वरूपाचे ठिकाणीं ) चित्ताची स्थिरता, तिला ध्यान असें ह्मणतात.

तदन्येषां यथाशक्ति मनोरोधविधायिनाम् ॥
एकद्वित्रिचतुष्पञ्चषडादिक्षणगोचरम् ॥ ६ ॥

अर्थ— तें ध्यान, वर सांगितलेल्या प्रकारच्या साधकांहून भिन्न जे चित्तवृत्तीचा निरोध करणारे दुसरे लोक, त्यांना एक, दोन, तीन, चार, पांच, सहा असे क्षण होईपर्यंत असतें. ह्मणजे वरील श्लोकांत साधकाच्या शरीराचें जें लक्षण सांगितलें आहे तशा प्रकारचें लक्षण ज्यांच्या शरीराचें नाहीं अशा लोकांचें ध्यान अंतर्मुहूर्तकालपर्यंत टिकत नसून तें एक क्षणा-पासून पुढें कांहीं क्षणांपर्यंतच टिकतें.

साधकः साधनं साध्यं फलं चेति चतुष्टयम् ॥
विबोद्धव्यं विधानेन बुधैः सिद्धिं विधित्सुभिः ७

अर्थ— ध्यानाची सिद्धि करावी ह्मणजे यथाशास्त्र ध्यान करावें अशी इच्छा करणाऱ्या विद्वान् लोकांनीं त्या ध्यानासंबं-धानें साधक, साधन, साध्य आणि फल ह्या चार गोष्टींचा चांगला विचार करावा.

संसारी साधको भव्यः साधनं ध्यानमुज्वलम् ॥
निर्वाणं कथ्यते साध्यं फलं सौख्यमनश्वरम् ॥ ८ ॥

अर्थ— संसारी असा भव्य जीव हा साधक होय, शुद्ध असें आत्मस्वरूपाचें ध्यान हें साधन, मोक्ष हें साध्य आणि अविनाशि असें सुख हें फल होय.

आर्तं रौद्रं तथा धर्म्यं शुक्लं चेति चतुष्टयम् ॥
ध्यानं ध्यानवतां मान्यैर्भवनिर्वाणकारणम् ॥ ९ ॥

अर्थ— संसारनाशाला कारण असलेलें ध्यान आर्त, रौद्र, धर्म्य आणि शुक्ल असें चार प्रकारचें आहे; असें ध्यान करणाऱ्या व मान्य असलेल्या मुनींनीं सांगितलें आहे.

संसारकारणं पूर्वं परं निर्वृतिकारणम् ॥
इत्याद्यं द्वितयं त्याज्यमादेयमपरं बुधैः ॥ १० ॥

अर्थ— प्रथमचें दोन प्रकारचें ध्यान संसाराला कारण आहे आणि पुढचें दोन प्रकारचें ध्यान हें मोक्षाचें साधन आहे. ह्मणून पहिलें दोन प्रकारचें ध्यान सोडून द्यावें, आणि पुढील दोन प्रकारचें ग्रहण करावें.

आर्तध्यानाचे भेद.

प्रिययोगाप्रियायोगपीडालक्ष्मीविचिन्तनम् ॥
आर्तं चतुर्विधं ज्ञेयं तिर्यग्गतिनिबन्धनम् ॥ ११ ॥

अर्थ— प्रियवस्तूचा लाभ होणें, अप्रियवस्तूचा लाभ न होणें, रोगादिकांची पीडा आणि लक्ष्मीची इच्छा असे चार विषय निराळे असल्यामुळें आर्तध्यान हें चार प्रकारचें असून तें तिर्यंचगतीचें साधन आहे.

रौद्रध्यानाचे भेद.

रौद्रं हिंसानृतस्तेयभोगरक्षणचिन्तनम् ॥
ज्ञेयं चतुर्विधं शक्तं श्वभ्रभूमिप्रवेशने ॥ १२ ॥

अर्थ— रौद्रध्यान हें— हिंसाचिंतन, खोट्याचें चिंतन,

चौर्याचें चिंतन आणि भोग्यपदार्थांचें चिंतन असें चार प्रकारचें असून तें जीवाला नरकगति देण्याला समर्थ आहे.

धर्म्यध्यानाचे भेद.

**आज्ञापायविपाकानां चिन्तनं लोकसंस्थितेः ॥**
**चतुर्धाऽभिहितं धर्म्यं निमित्तं नाकशर्मणः ॥ १३ ॥**

अर्थ— सर्वज्ञाच्या उपदेशाचें चिंतन, संसारदुःखाच्या नाशाचें चिंतन, कर्मोदयाचें चिंतन आणि त्रैलोक्याच्या आकृतीचें चिंतन अशा भेदानें धर्म्यध्यानहि चार प्रकारचें सांगितलें आहें. हें स्वर्गसुखाचें साधन आहे.

शुक्लध्यानाचे भेद.

**शुक्लं पृथक्त्ववीतर्कवीचारं प्रथमं मतम् ॥**
**जिनैरेकत्ववीतर्कवीचारं च द्वितियिकम् ॥ १४ ॥**
**अन्यत्सूक्ष्मक्रियं तुर्यं समुच्छिन्नक्रियं मतम् ॥**
**इत्थं चतुर्विधं शुक्लं सिद्धिसौधप्रवेशकम् ॥ १५ ॥**

अर्थ— पृथक्त्ववितर्कविचार (अनेकप्रकारच्या श्रुतांतील शब्दांच्या अर्थाचा अनेक अपेक्षांनीं विचार करणें) एकत्ववितर्कविचार (सर्वश्रुताचा एकाच अपेक्षेनें विचार करणें) सूक्ष्मक्रिय (शरीर, वाणी आणि मन ह्या तीन योगांची क्रिया सूक्ष्म करून चिंतन करणें) आणि समुच्छिन्नक्रिय (योगांची क्रिया बंद करून चिंतन करणें) असें चार प्रकारचें शुक्लध्यान आहे; असें श्रीजिनांनीं प्रतिपादन केलें आहे. हें शुक्लध्यान मोक्षरूपी मंदिरांत जीवाचा प्रवेश करून देणारें आहे.

ध्यानाचे अधिकारी.

**आर्तं तनुमतां ध्यानं प्रमत्तान्तगुणाश्रितम् ॥**
**संयतासंयतान्तानां रौद्रं ध्यानं प्रवर्तते ॥ १६ ॥**

अर्थ— जीवांचें जें आर्तध्यान असतें तें सहावें जें प्रमत्त-गुणस्थान त्यापर्यंत असतें. आणि रौद्रध्यान हें संयतासंयत नांवाच्या पांचव्या गुणस्थानापर्यंत असतें.

अनपेतस्य धर्म्यस्य धर्मतो दशभेदतः ।
चतुर्थः पञ्चमः षष्ठः सप्तमश्च प्रवर्तकः ॥ १७ ॥

अर्थ— दशलक्षण अशा धर्मापासून भ्रष्ट न झालेल्या जीवाचें धर्म्यध्यान हें चार, पांच, सहा आणि सात ह्या चार गुणस्थानांत असतें. आतां चवथ्या गुणस्थानापासून पुढें जरी परिणामांची निर्मलता व आत्मध्यानाची आसक्ति अधिकाधिकच वाढत असते, तथापि सातव्या गुणस्थाना-पर्यंत धर्म्यध्यानच समजावें.

समर्थं निर्मलीकर्तुं शुक्लं रत्नशिखास्थिरम् ।
अपूर्वकरणादीनां मुमुक्षूणां प्रवर्तते ॥ १८ ॥

अर्थ— रत्नप्रभेप्रमाणें निश्चल आणि परिणामांची निर्मलता करण्याला समर्थ असें शुक्लध्यान हें अपूर्वकरणादि गुण-स्थानांत असलेल्या मुमुक्षुजीवांच्या ठिकाणीं असतें.

अङ्कायोध्दूयते सर्वं कर्म ध्यानेन सञ्चितम् ॥
वृद्धं समीरणेनेव बलाहककदम्बकम् ॥ १९ ॥

अर्थ— पुष्कळ ढग आकाशांत आले तथापि उलट बाजूनें वहात असलेला वारा त्वरित घालवितो, त्याप्रमाणें शुक्ल-ध्यान हें संचितकर्माला त्वरेनें उडवून देतें.

ध्यानद्वयेन पूर्वेण जन्यन्ते कर्मपर्वताः ॥
वज्रेणेव विभिद्यन्ते परेण सहसा पुनः ॥ २० ॥

अर्थ— पूर्वीच्या दोन ध्यानांच्या योगानें ( आर्त आणि रौद्र ह्या ध्यानांनीं ) कर्मांचे पर्वत उत्पन्न होतात. परंतु,

क्रमाप्रमाणें असलेल्या पुढील दोन ध्यानांनीं त्यांचा क्रम-क्रम नाश केला जातो.

यो ध्यानेन विना मूढः कर्मच्छेदं चिकीर्षति ॥
कुलिशेन विना शैलं स्फुटमेव विभित्सति ॥ २१ ॥

अर्थ— जो अज्ञानी जीव ध्यानांवांचून अर्थात् धर्म्य आणि शुक्ल या ध्यानांवांचून कर्मांचा नाश करण्याची इच्छा करतो, तो वज्रावांचून पर्वत फोडावेत असें इच्छितो, हें स्पष्ट आहे.

ध्यानेन निर्मलेनाशु हन्यते कर्मसञ्चयः ॥
हुताशनकणेनापि प्लुष्यते किं न काननम् ॥ २२ ॥

अर्थ— निर्मल अशा प्रकारचें ध्यान हें कर्मांचा मोठा ढीग जरी असला तथापि त्याचा नाश करतें; यांत आश्चर्य नाहीं. कारण, अग्नीची एक ठिणगी जरी असली तथापि ती सर्व अरण्य जाळीत नाहीं काय?

ध्यानं विधित्सता ज्ञेयं ध्याता ध्येयं विधिः फलम्
विधेयानि प्रसिध्यन्ति सामग्रीतो विना न हि २३

अर्थ— ध्यान करण्याची इच्छा करणाऱ्यानें ध्यान कर-णारा, ध्येय, ध्यानाचा विधि आणि ध्यानाचें फल या चार गोष्टींचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. कारण, योग्य प्रकारची सामग्री असल्यावांचून कर्तव्यांची सिद्धि होत नाहीं.

ध्यान करणाऱ्याचें स्वरूप सांगतात—

निसर्गमार्दवोपेतो निष्कषायो जितेन्द्रियः ॥
निर्ममो निरहङ्कारः पराजितपरीषहः ॥ २४ ॥
हेयोपादेयतत्त्वज्ञो लोकाचारपराङ्मुखः ॥
विरक्तः कामभोगेषु भवभ्रमणभीरुकः ॥ २५ ॥

लाभेऽलाभे सुखे दुःखे शत्रौ मित्रे प्रियेऽप्रिये ॥
मानापमानयोस्तुल्यो मृत्युजीवितयोरपि ॥ २६ ॥
निरालस्यो निरुद्वेगो जितनिद्रो जितासनः ॥
सर्वव्रतकृताभ्यासो सन्तुष्टो निष्परिग्रहः ॥ २७ ॥
सम्यक्त्वालंकृतस्वान्तो रम्यारम्यानिरुत्सुकः ॥
निर्भयो भाक्तिकःशान्तो वीरो वैरागिकोऽशठः२८
निर्निदानो निरापेक्षो विभंक्षुर्देहपञ्जरम् ॥
भव्यः प्रशस्यते ध्याता यियासुः पदमव्ययम् २९

अर्थ— ध्यान करणारा हा स्वभावतः दयालु असावा. त्याच्यामध्यें रागादि कषाय नसावेत. त्यानें इंद्रियें जिंकलेलीं असावींत. त्याचें शरीरावर ममत्व नसावें. त्याला शरीराविषयीं अहंकार (मीपणा) नसावा. त्यानें क्षुधादि परीषह जिंकलेले असावेत. त्याला त्याज्य काय आणि ग्राह्य काय ह्याचें ज्ञान असावें. त्यानें लौकिक आचार सोडलेले असावेत. कामभोगाविषयीं त्याच्या ठिकाणीं वैराग्य असावें. संसारांत भ्रमण करण्याला तो भीत असावा. लाभ, अलाभ, सुख, दुःख, शत्रु, मित्र, प्रियवस्तु, अप्रियवस्तु, मान, अपमान आणि मरणें जगणें ह्यांविषयीं त्याची बुद्धि समान असावी. त्याला आळस नसावा. खेद नसावा. त्यानें निद्रा आणि आसन ह्यांचा जय केलेला असावा. ह्मणजे आसनबंध केल्यावर त्याला झोंप येऊं नये, व हालचाल होऊं नये. त्यानें अहिंसादि सर्व व्रतांचा अभ्यास केलेला असावा. तो संतुष्ट असून परिग्रहरहित असावा. त्याच्या अंतःकरणांत सम्यक्त्व असावें. रमणीय अथवा अरमणीय वस्तु पाहून त्यानें मन उत्सुक होऊं नये.

त्याला भीति नसावी. गुरु आणि अरहंत देव यांच्यावर त्याची भक्ति असावी. तो शांत असून कर्मशत्रूंना जिंकण्याविषयीं वीर असावा. तो विरक्त आणि विद्वान असावा. त्याला निदान नसावें, आणि कशाचीही इच्छा नसावी. आणि अनादिकालापासून आत्म्याला ज्या शरीररूपी पिंजऱ्यांत रहावें लागत आहे, त्या शरीररूपी पिंजऱ्याचा नाश करण्याची इच्छा त्याला असावी. व त्याला अविनाशी अशा मोक्षपदाला जाण्याची इच्छा असावी. असा जो भव्यजीव तोच उत्तम ध्याता ( ध्यान करणारा ) होय.

ध्येयाचे प्रकार.

**ध्येयं पदस्थपिण्डस्थरूपस्थारूपभेदतः ॥**
**ध्यानस्यालम्बनं प्राज्ञैश्चतुर्विधमुदाहृतम् ॥ ३० ॥**

अर्थ— ध्यानांत विषय होणारें जें ध्येय, तें, पदस्थ, पिंडस्थ, रूपस्थ आणि अरूप ( रूपातीत ) असें चार प्रकारचें आहे; असें विद्वानांनीं सांगितलें आहे.

पदस्थध्यान.

**यानि पञ्चनमस्कारपदादीनि मनीषिणा ॥**
**पदस्थं ध्यातुकामेन तानि ध्येयानि तत्त्वतः ॥ ३१ ॥**

अर्थ— पदस्थध्यान करण्याची इच्छा करणाऱ्या बुद्धिमानानें; पंचनमस्कारमंत्राचीं ३५ वगैरे जीं अक्षरें आहेत, त्यांचें ध्यान करावें.

मंत्रविधान.

**मरुत्सखशिखोवर्णो भूतान्तः शशिशेखरः ॥**
**आद्यलघ्वादिको ज्ञात्वा ध्यातुः पापं निषूदने ॥ ३२ ॥**
**स्थितोऽसिआउसामन्त्रश्चतुष्पत्रकुशेशये ॥**

ध्यायमानः प्रयत्नेन कर्मोन्मूलयतेऽखिलम् ॥ ३३ ॥

अर्थ— ॐ ह्रीं हा मंत्र, ध्यान करणाऱ्याच्या सर्व पातकांचा नाश करणारा आहे; हें मनांत आणून चतुष्पत्र कमलाच्या मध्यभागीं म्हणजे कर्णिकेंत 'अ' (अर्हंत) व त्याच्या चार पाकळ्यांमध्यें क्रमानें 'सि (सिद्ध)' 'आ (आचार्य)' 'उ (उपाध्याय)' 'सा (साधु)' हीं अक्षरें लिहून यत्नपूर्वक ध्यान केलें असतां सर्वकर्मांचा समूळ नाश होतो.

तन्नाभौ हृदये वक्त्रे ललाटे मस्तके स्थितम् ॥

गुरुप्रसादतो बुध्वा चिन्तनीयं कुशेशयम् ॥ ३४ ॥

अर्थ— वरील चतुष्पत्र कमल आपल्या नाभि, हृदय, मुख, ललाट आणि मस्तक इतक्या ठिकाणीं आहे असें गुरुप्रसादानें समजून घेऊन त्याचें ध्यान करावें.

अयुर्यो इत्यमी वर्णाः स्थिताः पद्मे चतुर्दले ॥

विश्राणयन्ति पञ्चापि सम्यग्ज्ञानानि चिन्तिताः ३५

अर्थ— अ इ उ ए हे च्यार स्वर वर सांगितलेल्या पद्मामध्यें स्थापन करून त्याचें ध्यान केलें असतां पांच प्रकारचीं (मति, श्रुत, अवधि, मनःपर्यय आणि केवल) ज्ञानें प्राप्त होतात.

स्थितपञ्चनमस्काररत्नत्रयपदैर्दलैः ॥

अष्टभिः कलिते पद्मे सुरकेसरराजिते ॥ ३६ ॥

स्थितोऽर्हमित्ययं मन्त्रो ध्यायमानो विधानतः ॥

ददाति चिन्तितां लक्ष्मीं कल्पवृक्ष इवोर्जिताम् ३७ ॥

अर्थ— पंचनमस्काराचीं पदें आणि रत्नत्रयाचीं पदें क्रमानें अष्टदल कमलांत स्थापन करून मध्यभागीं सोळा केसरांनीं

वेष्टित अशा कर्णिकेमध्यें 'अर्हं' हीं अक्षरें स्थापन करून त्या कमलाचें यथाविधि ध्यान केलें असतां कल्पवृक्षाप्रमाणें इच्छित समृद्धि प्राप्त होते.

हसर्तिकारस्तोमः सोऽहं मध्यस्थितो विगतमूर्छो ॥
पार्श्वेप्रणवचतुष्को ध्येयो त्रिप्रान्तकृतमायः ॥ ३८ ॥

अर्थ— खालीं लिहिल्याप्रमाणें यंत्र लिहून त्याचें ध्यान करावें.

सहस्रा द्वादश प्रोक्ता जपहोमा विचक्षणैः ॥
ओजोग्नेत्यादिमन्त्रस्य तद्भागो दशमः पुनः ॥ ३९ ॥

मन्त्रः ॥ ॐजोग्ने मग्ने तच्चे भूदे भव्वे भविस्सदे
अक्खे पक्खे ( अज्ञे अपज्ञे ) जिणपारसे स्वाहा ४० ॥

अयं मन्त्रः । जपाः १२००० होमाः. १२०० ।

चक्रस्योपरि जाप्येन जातिपुष्पैर्मनोरमैः ॥
विद्या सूचयते सम्यक् स्वप्ने सर्वं शुभाशुभम् ४१ ॥

अर्थ— ओजोग्नेमग्ने इत्यादि मंत्राचा बाराहजार जप करून बाराहजार जाईचीं फुलें ह्या मंत्राच्या चक्रावर अर्पण करावीत. आणि बाराशेहे होम करावा. ह्या मंत्रानें साध्य झालेली विद्या स्वप्नामध्यें पुढें होणाऱ्या शुभाशुभ गोष्टी सांगते.

ओँह्रींकारद्वयान्तस्थो हंकारो रेफभूषितः ॥
ध्यातव्योऽष्टदले पद्मे कल्मषक्षपणाक्षमः ॥ ४२ ॥

अर्थ— सर्व पातकांचा नाश करण्यास समर्थ असा 'ओँ

र्‍हीं हँ' हा मंत्र अष्टदल पद्मांत असलेला ध्यान करावा.

सप्ताक्षरं महामन्त्रमोँर्‍हींकारपदाननम् ॥
विदिग्दलगतं तत्र स्वाहान्तं विनिवेशयेत् ॥ ४३ ॥
दिशि स्वाहान्तमों र्‍हीं र्‍हूँ नमो र्‍हौंर्‍हः पदोत्तमम् ॥
तत्र स्वाहान्तमोँर्‍हींर्‍हँ कर्णिकायां विनिक्षिपेत् ४४ ॥
तत्पद्मं त्रिगुणीभूतं मायाबीजेन वेष्टयेत् ॥
विचिन्तयेच्छुचीभूतः स्वेष्टकृत्यप्रसिद्धये ॥ ४५ ॥
पद्मस्योपरि यत्नेन हेयादेयोपलब्धये ॥
मन्त्रेणानेन कर्तव्यो जपः पूर्वविधानतः ॥ ४६ ॥

ॐ र्‍हीं णमो अरहंताणं नमः ॥ इति मूलमंत्रो जाप्य १०००० । होमाः १००० ॥

अर्थ— त्या मकळाच्या चार दलांत 'ॐ र्‍हीं णमो अरहंताणं स्वाहा' ह्या मंत्राची स्थापना करावी. आणि पूर्वेकडील दलांत ॐ र्‍हीं णमो अरहंताणं स्वाहा, दक्षिणेकडे ॐ र्‍हूँ णमो अरहंताणं स्वाहा, पश्चिमेकडे ॐ र्‍हौं णमो अरहंताणं स्वाहा आणि उत्तरेकडे ॐ र्‍हः णमो अरहंताणं स्वाहा हे चार मंत्र स्थापन करावेत. आणि कमलाच्या कर्णिकेत ॐ र्‍हीं र्‍हँ स्वाहा ह्या मंत्राची स्थापना करावी. ह्या चक्राच्या सभोंवतीं र्‍हीं कारानें चक्राकार तीन वेष्टनें करावींत. मग शुद्ध होऊन आपल्या इष्ट सिद्धीकरितां त्या पद्माचें चिंतन करावें. त्याच कमलावर दृष्टि ठेवून 'ॐ र्‍हीं णमो अरहंताणं र्‍हं नमः' ह्या मूलमंत्राचा दहा हजार जप करावा. आणि एक हजार होम करावेत.

सव्येनाप्रतिचक्रेण फडिति प्रत्येकमक्षरम् ॥
कोणषट्के विचक्राय स्वाहा बाह्येऽपसव्यतः ॥४७॥

**निवेश्य विधिना दक्षो मध्ये तस्य निवेशयेत् ॥**
**भूतान्तं बिन्दुसंयुक्तं चिन्तयेच्च विशुद्धधीः ॥४८॥**
**विधाय वलयं बाह्ये तस्य मध्ये विधानतः ॥**
**णमो जिणाणमित्याद्यैः पूरयेत्प्रणवादिकैः ॥ ४९ ॥**

ॐ णमो जिणाणं । ॐ णमो परमोहिजिणाणं । ॐ णमो सव्वोहिजिणाणं । ॐ णमो समत्तोहिजिणाणं । ॐ णमो कोट्ठबुद्धीणं । ॐ णमो बीजबुद्धीणं । ॐ णमो पदानुसारिणं । ॐ णमो संभिन्नसोदराणं । ॐ णमो उज्जमदीणं । ॐ अमो विउळमदीणं । ॐ णमो दसपुव्वीणं । ॐ णमो चोद्दसपुव्वीणं । ॐ णमो अट्ठंगमहाणिमित्तकुसलाणं । ॐ णमो विग्गुव्वणइड्ढिपत्ताणं । ॐ णमो चारणाणं । ॐ णमो पण्णसमणाणं । ॐ णमो आयासगामिणं । ॐ झ्रौं श्रीह्रीधृतिकीर्तिबुद्धिलक्ष्मीः स्वाहा । इति पदैर्वलयं प्रपूरयेत् । पञ्चनमस्कारेण पञ्चाङ्गुलिन्यस्तेन सकलीक्रियते ।

ॐ णमो अरहंताणं ह्राँ स्वाहा अंगुष्ठे । ॐ णमो सव्वसिद्धाणं ह्रीं स्वाहा तर्जन्याम् । ॐ णमो आयरियाणं ह्रूं स्वाहा मध्यमायाम् । ॐ णमो उवज्झायाणं ह्रौं स्वाहा अनामिकायाम् । ॐ णमो लोये सव्वसाहूणं ह्रः स्वाहा कनिष्ठिकायाम् । एवं वारत्रयमंगुलिषु विन्यस्य मस्तकस्योपरि पूर्वदक्षिणपश्चिमोत्तरेषु भागेषु विन्यस्य जपं कुर्यात् ॥

**अभिधेया नमस्कारपदैर्ये परमेष्ठिनः ॥**
**पदस्थास्ते विधीयन्ते शब्देऽर्थस्य व्यवस्थिते ५० ॥**

अर्थ— पंचनमस्कारपदांनीं— ह्मणजे 'णमो अरहंताणं' इत्यादि शब्दांनीं ज्या परमेष्ठींचें कथन केलें जातें, ते पदस्थ परमेष्ठी होत. कारण, शब्दांत अर्थ असतो. तात्पर्य— शब्द

ह्या अर्थाचें ज्ञान करून देणारा असल्यामुळें शब्दांतच अर्थाचें अस्तित्व मानणें अवश्य आहे. कारण, जर शब्दांत अर्थ नसतां तर शब्दानें अर्थाचा बोध झाला नसता. ह्मणून अर्थाचें अस्तित्व शब्दांतहि आहे. तेव्हां 'णमो अरहंताणं' इत्यादि जे पंचपरमेष्ठींचे वाचक शब्द आहेत, त्यांत अर्हत् वगैरे पंचपरमेष्ठींचें अस्तित्व आहे; असें सिद्ध होतें. ह्याच शब्दरूप परमेष्ठींना पदस्थपरमेष्ठी असें समजावें.

पिंडस्थध्यानाचा प्रकार.

अनन्तदर्शनज्ञानसुखवीर्यैरलंकृतम् ॥
प्रातिहार्याष्टकोपेतं नरामरनमस्कृतम् ॥ ५१ ॥
शुद्धस्फटिकसंकाशशरीरमुरुतेजसम् ॥
घातिकर्मक्षयोत्पन्ननवकेवललब्धिकम् ॥ ५२ ॥
विचित्रातिशयाधारं लब्धकल्याणपञ्चकम् ॥
स्थिरधीः साधुरर्हन्तं ध्यायेतैकाग्रमानसः ॥ ५३ ॥
पिण्डस्थो ध्यायते यत्र जिनेन्द्रो हतकल्मषः ॥
तत्पिण्डपञ्चकध्वंसि पिण्डस्थध्यानमिष्यते ॥५४॥

अर्थ— अनंतदर्शन, अनंतज्ञान, अनंतसुख, अनंतवीर्य ह्या अनंतचतुष्टयानें युक्त; अष्टप्रातिहार्यांनीं सम्पन्न; मनुष्य आणि देव ज्याला नमस्कार करीत आहेत; ज्याचें शरीर शुद्ध स्फटिकाप्रमाणें आहे व ज्याचें तेज फार मोठें आहे; घातिकर्मांचा क्षय झाल्यामुळें ज्याला नऊ केवललब्धि प्राप्त झाल्या आहेत, जो आश्चर्यकारक अशा अतिशयांना आधारभूत झाला आहे, ज्याचे पंचकल्याणमहोत्सव झाले आहेत असा जो अर्हत्प्रभु त्याचें सज्जनानें स्थिर बुद्धि करून एकाग्र मनानें ध्यान करावें. ज्या ध्यनांत निष्पाप असा श्रीजिनेंद्र शरीरस्थ

मानून ध्यान केला जातो तें पिंडस्थध्यान होय. तें ध्यान जीवाला प्राप्त होणारे जे पांच पिंड ह्मणजे औदारिकादि पांच देह, त्यांचा नाश करणारें आहे.

रूपस्थध्यान.

**प्रतिमायां समारोप्य स्वरूपं परमेष्ठिनः ॥**
**ध्यायतः शुद्धचित्तस्य रूपस्थं ध्यानमिष्यते ॥ ५५ ॥**

अर्थ— परमेष्ठीच्या रूपाचा प्रतिमेवर आरोप करून ( ह्मणजे ह्या प्रतिमेंत परमेष्ठी आहे अशी कल्पना करून ) शुद्धचित्त असा उपासक जें ध्यान करतो, तें रूपस्थध्यान होय.

**सिद्धरूपं विमोक्षाय निरस्ताशेषकल्मषम् ॥**
**जिनरूपमिव ध्येयं स्फाटिकं प्रतिबिम्बितम् ॥ ५६ ॥**

अर्थ— स्फटिकाच्या प्रतिमेमध्यें प्रतिबिंबित असलेलें अर्हत्परमेष्ठीचें स्वरूप जसें ध्यान करण्याला योग्य आहे, तसेंच संपूर्ण पातकापासून मुक्त झालेलें असें सिद्धपरमेष्ठीचें स्वरूपहि मोक्षाची प्राप्ति होण्याकरितां ध्यान करण्याला योग्य आहे. तात्पर्य- अर्हत्परमेष्ठीप्रमाणेंच सिद्धपरमेष्ठीचीहि स्फटिकाच्या प्रतिमेमध्यें कल्पना करून त्याचें ध्यान करावें.

अरूपध्यानाचा प्रकार.

**अरूपं ध्यायते ज्ञानं परं संवेदनात्मकम् ॥**
**सिद्धरूपस्य लाभाय नीरूपस्य निरेनसः ॥ ५७ ॥**

अर्थ— निराकार आणि निष्पाप अशा सिद्धस्वरूपाची प्राप्ति होण्याकरितां ह्मणजे आपण सिद्धात्मा होण्याकरितां जें केवल संवेदनास्वरूप असलेल्या ज्ञानाचें ध्यान केलें जातें, तें अरूपध्यान होय.

परात्मध्यानाचा प्रकार.

**बहिरन्तः परश्चेति त्रिधाऽऽत्मा परिकीर्तितः ॥**
**प्रथमं द्वितयं हित्वा परात्मानं विचिन्तयेत् ॥ ५८ ॥**

अर्थ— बहिरात्मा, अंतरात्मा आणि परात्मा अशा भेदानें आत्मा तीन प्रकारचा सांगितला आहे. त्यांतील पहिल्या दोन आत्म्यांचा त्याग करून परमात्म्याचें चिंतन करावें.

**बहिरात्माऽऽत्मविभ्रान्तिः शरीरे मुग्धचेतसः ॥**
**या चेतस्यात्मविभ्रान्तिः सोऽन्तरात्माऽभिधीयते ५९**

अर्थ— मूढबुद्धीच्या जीवाला शरीराच्या ठिकाणीं आत्म्याची ( मी पणाची ) जी भ्रांति झाली आहे तो बहिरात्मा होय. आणि मनाच्या ठिकाणीं जी 'आत्मा' अशी ( मीपणाची ) भ्रांति, त्याला अंतरात्मा ह्मणतात.

बहिरात्म्याचें विशेषस्वरूप.

**श्यामो गौरः कृशः स्थूलः काणः कुण्ठोऽबलो बली ॥**
**वनिता पुरुषः षण्ढो विरूपो रूपवानहम् ॥ ६० ॥**
**जातदेहात्मविभ्रान्तिरेषा भवति कल्पना ॥**
**विवेकं पश्यतः पुंसो न पुनर्देहदेहिनोः ॥ ६१ ॥**

अर्थ— ज्याला देहाच्या ठिकाणीं 'आत्मा' अशी भ्रांति झाली असेल त्याची—मी काळा आहे, मी गोरा आहे, मी कृश आहे, स्थूल आहे, काणा आहे, मद्‌ड आहे, मी दुर्बल आहे, मी बलवान् आहे, मी स्त्री आहे, मी पुरुष आहे, मी नपुंसक आहे, मी कुरूप आहे, मी सुंदर आहे—अशा प्रकारची कल्पना होते. आणि देह व आत्मा ह्यांचा भेद ज्याला समजला त्या पुरुषाला अशी वरीलप्रमाणें कल्पना होत नाहीं.

**शत्रुमित्रपितृभ्रातृमातृकान्तासुतादयः ॥**
**देहसम्बन्धतः सन्ति न जीवस्य निसर्गजाः ॥ ६२ ॥**

अर्थ— शत्रु, मित्र, पिता, बंधु, माता, पत्नी, पुत्र वगैरे सर्व देहाच्या संबंधामुळें आहेत. स्वभावतः जीवाचा संबंध ह्यांच्याशीं कांहीं नाहीं.

**श्वाभ्रस्तिर्यङ्नरो देवो भवामीतिविकल्पना ॥**
**श्वभ्रतिर्यङ्नृवेषाङ्गलिङ्गतो न स्वभावतः ॥ ६३ ॥**

अर्थ— मी नारकी आहें, मी तिर्यंच आहें, मी मनुष्य आहें, मी देव आहें ह्याप्रमाणें जीवाला होत असलेली कल्पना— नारकीशरीर, तिर्यंचशरीर, मनुष्यशरीर व देवशरीर ह्यांच्या समागमामुळेंच—होत असते. स्वभावतः त्याला कोणतीच कल्पना करता येत नाहीं.

**बालकोऽहं कुमारोऽहं तरुणोऽहमहं जरी ॥**
**एता देहपरीणामजनिताः सन्ति कल्पनाः ॥ ६४ ॥**

अर्थ— मी बालक आहें, मी कुमार आहें, मी तरुण आहें, मी वृद्ध आहें, ह्या कल्पना शरीराच्या त्या त्या परिणामामुळें जीवाला होतात.

अंतरात्म्याचें विशेष स्वरूप.

**विदग्धः पण्डितो मूर्खो दरिद्रः सधनोऽधनः ॥**
**कोपनोऽसूयको मूढो द्विष्टस्तुष्टोऽशठः शठः ॥ ६५ ॥**
**सज्जनो दुर्जनो दीनो लुब्धो मत्तोऽपमानितः ॥**
**जातचित्तात्मविभ्रान्तेरेषा भवति शेमुषी ॥ ६६ ॥**

अर्थ— ज्याला 'मन हाच आत्मा होय' अशी भ्रांति झाली असेल, त्याला मी चतुर, मी पंडित, मी मूर्ख, मी दरिद्री, मी धनवान, मी निर्धन, मी रागीट, मी ईर्षा करणारा, मी अविचारी, मी द्वेषी, मी आनंदी, मी ज्ञानी, मी अज्ञानी, मी सज्जन, मी दुर्जन, मी दीन, मी लोभी, मी प्रमादी, मी

लोकांनीं अपमान केलेला इत्यादि प्रकारची बुद्धि होते. ह्मणजे मनाचे जे स्वभाव तेच त्याला आपले असे वाटूं लागतात.

मिथ्याज्ञान आणि सम्यग्ज्ञान ह्यांचें फल.

**देहे याऽऽत्ममतिर्जन्तोः संवर्द्धयति संसृतिम् ॥**
**आत्मन्यात्ममतिर्या सा सद्यो नयति निर्वृतिम् ॥ ६७ ॥**

अर्थ— जीवाला जी देहाच्या ठिकाणीं 'मी' अशी बुद्धि झालेली आहे ती त्याचा संसार ( जन्ममरणांचे फेरे ) वाढविते; आणि वास्तविक आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं जी 'मी' अशी बुद्धि, ती तत्काल त्याला मुक्त करते.

**यो जागर्त्यात्मनः कार्ये कायकार्ये समश्नति ॥**
**यः स्वपित्यात्मनः कार्ये कायकार्यं करोति सः ॥ ६८ ॥**

अर्थ— जो पुरुष आत्म्याचें कार्य करण्याविषयीं ( आत्म्याला मोक्षप्राप्ति करून देण्याविषयीं ) तत्पर असतो तो शरीराचें कार्य ( विषयोपभोग ) करीत नाहीं. आणि जो आत्म्याचें कार्य करण्याबद्दल उपेक्षा करतो, तो शरीराचें कार्यच करीत असतो.

**ममेदमहमस्यास्मि स्वामी देहादिवस्तुनः ॥**
**यावदेषा मतिर्बाह्ये तावत् ध्यानं कुतस्तनम् ॥ ६९ ॥**

अर्थ— ह्या देहादिक वस्तु माझ्या असून मी ह्यांचा भोक्ता ( मालक ) आहें; अशा प्रकारची बाह्य वस्तूविषयीं जोंपर्यंत बुद्धि आहे, तोंपर्यंत ध्यान कोठून होणार? मुळींच व्हावयाचें नाहीं.

**नाहं कस्यापि मे कश्चिन्न भावोऽस्ति बहिस्तनः ॥**
**यदैषा शेमुषी साधोः शुद्धध्यानं तदा मतम् ॥ ७० ॥**

अर्थ— ह्या बाह्य वस्तूंचा मी कोणी नव्हे, व त्या बाह्यवस्तूहि माझ्या कोणी नव्हत; अशी बुद्धि ज्यावेळीं ह्या ध्यान

करण्यास प्रवृत्त झालेल्या सज्जनाची होईल; त्या वेळींच त्याला शुद्धध्यान सिद्ध होईल.

रागद्वेषमदक्रोधलोभमन्मथमत्सराः ॥
न यस्य मानसे सन्ति तस्य ध्यानेऽस्ति योग्यता ॥ ७१ ॥

अर्थ— राग, द्वेष, मद, क्रोध, लोभ, काम आणि मत्सर हे विकार ज्याच्या मनांत नसतील त्याला ध्यान करण्याची योग्यता आहे. दुसऱ्याला नाहीं.

रागद्वेषादिभिः क्षिप्रं मनःस्थैर्यं प्रचाल्यते ॥
कांचनस्येव काठिन्यं दीप्यमानैर्हुताशनैः ॥ ७२ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें प्रदीप्त झालेला अग्नि सुवर्णाचा कठिणपणा तत्काल नाहींसा करतो, त्याप्रमाणें रागद्वेषादि कषाय मनाचा स्थिरपणा तत्काल नाहींसा करतात.

विद्यमाने कषायेऽस्ति मनसः स्थिरता कथम् ॥
कल्पान्तपवनैः स्थैर्यं तृणं कुत्र प्रपद्यते ॥ ७३

अर्थ— रागादिकषाय जोंपर्यंत जागरूक आहेत तोंपर्यंत मनाला स्थिरता कशी असणार? असें पहा कीं, कल्पांत होण्याच्या वेळच्या वाऱ्याच्या योगानें गवत कोठेंतरी निश्चलपणाला प्राप्त होईल काय?

परमात्मध्यानाचें फल.

अक्षय्यकेवलालोकविलोकितचराचरम् ॥
अनन्तवीर्यशर्माणममूर्तमनुपद्रवम् ॥ ७४ ॥
निरस्तकर्मसम्बन्धं सूक्ष्मं नित्यं निरास्रवम् ॥
ध्यायतः परमात्मानमात्मनः कर्मनिर्जरा ॥ ७५ ॥

अर्थ— अविनाशी अशा केवलज्ञानरूपी प्रकाशानें ज्याला चराचराचें प्रत्यक्षज्ञान होत आहे, जो अनंतवीर्य व अनंतसुख

ह्यांनीं युक्त असून ज्याला रंगरूप नाहीं व ज्याला रोगादि-कांची पीडाहि नाहीं असा आहे; ज्यानें कर्मबंध दूर फेंकून दिलेला असून जो सूक्ष्म, नित्य आणि पापपुण्यांच्या आस्रवांनीं रहित असा आहे अशा प्रकारच्या परमात्मस्वरूपाचें ध्यान करणाऱ्याची कर्मनिर्जरा होते.

**आत्मानमात्मना ध्यायन्नात्मा भवति निर्वृतः ॥**
**घर्षयन्नात्मनाऽऽत्मानं पावकी भवति द्रुमः ॥ ७६ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें आपल्या योगानें आपल्याला घांसणारा वृक्ष अग्निरूप बनतो, त्याप्रमाणें आपल्या योगानें आपलेंच ध्यान करणारा आत्मा सुखस्वरूप होतो.

**न यो विविक्तमात्मानं देहादिभ्यो विलोकते ॥**
**स मज्जति भवाम्भोधौ लिंगस्थोऽपि दुरुत्तरे ॥ ७७ ॥**

अर्थ— जो पुरुष 'आत्मा हा देहादिकांहून निराळा आहे' असें जाणतो, तो पुरुष मुनिचिन्ह धारण करणारा असा जरी असला तथापि तरून जाण्याला कठीण अशा संसारसमुद्रांत बुडतो.

**सविज्ञानमविज्ञानं विनश्वरमनश्वरम् ॥**
**सदाऽनात्मीयमात्मीयं सुखदं दुःखकारणम् ॥ ७८ ॥**
**अनेकमेकमंगादि मन्यमानो निरस्तधीः ॥**
**जन्ममृत्युजरावर्ते बम्भ्रमीति भवोदधौ ॥ ७९ ॥**

अर्थ— जो पुरुष बुद्धिहीन असल्यामुळें शरीरादिकांना तीं वस्तुतः अज्ञानी असून त्यांना ज्ञानवान् समजतो; तीं नाशवत असून त्यांना अनश्वर मानतो, तीं आत्मीय (आपलीं) नसून त्यांना आत्मीय समजतो, तीं दुःख देणारीं असून त्यांना सुखद मानतो, तो पुरुष जन्ममृत्यूच्या भोंवऱ्यानें युक्त असलेल्या ह्या

संसारसमुद्रांत चिरकाल भ्रमण करतो.

**आत्मनो देहतोऽन्यत्वं चिन्तनीयं मनीषिणा ॥**
**शरीरभावमोक्षाय सायकस्येव कोशतः ॥ ८० ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें भात्यांत असलेल्या बाणाचा भात्याहून भिन्नपणा आहे, त्याप्रमाणें आत्म्यालाहि शरीराहून भिन्नपणा आहे असें चिंतन, बुद्धिमान् पुरुषानें शरीराच्या ठिकाणीं झालेली आत्मभावना सुटावी ह्याकरितां करावें.

**या देहात्मैकताबुद्धिः सा मज्जयति संसृतौ ॥**
**सा प्रापयति निर्वाणं या देहात्मविभेदधीः ॥ ८१ ॥**

अर्थ— शरीर आणि आत्मा एक आहे अशी जी समजूत ती जीवाला संसारांत पाडते. आणि ते दोन निरानिराळे आहेत अशी समजूत, ती ह्या जीवाला संसारांतून सोडविते.

**यः शरीरात्मनोरैक्यं सर्वथा प्रतिपद्यते ॥**
**पृथक्त्वशेमुषी तस्य गूथमाणिक्ययोः कथम् ॥ ८२ ॥**

अर्थ— जो पुरुष शरीर व आत्मा ह्यांचें सर्वथा ऐक्य आहे असें मानतो, त्याला विष्ठा आणि माणिक ह्या दोहोंविषयीं भेदबुद्धि ( निराळेपणाची समजूत ) कां बरें होते.

**देहचेतनयोर्भेदो भिन्नज्ञानोपलब्धितः ॥**
**सर्वदा विदुषा ज्ञेयश्चक्षुर्घ्राणार्थयोरिव ॥ ८२ ॥**

अर्थ— ज्याप्रमाणें नेत्रेंद्रियाच्या योगानें होणारें विषयाचें ज्ञान निराळें आहे, आणि घ्राणेंद्रियानें होणारे विषयाचें ज्ञान निराळें आहे; त्याप्रमाणें शरीराचें ज्ञान निराळें, आणि आत्म्याचें निराळें आहे. कारण, शरीराचें ज्ञान नेत्रेंद्रियानें होत असून आत्मा मात्र नेत्रानें पहातां येत नाहीं; म्हणुन शरीरज्ञान

आणि आत्मज्ञान हीं दोन ज्ञानें निराळीं अर्थात् निरनिराळ्या जातीचीं आहेत असें होतें. ह्याप्रमाणें जीं ज्ञानें निरनिराळीं आहेत, त्या ज्ञानांतील विषयहि निराळे ह्मणजे भिन्नजातीचेच असणें योग्य आहे. ह्यावरून नेत्रेंद्रियांना विषय होणाऱ्या शरीराची जाती निराळी, व नेत्रेंद्रियाला विषय न होणाऱ्या आत्म्याची जाती निराळी हें सिद्ध होतें. अर्थात् शरीर व आत्मा ह्या दोन वस्तु एक नसून विजातीय ह्मणजे एकमेकाहून अगदीं भिन्न आहेत हें सिद्ध होतें. अशा रीतीनें विद्वान् मनुष्यानें आत्मा आणि शरीर ह्यांचा भेद जाणावा.

**न यस्य हानितो हानिर्न वृद्धिर्वृद्धितो भवेत् ॥**
**जीवस्य सह देहेन तेनैकत्वं कुतस्तनम् ॥ ८३ ॥**

अर्थ— ज्याच्या नाशामुळें जीवाचा नाश होत नाहीं आणि ज्याच्या वृद्धीमुळें जीवाची वृद्धीहि होत नाहीं अशा शरीराशीं जीवाचें ऐक्य कसें बरें संभवेल?

**तत्त्वतः सह देहेन यत्र नानात्वमात्मनः ॥**
**किं देहयोगजैस्तस्य सहैकत्वं सुतादिभिः ॥ ८४ ॥**

अर्थ— आत्म्याचा शरीराशीं असलेला जो भिन्नपणा तो जर वास्तविक आहे, तर मग शरीराच्या संबंधामुळेंच उत्पन्न झालेल्या पुत्रादिकांशीं त्याचें ( आत्म्याचें ) ऐक्य कसें असणार?

**ममत्वधिषणा येषां पुत्रमित्रादिगोचरा ॥**
**साऽऽत्मरूपपरिच्छेदच्छेदिनी मोहकल्पिता ॥ ८५ ॥**

अर्थ— ज्यांना पुत्र, मित्र वगैरेविषयीं आपलेपणाची बुद्धि असेल; ती त्यांची बुद्धि, आत्मस्वरूपाचा जो देहादिकापासून वास्तविक जो निराळेपणा आहे, त्याचा नाश

असल्यामुळें मोहनीयकर्मोदयापासून उत्पन्न झाली आहे असें समजावें.

**पत्तनं काननं सौधमेषाऽनात्मधियां मतिः ॥**
**निवासो दृष्टतत्त्वानामात्मैवास्त्यव्ययोऽमलः ॥ ८६ ॥**

**अर्थ**— आत्म्याच्या स्वरूपाचें ज्ञान ज्यांना नाहीं त्यांना आपलें राहण्याचें ठिकाण नगर, अरण्य किंवा घर आहे असें वाटत असतें. परंतु ज्यांनीं आत्मस्वरूप ओळखलें आहे, त्यांना अविनाशी आणि निर्मल असा आत्मा हाच आपलें रहाण्याचें स्थान आहे असें वाटतें.

**शुद्धस्य जीवस्य निरस्तमूर्तेः ।**
**सर्वे विकाराः परिकर्मजन्याः ॥**
**मेघादिजन्या इव निरभ्रवृभे- ।**
**विनश्वराः सन्ति विभास्वरस्य ॥ ८७ ॥**

**अर्थ**— ज्याप्रमाणें स्वयंप्रकाश अशा सूर्याचें बिंब न दिसणें, मलिन बिंब दिसणें वगैरे विकार मेघादिकांपासून उत्पन्न झालेले असून नाशवंत आहेत त्याप्रमाणेंच शुद्ध आणि अमूर्तिक अशा जीवाचे सर्व विकार ( अनेकप्रकारचे भ्रम ) कर्मापासून उत्पन्न झालेले असून ते विनाशी आहेत.

**दृष्टात्मतत्त्वो द्रविणादिलक्ष्मीं ।**
**न मन्यते कर्मभवां स्वकीयाम् ॥**
**विपक्षलक्ष्मीं भुवने विवेकी ।**
**प्रपद्यते चेनाम्मि कः स्वकीयाम् ॥ ८८ ॥**

**अर्थ**— ज्याला आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें आहे तो पुरुष कर्मामुळें प्राप्त झालेल्या धनधान्यादि संपत्तीला आपली असें मानीत नाहीं. बरोबरच आहे. कारण, या जगांत कोणता

विचारी पुरुष शत्रूची संपत्ति आपली आहे असें मनांत मानील बरें? कोणीही मानणार नाहीं.

ज्ञानदर्शनमयं निरामयं ।
मृत्युजन्मभवविकारवर्जितम् ॥
आमनन्ति सुधियोऽत्र चेतनं ।
सूक्ष्ममव्ययमपास्तकल्मषम् ॥ ८९ ॥

अर्थ— विद्वान लोक ह्या चेतन अशा आत्म्याला ज्ञानदर्शन-स्वरूप, रोगादिकांच्या उपद्रवानें रहित, मरणें आणि उत्पन्न होणें हे जे संसारसंबंधी विकार त्यांनीं वर्जित, सूक्ष्म, अविनाशी आणि निष्पाप असा मानतात.

विग्रहं क्रिमिनिकायसङ्कुलं ।
दुःखदं हृदि विवेचयन्ति ये ॥
गुप्तिबद्धमिव ते सचेतनं ।
मोचयन्ति तनुयन्त्रयन्त्रितम् ॥ ९० ॥

अर्थ— शरीर हें अनेक किड्यांच्या घरांनीं भरलेलें व आत्म्याला दुःख देणारें आहे, असा विचार मनांत जे पुरुष करतात; ते शरीररूपी यंत्रांत जखडून गेलेल्या आत्म्याला गुप्त बांधून ठेवलेल्या रत्नाप्रमाणें त्या यंत्रांतून सोडवितात.

स्थित्वा प्रदेशे विगतोपसर्गे ।
पर्यङ्कबन्धस्थितपाणिपद्मः ॥
नासाग्रसंस्थापितदृष्टिपातो ।
मन्दीकृतोच्छ्वासविवृद्धवेगः ॥ ९१ ॥
विधाय वश्यं चपलस्वभावं ।
मनो मनीषी विजिताक्षवृत्तिः ॥
विमुक्तये ध्यायति नष्टदोषं ।

विविक्तमात्मानमनन्यचित्तः ॥ ९२ ॥

अर्थ— ज्ञानी पुरुष उपसर्गांनीं रहित अशा प्रदेशांत पर्यंकासनावर आपलीं करकमलें ठेवून बसतो. आणि नासिकेच्या अग्राकडे दृष्टि लावून वाढलेला श्वासोच्छ्वासांचा वेग मंद करून स्वभावतःच चंचल असलेलें मन आपल्या ताब्यांत घेऊन बाह्येंद्रियांचे व्यापार बंद करतो. मग एकाग्र मन करून मुक्ति प्राप्त होण्याकरितां रागादि कषायापासून निराळ्या व निर्दोष अशा आत्मस्वरूपाचें ध्यान करतो.

अभ्यस्यतो ध्यानमनन्यवृत्ते- ।
रित्थं विधानेन निरन्तरायम् ॥
व्यपैति पापं भवकोटिबद्धं ।
महाशमस्येव कषायजालम् ॥ ९३ ॥

अर्थ— ह्याप्रमाणें वर सांगितलेल्या विधीनें निर्विघ्नपणें एकाग्रचित्तानें ध्यानाचा अभ्यास करणाऱ्या पुरुषाचें कोट्यवधि भवांत बांधलेलें पाप ज्याप्रमाणें उपशम प्राप्त झालेल्या पुरुषाचे कषाय नष्ट होतात—त्याप्रमाणें नष्ट होतें.

ध्यानं पटिष्ठेन विधीयमानं ।
कर्माणि भस्मीकुरुते विशुद्धम् ॥
किं प्रेर्यमाणः पवनेन नाग्नि- ।
श्चितानि सद्यो दहतीन्धनानि ॥ ९४ ॥

अर्थ— ज्ञानी पुरुषानें ह्या प्रकारें केलेलें शुद्ध ध्यान त्याच्या कर्मांना भस्म करतें; ह्यांत आश्चर्य नाहीं. कारण, वायूनें भडकविलेला अग्नि एके ठिकाणीं गोळा केलेलीं लांकडें तेव्हांच जाळीत नाहीं काय?

त्यागेन हीनस्यकुतोऽस्ति कीर्तिः ।

सत्येन हीनस्य कुतोऽस्ति पूजा ॥
न्यायेन हीनस्य कुतोऽस्ति लक्ष्मी- ।
ध्यानेन हीनस्य कुतोऽस्ति सिद्धिः ॥ ९५ ॥

अर्थ— जो दान करीत नाहीं त्याची कीर्ति कोठून असणार? जो सत्य बोलत नाहीं त्याची मान्यता कोठून असणार? जो न्यायानें वागत नाहीं त्याला संपत्ति कशी मिळेल? आणि जो ध्यान करीत नाहीं त्याला मोक्ष कोठून प्राप्त होणार?

तपांसि रौद्राण्यनिशं विधत्तां ।
शास्त्राण्यधीतामखिलानि नित्यम् ॥
धत्तां चरित्राणि निरस्ततन्द्रो ।
न सिध्यति ध्यानमृते तथापि ॥ ९६ ॥

अर्थ— कोणीहि पुरुष घोर तप रात्रंदिवस करो, सर्व शास्त्रांचें निरंतर अध्ययन करो, आळस न करतां सर्व चारित्र पाळो, तथापि ध्यानावांचून त्याला मोक्षप्राप्ति व्हावयाची नाहीं.

ध्यानं यदह्नाय ददाति सिद्धिं ।
न तस्य खेदः परशर्मदाने ॥
क्षयानलं हन्ति यदभ्रवृन्दं ।
न तस्य खेदः परवह्निघाते ॥ ९७ ॥

अर्थ— जें ध्यान त्वरेनें मोक्षपदाची (अनंतसुखाची) प्राप्ति करून देतें, त्याला अन्य सुखांची (अहमिंद्रादिपदांची) प्राप्ति करून देण्यांत मुळींच आयास नाहीं. कारण, जो मेघसमूह कल्पांतकाळच्या अग्नीला देखील विझवितो त्याला एरवीं पेटलेला वणवा विझविण्यांत श्रम होत नाहीं.

तपोऽन्तरानन्तरभेदभिन्ने ।
तपोविधाने द्विविधे कदाचित् ॥

**समस्तकर्मक्षपणे समर्थं ।**
**ध्यानेन शुद्धेन समं न दृष्टम् ॥ ९८ ॥**

अर्थ— अंतरंग आणि बहिरंग अशा दोन्ही प्रकारच्या तपामध्यें सर्व कर्मांचा क्षय करण्याला समर्थ असें शुद्ध ध्याना-सारखें दुसरें तप केव्हांहि दृष्टीं पडत नाहीं.

**ध्यानस्य दृष्ट्वेति फलं विशालं ।**
**मुमुक्षुणाऽऽलस्यमपास्य कार्यम् ॥**
**कार्ये प्रमाद्यन्ति न शक्तिमन्तो ।**
**विलोकमानाः फलभूरिलाभम् ॥ ९९ ॥**

अर्थ— ह्याप्रमाणें ध्यानाचें विशाल फल अवलोकन करून मुमुक्षु जीवानें आळस टाकून ध्यान करावें. समर्थ पुरुष मोठ्या फलांची प्राप्ति होत असलेली अवलोकन करून आपल्या कामांत चुकी होऊं देत नाहींत.

**तपोविधानैर्बहुजन्मलक्षै- ।**
**र्यो दह्यते सञ्चितकर्मराशिः ॥**
**क्षणेन स ध्यानहुताशनेन ।**
**प्रवर्तमानेन विनिर्मलेन ॥ १०० ॥**

अर्थ— अनेक प्रकारचीं तपें जो कर्मांचा समुदाय अनेक लक्ष वेळां जन्म घेतल्यानें नष्ट करतात; तोच कर्मसमूह शुद्धध्यानरूपी अग्नि तेव्हांच जाळून टाकतो.

**निर्वाणहेतौ भवपातभीतै- ।**
**र्ध्याने प्रयत्नः परमो विधेयः ॥**
**यियासुभिर्मुक्तिपुरीमबाधा- ।**
**मुपायहीना न हि साध्यसिद्धिः ॥ १ ॥**

अर्थ— जन्ममरणरूपी संसारांत पडण्यास भिणाऱ्या व

अविनाशी अशा मोक्षपुरीला जाण्याची इच्छा करणाऱ्या जीवांनीं ध्यान करण्यांत फार प्रयत्न करावा. कारण, उपायावांचून इष्ट फलाची प्राप्ति होत नाहीं.

देहात्मनोरात्मवता वियोगो ।
मनः स्थिरीकृत्य तथा विचिन्त्यः ॥
हेतुर्भवानर्थपरम्परायाः ।
स्वप्नेऽपि योगो न यथाऽस्ति भूयः ॥ २ ॥

अर्थ— विचारी पुरुषानें मन स्थिर करून शरीर आणि आत्मा यांच्या भिन्नपणाचें चिंतन अशाप्रकारें करावें ; कीं ज्यायोगानें संसाररूपी अनर्थपरंपरेला कारणभूत असलेला त्यांचा ( शरीर आणि आत्म्यांचा ) एकपणा पुनः स्वप्नांत सुद्धां होणार नाहीं.

निरस्तसर्वेन्द्रियकार्यजातो ।
यो देहकार्यं न करोति किञ्चित् ॥
स्वात्मीयकार्योद्यतचित्तवृत्तिः ।
स ध्यानकार्यं विदधाति धन्यः ॥ ३ ॥

अर्थ— आत्मकार्य ( आपली मुक्ति ) करण्याविषयीं मन उत्सुक झाल्यामुळें जो संपूर्ण इंद्रियांचे व्यापार बंद करून शरिराचे कोणतेच व्यापार करीत नाहीं. तो धन्यपुरुष ध्यानाचें काम करीत आहे, असें समजावें, अर्थात् अशा पुरुषालाच ध्यान साध्य आहे

विहिण्डमानं जगदन्तराले ।
धर्तुं न शक्यं मनुजामरेन्द्रैः ॥
तन्मानसं यो विदधाति वश्यं ।
ध्यानं स धीरो विदधात्यवश्यम् ॥ ४ ॥

अर्थ— ह्या त्रैलोक्याच्या गर्भात हिंडणारें व नरेंद्र आणि देवेंद्र ह्यांनीं सुद्धां धरण्याला अर्थात् ताब्यांत ठेवण्याला अशक्य असें मन जो आपल्या आधीन ठेवतो, तो धीर पुरुष निश्चयानें ध्यान करतो.

बाणैः समं पञ्चभिरुग्रवेगै-।
विद्धत्रिलोकस्थितजीववर्गः ॥
न मन्मथस्तिष्ठति यस्य चित्ते ।
विनिश्चलास्तिष्ठति तस्य योगः ॥ ५ ॥

अर्थ— ज्यानें अत्यंत वेगवान अशा आपल्या पांच बाणांनीं त्रैलोक्यांत सर्व जीवसमूहाला एकदम प्रहार केला आहे असा मदन ज्याच्या मनांत वास करीत नाहीं त्या पुरुषाला ध्यानयोग निश्चल रहातो.

न रोषो न तोषो न मोषो न दोषो ।
न कामो न कम्पो न दम्भो न लोभः ॥
न मानो न माया न खेदो न मोहो ।
यदीयेऽस्ति चित्ते तदीयोऽस्ति योगः ॥ ६ ॥

अर्थ— ज्याच्या चित्तांत क्रोध नाहीं, विषयांवर प्रेम नाहीं, चोरी करण्याची इच्छा नाहीं, अन्याय वगैरे दोष नाहीं, काम नाहीं, भीति नाहीं, दांभिकपणा नाहीं, लोभ, अभिमान, कपट, खिन्नता आणि भ्रांति हे विकार नाहींत त्याचाच ध्यानयोग आहे ह्मणजे त्यालाच ध्यानयोग सिद्ध होतो.

प्रवर्धमानोद्धतभेवनायां ।
जीवस्य गुप्ताविव मन्यते यः ॥
शरीरकुट्यां वसतिं महात्मा ।
हानाय तस्या यतते स शीघ्रम् ॥ ७ ॥

अर्थ— जिचे तीव्रदुःखरूप परिणाम वृद्धि पावत आहेत अशा शरीररूपी कुडींत (झोंपडींत) ह्या जीवाची वसति बंदीखान्यांतील वसतीप्रमाणें आहे असें जो मानतो तो महात्मा त्या वसतीचा नाश होण्याकरितां लवकर प्रयत्न करूं लागतो.

समाधिविध्वंसविधौ पटिष्ठं ।
न जातु लोकव्यवहारपाशम् ॥
करोति यो निःस्पृहचित्तवृत्तिः ।
प्रवर्तते ध्यानममुष्य शुद्धम् ॥ ८ ॥

अर्थ— चित्ताच्या एकाग्रतेचा नाश करण्याविषयीं समर्थ असा निंद्य लौकिकव्यवहार जो पुरुष केव्हांहि करीत नाहीं, व ज्याची चित्तवृत्ति निःस्पृह आहे अशा पुरुषाला शुद्ध ध्यान करता येतें.

विधीयते ध्यानमवेक्षमाणै- ।
र्यध्दूतबोधैरिह लोककार्यम् ॥
रौद्रं तदार्तं च वदन्ति सन्तः ।
कर्मद्रुमच्छेदनबद्धकक्षाः ॥ ९ ॥

अर्थ—कर्मरूपी वृक्ष तोडून टाकण्याबद्दल ज्यांनीं कंबर बांधली आहे असे सत्पुरुष, व्यवहार पहात असणारे अज्ञानी लोक जें ध्यान करतात त्याला रौद्रध्यान किंवा आर्तध्यान असें ह्मणतात.

सांसारिकं सौख्यमवाप्तुकामै- ।
र्ध्यानं विधेयं न विमोक्षकारि ॥
न कर्षणं सस्यविधायि लोके ।
पलाललाभाय करोति कोऽपि ॥ ११० ॥

अर्थ—संसारांतील सुख मिळण्याची इच्छा करणाऱ्या

लोकांनीं मोक्ष देणारें ध्यान करूं नये. कारण, ज्याच्यापासून धान्य मिळणारें आहे असें नांगरणें नुसत्या सुसाकरितां या जगांत कोणीच करित नाहीं.

अभ्यस्यमानं बहुधा स्थिरत्वं ।
यथैति दुर्बोधमपीह शास्त्रम् ॥
नूनं तथा ध्यानमपीति मत्वा ।
ध्यानं सदाऽभ्यस्यतु मोक्षकामः ॥ ११ ॥

अर्थ—ज्याप्रमाणें समजण्याला कठिण असें देखील शास्त्र पुष्कळ वेळां अभ्यास केला असतां साध्य होतें, त्याप्रमाणेंच ध्यानहि आहे, असें मानून मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्या जीवानें ध्यानाचा सर्वदा अभ्यास करावा.

अवाप्य मानुष्यमिदं सुदुर्लभं ।
करोति यो ध्यानमनन्यमानसः ॥
भिनत्ति संसारदुरन्तपञ्जरं ।
स्फुटं स सद्यो गुरुदुःखमन्दिरम् ॥ १२ ॥

अर्थ— अत्यंत दुर्लभ असा मनुष्यभव मिळवून जो जीव एकाग्रमनानें ध्यान करतो, तो मोठमोठ्या दुःखांचा वाडाच कीं काय असा हा संसाररूपी अभेद्य पिंजरा स्पष्टपणें फोडून टाकतो.

यो जिनदृष्टं शमयमसहितं ।
ध्यानमपाकृतसकलविकारः ॥
ध्यायति धन्यो मुनिजनमहितं ।
चित्तनिवेशितपरमविचारः ॥ १३ ॥

अर्थ— जो पुरुष मनांत उत्कृष्ट विचार आणून व सर्व मनोविकार नाहींसे करून श्रीजिनांनीं सांगितलेलें व

मुनिजनांनादेखील पूज्य असें ध्यान शम (कषायांचा अभाव) आणि यम (पापक्रियेचा त्याग) ह्यांसह करतो तो धन्य होय.

नाकिनिकायस्तुतपदकमलो ।
दीर्णदुरुत्तरभवभयदुःखः ॥
याति स भव्योऽमितगतिरनघां ।
मुक्तिमनश्वरनिरुपमसौख्याम् ॥११४॥

अर्थ— तो ध्यान करणारा भव्य जीव ज्याचें ज्ञान अपरिमित झालें आहे असा होऊन ह्मणजे केवली होऊन देवसमूह ज्याच्या चरणकमलांची स्तुति करीत आहेत असा होत्साता उतरून जाण्याला फार कठिण अशा संसारदुःखाचा नाश करून अविनाशि व ज्याला उपमा नाहीं असें सुख जेथें आहे अशा निर्दोष मोक्षपदाला जातो. ( या श्लोकांत ग्रंथकारांनीं आपलें 'अमितगति' हें नांव प्रकट केलें आहे. )

यदर्थमात्रापदवाक्यहीनं ।
मया प्रमादादिह किञ्चनोक्तम् ॥
तन्मे क्षमित्वा विदधातु देवी ।
सरस्वती केवलबोधिलब्धिम् ॥ ११५ ॥

अर्थ— या श्रावकाचार शास्त्रांत माझ्या प्रमादामुळें जर कांहीं अर्थ, मात्रा, पद, वाक्य इत्यादि कमी पडलेलें असें मीं सांगितलें असेल; तर त्याविषयीं सरस्वतीदेवी मला क्षमा करून, केवलज्ञान प्राप्त करून देवो!

## परिच्छेद १५ वा समाप्त.

# प्रशस्ति.

अभूत्समो यस्य न तेजसेनः ।
विशुद्धबोधो जिनदेवसेनः ॥
मुनीश्वरो निर्जितकामसेनः ।
पादारविन्दप्रणतेन्द्रसेनः ॥ १ ॥

अर्थ— तेजानें सूर्यहि ज्याची बरोबरी करीत नाहीं, ज्याचें ज्ञान निर्मल आहे, ज्यानें मदनाचें सैन्य जिंकिलें आहे आणि देव व इंद्र ज्याच्या पदकमलास वन्दन करितात असा जिनसेनदेव नांवाचा मुनीश्वर होता.

दोषान्धकारपरिमर्दनबद्धकक्षो ।
भूतस्ततोऽमितगतिर्भुवनप्रकाशः ॥
तिग्मद्युतेरिव दिनः कमलावबोधी ।
मार्गप्रबोधनपरो बुधपूजनीयः ॥ २ ॥

अर्थ— रात्रीच्या अंधकाराचा नाश करण्याकरितां ज्यानें कंबर बांधली आहे, ज्याची गती फार दूरपर्यंत आहे, जो जगाला प्रकाशित करितो, कमलांना प्रफुल्लित करणारा, मार्ग दाखविण्यांत तत्पर आणि ह्मणूनच सज्जनांस आवडणारा आसा दिवस जसा सूर्यापासून उत्पन्न होतो; तसा मिथ्यात्व वगैरे दोषरूपी अंधकार नाहींसा करण्यास ज्यानें कंबर बांधली आहे, ज्याचें ज्ञान अमित ( पुष्कळ ) आहे, आणि त्यामुळें जो जगाला ज्ञान देतो, जो लक्ष्मीला प्रफुल्लित करितो, जो जैनमार्गाचा उपदेश करण्यांत तत्पर झालेला आहे आणि ह्मणूनच पंडितजन ज्याचा सन्मान करितात

असा अमितगति नांवाचा आचार्य, श्रीजिनदेवसेनापासून झाला.

विद्वत्समूहार्चितचित्रशिष्यः ॥
श्रीनेमिसेनोऽजनि तस्य शिष्यः ॥
श्रीमाथुरानीकनभःशशाङ्कः ॥
सदा विधूतार्हततत्वशङ्कः ॥ ३ ॥

अर्थ—विद्वान लोक ज्यांना मान देतात असे पुष्कळ शिष्य ज्याच्याजवळ आहेत, माथुरसंप्रदायरूपी आकाशाला सुशोभित करणारा चंद्र असा आणि सर्वदा जैनमतांतील तत्वांच्या शंका दूर करणारा असा श्रीनेमिसेन नांवाचा त्या अमितगति आचार्यांचा शिष्य होऊन गेला.

माधवसेनोऽजनि महनीयः ।
सँयतनाथो जगति जनीयः ॥
जीवनराशेरिव मणिराशी ।
रम्यतमोऽतोऽखिलतिमिराशी ॥ ४ ॥

अर्थ—त्या श्रीनेमिसेनाचा श्रीमाधवसेन नांवाचा शिष्य होता. तो संयमी लोकांमध्यें अग्रगण्य असल्यानें सर्वांना पूज्य होता. तो सर्व जगाचें कल्याण करणारा असल्यानें ज्याप्रमाणें समुद्रांतून निघालेला अत्यंत सुंदर असा रत्नांचा पुंज आपल्या तेजानें अंधार नाहींसा करतो त्याप्रमाणें तो संपूर्ण मिथ्यात्वाचा नाश करित होता.

विजितनाकिनिकायमवज्ञया ।
जयति यो मदनं पुरुविक्रमम् ॥
त्यजति मां किमयं परनाशधी- ।
रिति कषायगणो विगतो यतः ॥ ५ ॥

अर्थ—ज्यानें सर्व देवहि सहज जिंकून टाकिले अशा महापराक्रमी मदनाला देखील ज्या माधवसेनानें जिंकून सोडलें, तो मला जिंकावयाचें सोडील काय? असें मानून दुसऱ्याचा नाश करण्याविषयींच ज्याची बुद्धि आहे असा हा कषायसमूह ह्या माधवसेनाला सोडून दूर गेला होता.

तस्मादजायत नयादिव साधुवादः ।
शिष्यार्चितोऽमितगतिर्जगति प्रतीतः ॥
विज्ञातलौकिकहिताहितकृत्यवृत्ते- ।
राचार्यवर्यपदवीं दधतः पवित्राम् ॥ ६ ॥

अर्थ—जगाला हितकारक कोणतें व अहितकारक कोणतें, हें ज्याला चांगलें कळत आहे व जो पवित्र अशी आचार्य ही पदवी धारण करीत आहे अशा त्या श्रीमाधवसेनाचा अमितगति नांवाचा जगद्विख्यात व शिष्यवृंद ज्याची पूजा करीत आहे असा शिष्य झाला. तो ज्याप्रमाणें द्रव्यार्थिकादि नयापासून सत्यवाद उत्पन्न झाला त्याप्रमाणें आपल्या गुरूला शोभण्यासारखा झाला.

अयं तडिद्वानिव वर्षणं घनो ।
रजोपहारी धिषणापरिष्कृतः ॥
उपासकाचारमिमं महामनाः ।
परोपकाराय महोन्नतोऽकरोत् ॥ ७ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें अत्यंत उंच असून विजेनें युक्त असलेला व भूमीवरील धुरळा घालविणारा मेघ परोपकाराकरितां जलवृष्टि करतो, त्याप्रमाणें सर्वांपेक्षां उंच ह्मणजे श्रेष्ठ, बुद्धिमान् व लोकांचें अज्ञान दूर करणारा हा अमितगति आचार्य परोपकाराकरितां हा उपासकाचार नांवाचा ग्रंथ करता झाला.

यदत्र सिद्धान्तविरोधि भाषितं ।

विशोध्य सद्‌ ग्राह्यमलं मनीषिभिः ॥
पलालमत्यस्य न सारकांक्षिभिः ।
किमत्र शालिः परिगृह्यते जनैः ॥ ८ ॥

अर्थ-- सज्जनांनीं, ह्या ग्रंथांत जें जैनसिद्धांताच्या विरुद्ध सांगितलें असेल तें टाकून देऊन जें चांगलें असेल तेंच ग्रहण करावें. ह्या जगांत चांगल्याची निवड करणारे लोक कोंडा टाकून आंतील तांदूळ तेवढेच घेत नाहींत काय?

यावत्तिष्ठति शासनं जिनपतेः पापापहारोद्यतं ।
यावद्ध्वंसयते हिमेतररुचिर्विश्वं तमः शार्वरम् ॥
यावद्धारयते महीध्रखचितं वातत्रयी विष्टपं ।
तावच्छास्त्रमिदं करोतु विदुषामभ्यस्यमानं मुदम् ९

अर्थ— संपूर्णपातकांचा नाश करणारें असें श्रीजिनेंद्राचें शासन जोंपर्यंत ह्या जगांत वास्तव्य करीत आहे, सूर्य जोंपर्यंत रात्रीसंबंधी अंधकाराचा नाश करीत आहे, जोंपर्यंत तीन वायू पर्वतांनीं युक्त असलेल्या ह्या जगाला धारण करीत आहेत, तोंपर्यंत हें अमितगति आचार्यांनीं केलेलें शास्त्र अध्ययनानें विद्वानांच्या मनाला आनंद देवो!

॥ इति प्रशस्तिः ॥